# मराठी शाकुन्तल

अथवा

महाकविश्रीकालिदासविरचित अभिज्ञानशाकुंतलाचें

मराठी गद्यपद्यात्मक भाषांतर

भाषांतरकार

## प्रो० लक्ष्मणशास्त्री लेले

( न्यू पूना कॉलेज )

" क्षणे क्षणे यन्नवतामुपैति तदेव रूपं रमणीयतायाः "

रचना-सन १९०३; मुद्रण-सन १९२६

पुस्तकें प्रकाशकाकडे मिळतात.

किंमत २॥ रुपया

# प्रस्तावना

सुमारें तेवीस वर्षांपूर्वी अभिज्ञानशाकुंतलाचें भाषांतर व अलंकारांवरचा अलंकारप्रकाश या नांवाचा ग्रंथ अशीं दोन मराठी पुस्तकें आम्हीं लिहून तयार केलीं. दोन्हीं डॉ. भांडारकरांसारख्या विद्वानांस आवडलीं. त्यांपैकीं अलंकारप्रकाश छापून प्रसिद्ध होण्याचा योग लवकरच म्हणजे इ. स. १९०४ सालीं आला. शाकुंतलभाषांतराला मात्र आजपर्यंत अज्ञातवास घडला.

या भाषांतरापूर्वी शाकुंतलाचीं पांच भाषांतरें आमच्या लहानपणीं आमच्या वाचनांत आलीं होतीं. परशुरामपंत गोडबोले यांचें भाषांतर इ. स. १८६१ त प्रसिद्ध झालें; त्याच सुमारास कृष्णशास्त्री राजवाडे यांचेंही बाहेर पडलें. पुढें दहा वर्षांनीं रा. गुंजीकर यांची प्रतिकृति लोकांपुढें आली. नंतर आणखी दहा वर्षांनीं महादेव चिमणाजी आपटे यांचा तर्जुमा रसिकांच्या हातां पडला. यापुढें लवकरच अण्णा किर्लोस्करांचें संगीतशाकुंतल उदयाला आलें. यांपैकीं प्रत्येक प्रतिकृतींत चांगुलपणा असून एक प्रकारचें वैशिष्ट्यही आहे. परशुरामपंतांचा सहजात रसाळपणा, राजवाड्यांचा व्युत्पन्नतेचा डौल, गुंजीकरांची कृष्णशास्त्री चिपळुणकरी थाटाची वैदर्भी शैली, आपट्यांचा मनोरंजनपद्धतीचा नवा ढंग, किर्लोस्करांचा रंगभूमीला लागणारा नटवेपणा व अभिनव संगीतप्रकार असे त्या त्या भाषांतरकाराचे विशेष दिसून येतात. गोडबोले यांच्या हयातींत त्यांच्या भाषांतराची बरीच प्रतिष्ठा झाली. राजवाड्यांच्या पदरांतही थोडेसें यश पडलें. गुंजीकर व्युत्पन्न लेखक असल्यामुळें त्यांचें भाषांतर चांगलें उतरलें. तथापि त्याची विशेष प्रसिद्धि किंवा वाहवा झालेली दिसत नाहीं. रा. विनायक कोंडदेव ओक हे बहुश्रुत लेखक असून रा. गुंजीकरांचे परम मित्र होते. रा. ओकांनीं बालबोधांत गुंजीकरांचें चरित्र लिहिलें. त्यांतही शाकुंतल–भाषांतराचा उल्लेख नाहीं! विष्णुशास्त्री चिपळुणकर यांनींही या पुस्तकाचा परामर्ष घेतल्याचें आमच्या आढळांत नाहीं. तेव्हां गुंजीकरांचा हा प्रयत्न चांगला असूनही लोकांपुढें यावा तसा आला नाहीं असें दिसतें. रा. आपटे यांच्या 'मौजेच्या चार घटकां'चा पहिला भाग, अर्थात् शाकुंतलाचें मराठी गद्य भाषांतर, गर्जना करीत पुढें आलें. पण हरिपंत पंडितांच्या प्रतिकूल टीकेच्या भडिमारा-

पुढें त्यानें टिकाव धरला नाहीं! आपट्यांचें भाषांतर मार्मिक आहे. तथापि तत्कालीन रसिकांत त्याची फारशी चहा झाली नाहीं. मांजेच्या चार घटकांचा हा पहिला भाग दुर्दैवानें शेवटचाच ठरला! किर्लोस्करांचें भाग्य कांहीं वेगळें होतें. त्यांनी संगीतनाटकाची नवी टूम काढून, मूळ संस्कृत नाटकांत थोडे फेरफार करून, आपली प्रतिकृति रंगभूमीवर आणली. स्वतांची नाटकमंडळी, स्वतां नट व स्वतां नाटककार असा अपूर्व योग किर्लोस्करांत जुळून आला! नाट्य हें दृश्य-काव्य असल्यामुळें तें रंगभूमीवर आलें तरच त्याचें खरें स्वरूप लोकांच्या नजरेंत भरतें व त्याची सफलता होते. पूर्वीचीं भाषांतरें रंगभूमीवर न आल्यानें नुसतीं श्राव्यकाव्यासारखीं तीं वाचनालयांत पडून राहिलीं आणि थोड्याशा रसिकांच्या मनोविनोदास पात्र झालीं. किर्लोस्करांचें नाटक रंगभूमीवर आल्यामुळें जगलें व लोकांच्या दृष्टीसमोर राहिलें. त्याच्या पांच चार आवृत्याही निघाल्या. शाकुंतलाचे भाषांतरकार या नात्यानें कीर्ति व श्री यांचा विशेष लाभ किर्लोस्करांसच झाला. त्यांच्या भाषांतरानें इतर भाषांतरें स्मृतिशेष करून सोडिलीं. आजच्या पिढीला किर्लोस्करांच्या भाषांतराशिवाय दुसरें कोणतेंही भाषांतर बहुधा ठाऊक नाहीं. विष्णुशास्त्री चिपळुणकर यांनीं ता. ६ डिसेंबर १८८१ च्या केसरींत किर्लोस्करांच्या प्रयत्नाचें योग्य अभिनंदन केलें आहे. तथापि ता. २७ डिसेंबर १८८१ च्या केसरीच्या अंकांत चिपळुणकर, राजवाडे, लेले, गोडबोले, पंडित इत्यादिकांचीं संस्कृत नाटकांचीं भाषांतरें लुप्तप्राय झाल्याबद्दल त्यांनीं मोठा खेद दर्शविला आहे.

शाकुंतलाचीं अशीं भाषांतरें झालीं असतां त्याचेंच पुन्हां आणखी भाषांतर आम्हांस करावेंसें वाटलें याचीं कांहीं कारणें होतीं. एक असें कीं अगदीं मूळाला धरून भाषांतर करण्याच्या हेतूनें वरील पैकीं एकही भाषांतर झालें नव्हतें. दुसरें असें कीं, किर्लोस्करांच्या भाषांतराखेरीज इतर नामशेष झालेलीं होतीं; तिसरें कारण भाषांतरावरून मूळग्रंथाचा अभ्यास करूं इच्छिणाऱ्या वाचकवर्गाचें अस्तित्व; चवथें व सर्वांत बलिष्ठ कारण म्हणजे काव्यविनोदाची हौस. या हौसेला मोल नाहीं व मर्यादा नाहीं. कांहीं ग्रंथ असे आहेत कीं पृथ्वीवरील सर्व अभिजात भाषांतून त्यांचीं अनेक भाषांतरें झालीं असतां अजून त्यांचीं नवनवीं भाषांतरें होतच आहेत! होमर व भगवद्गीता अशा प्रकारच्या ग्रंथांचीं उत्कृष्ट उदाहरणें होत. आमच्या मोरोपंतांनी तर एकाच रामायणावर एकशे आठ वेगळीं काव्यें

रचून काव्यविनोदाच्या आवडीची परिसीमा गांठली ! असल्या बाबतींत कोणाला दोष द्यावयाचाच असला तर तो मूळ-ग्रंथाच्या अलौकिक सौंदर्यालाच दिला पाहिजे !

प्रस्तुत भाषांतर करतेवेळीं आमच्या पाशीं निर्णयसागरी मळ व प्रो. पाटणकर यांच्या आवृत्तीची एक प्रत होती. स्थूलमानानें निर्णयसागरी मूळ हाच आमचा आधार. आम्हांला जे पाठभेद पसंत पडले त्यांचें भाषांतर आम्हीं केलें आज-पर्यंत उपलब्ध असलेल्या मूळाच्या प्रती पाहून त्यांवरून शाकुंतलाची एक शुद्ध प्रत तयार करण्याचा प्रयत्न कांहीं पंडित करीत असल्याचें आमच्या ऐकण्यांत आहे. असा प्रयत्न सिद्धीस गेल्यास आमच्या भाषांतराचेंही अनायासें शोधन होईल. सध्यां आमचें पूर्वी तयार झालेलें हें भाषांतर जसेंचें तसेंच रसिकांस सादर करितों.

प्रस्तुत भाषांतर गद्यास गद्य व पद्यास पद्य असें आहे. समश्लोकी व समवृत्त भाषांतराची आमची प्रतिज्ञा नाहीं. तथापि सुमारें चाळीस पद्यें तशा प्रकारचीं सहजच तयार झालीं. संस्कृत वृत्तांखेरीज साकी, दिंडी, अंजनीगीत अशीं प्राकृत वृत्तें योजिलीं आहेत. दोन तीन ठिकाणीं साध्या लावणीची चालही घातली आहे. अंत्य यमकाबद्दल विशेष सोवळेपणा राखला नाहीं. आम्र-मोहोर, वृक्ष-सावली, दर्भ-घास अशांसारखे गंगाजमनी परंतु कर्णकटु नसणारे समास पंक्तिपावन मानले आहेत. एका मूळ श्लोकाची भाषांतरांत अनेक पद्यें झालीं त्यांस सर्वांमिळून एकच अंक दिला आहे. एकाच अर्थाचीं अनेक पद्यें कांहीं ठिकाणीं आहेत. त्यांत एक वर देऊन इतर, पृष्ठाखालीं, टीपांच्या जागेत, दिलीं आहेत. होता होईल तितका मूळाचा अर्थ आणण्याचा प्रयत्न केला आहे. कोठें मूळांतला अर्थ विशद करण्याकरतां न्यूनाधिक केलें आहे तें मार्मिक वाचकांच्या लक्ष्यांत येईल. मूळांत पात्रांच्या अनु-रोधानें संस्कृत व प्राकृत अशा भाषांची योजना आहे. भाषांतरांत सर्वत्र सारखीच पुण्याची नागरिक मराठी योजली आहे. सातव्या अंकांत सर्वदमनाच्या मुखांत मात्र बोबडी भाषा घातली आहे. भाषांतर छापून गेल्यावरही कांहीं फेरफार सुचले ते शेवटीं पुरवणींत दिले आहेत. पुरवणीनंतर महाभारतांतील दुष्यंतशकुंतला-ख्यानाचा सारांश दिला आहे या पुस्तकाचा उपोद्घात वाचतांना त्याचा वाचकांस उपयोग होईल. अगदीं शेवटीं शुद्धिपत्र दिलें आहे. त्याप्रमाणें पुस्तक शुद्ध करून मग तें वाचावें अशी वाचकांस विनंति आहे.

हें भाषांतर छापण्याचा योग मोठ्या चमत्कारिक रीतीनें आला. फलटण येथील हुजुर-चिटणीस, श्रीयुत रा. रा. केशव विनायक गोडबोले, बी. ए, एलएल्. बी., यांचें ' महाराष्ट्र शाकुंतल ' गतवर्षी आकस्मिक रीतीनें आमच्या भेटीस आलें. आमच्या आवडीच्या एका उत्तम ग्रंथाचें व तेंही एकाच हेतूनें झालेलें, भाषांतर पाहून आम्हांस आनंद वाटला. त्यांतूनही परमरसिक परशुरामपंतांच्या वंशांतील व शुद्ध वळणांतील सद्गृहस्थांनीं तें केलेलें पाहून तर आमचा आनंद द्विगुणित झाला. केशवरावजींची समवृत्ताची व समश्लोकीची कसरत पाहून मोठें कौतुक वाटलें; आणि तसल्या कामाची थोडीबहुत प्रत्यक्ष माहिती असल्यामुळें त्यांच्या दीर्घ परिश्रमाची आम्हांला पूर्ण कल्पना आली. रा. गोडबोले यांच्या अभिनव प्रयत्नाशीं आपलें भाषांतर ताडून पाहण्याची आम्हांस व आमच्या एकदोन रसिक मित्रांस इच्छा झाली. दोन्ही पुस्तकांचें वाचन झाल्यावर सदर मित्रांनीं आमच्या भाषांतरांचे श्रम वायां दवडूं न देण्याची आम्हांस सप्रेम आग्रहाची सूचना केली व सर्व प्रकारांनीं पुष्कळ प्रोत्साहनही दिलें. म्हणूनच हें प्रकाशनाचें काम आम्हीं अंगावर घेतलें. या भाषांतराचें मूळचें नांव 'महाराष्ट्र शाकुंतल' असें आमच्या 'महाराष्ट्र-भामिनीविलासा'च्या धर्तीवर ठेविलें होतें. पण रा. गोडबोले यांच्या भाषांतराला तें लाभल्यामुळें आम्हीं ' मराठी शाकुंतल ' असें नवें नांव या भाषांतरास दिलें आहे.

प्रिन्सिपाल वैजनाथ काशिनाथ राजवाडे यांनीं आमच्या इच्छेस मान देऊन हें भाषांतर, आमच्या मुखानें, समग्र ऐकिलें व त्याच्या बरोबर छापण्याकरितां शाकुंतलविषयक एक महत्त्वाचा लेख, भाषांतरावरील अभिप्रायासह. दिला, याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहों.

कित्येक पौरस्त्य व पाश्चात्य विद्वानांनीं शाकुंतलाच्या आवृत्त्या काढून त्यांत शाकुंतलविषयक आपले विचार इंग्रेजींत प्रदर्शित केले आहेत. विष्णुशास्त्री चिपळुणकर व रा. सा. गो. वा. बापट यांनीं सदर नाटकावर मराठींत मार्मिक टीकालेख लिहिले आहेत. प्रायः असल्या लेखांच्या आधारानें आम्ही कांहीं विचार उपोद्घातांत ग्रथित केले आहेत.

अशा प्रकारचें हें भाषांतर आम्ही रसिकांस अर्पण करीत आहों. यांतील न्यूनता दूर करून हें पूर्ण करण्याचें श्रेय त्यांनीं घ्यावें अशी त्यांस विनंति आहे.

न्यू पूना कॉलेज, पुणें. }
विजयादशमी, शके १८४८. }

लक्ष्मणशास्त्री लेले.
( प्रोफेसर, न्यू पूना कॉलेज )

# अभिप्राय.

**कविपदलाञ्छितानां तत्रभवतां मुकुन्दरायशर्मणां**
**'मराठी शाकुन्तल'-प्रशस्तिः ।**

लेले लक्ष्मणशास्त्रिभिर्विरचितं शाकुन्तलं नाटकं
  मन्ये देशगिरो विभूषणमनून्नूत्नं महादीप्तिमत् ।
भाषा कण्वसुतेव भाति सहजं सौन्दर्यमातन्वती
  लावण्यं न तनूकरोति किमपि च्छायापि मूलाश्रिता ॥ १ ॥

दृष्ट्वा श्रुतेन तपसा च विराजमानं
  विद्वांसमस्य मधुरां च कृतिं तनूजाम् ।
कालान्तरेण फलितं वचनं नु मन्ये
  'शान्ते करिष्यसि पदं पुनराश्रमेऽस्मिन्' ॥ २ ॥

रूपान्तराणि ननु यद्यपि पञ्चषाणि
  मूलादभिन्नमिदमेव तथापि मन्ये ।
सन्तोषमेष्यति स वीक्ष्य कवीश्वरोऽपि
  दीपः प्रवर्तित इवाद्य पुनः प्रदीपात् ॥ ३ ॥

विद्वन् ! पुनःपुनरपि प्रथमानकीर्ते !
  ग्रन्थान् प्रणीय शुचि पायय चामृतं नः ।
एषा कृतिर्विजयतां सुचिरं जगत्यां
  किंवाऽधिकेन गदितेन फलं ? नमस्ते ! ॥ ४ ॥

---

**प्रिन्सिपाल राजवाडे** लिहितात--

" प्रो. लक्ष्मणशास्त्री लेले यांच्या वाणींत प्रसाद व साहजिकपणा आहे. 'मराठी शाकुंतल'-पुस्तकांत ओढाताण, दुर्बोधता किंवा कठोरपणा कोठेंही दिसला नाहीं. योग्य शब्द लेलेशास्त्री यांस सहज सुचतात. त्यांची ही भाषान्तर-कृति वाचनीय झाली आहे. "

# नाटकांतील पात्रें.

## ( पुरुष )

**सूत्रधार**—नाटकाचा व्यवस्थापक.

**दुष्यन्त**—हस्तिनापूरचा राजा, नाटकांतील नायक.

**सूत**—राजाचा सारथी.

**सेनापति** ( भद्रसेन )—राजाचा सेनापति.

**विदूषक** ( माधव्य )—राजाच्या विश्वासांतला मित्र.

**भरत** ( सर्वदमन )—दुष्यन्ताचा मुलगा.

**सोमरात**—राजाचा उपाध्याय.

**रैवतक, करभक, कंचुकी**—राजाचे सेवक.

**वैतालिक**—राजाचे भाट.

**कण्व** ( काश्यप )—शकुंतलेचा पालक पिता.

**वैखानस, शार्ङ्गरव, हारीत, शारद्वत, गौतम**—कण्वाचे शिष्य.

**श्याल**—राजाचा मेहुणा, शहरचा कोतवाल.

**धीवर**—कोळी.

**सूचक, जानुक**—शिपाई.

**मातलि**—इन्द्राचा सारथी.

**मारीच**—प्रजापतींपैकीं एक.

## ( स्त्रिया )

**नटी**—सूत्रधाराची बायको.

**शकुन्तला**—कण्वाची धर्मकन्या, दुष्यन्ताची भार्या, नाटकांतील नायिका.

**अनसूया, प्रियंवदा**—शकुंतलेच्या मैत्रिणी.

**गौतमी**—कण्वाश्रमांतील वृद्ध तापसी.

**चतुरिका**-( राजवाड्यांतील दासी ). **परभृतिका, मधुकरिका**—राजोद्यानपालिका.

**प्रतीहारी, यवनी**—राजसेविका.

**सानुमती**—मेनकेची मैत्रीण.

**अदिति**—मारीचाची पत्नी.

**मघवन्** ( इन्द्र ), **जयन्त, कौशिक, मेनका, दुर्वास** आणि **नारद** या नांवांचा उल्लेख नाटकांत आला आहे.

# दुष्यन्त व शकुन्तला हीं अपराधी होतीं काय ?

## दैव, आशीर्वाद आणि शाप.

लौकिकानां हि साधूनामर्थं वागनुवर्तते ।
ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति ॥

ही उक्ति उत्तररामचरित्राला जशी लागू पडते तशी तिची सत्यता शाकुन्तल-नाटकांतही दिसून येते. अशा तऱ्हेचें पहिलें वचन म्हणजे वैखानसाचा दुष्यंताला आशीर्वाद व त्याच्याबरोबर असलेल्या दोघाजणांनीं केलेला अनुवाद; ( पुत्रमात्म-गुणोपेतं चक्रवर्तिनमाप्नुहि ) व ( सर्वथा चक्रवर्तिनं पुत्रमाप्नुहि ). विवाहित स्त्रियांनीं दुष्यंताचें अन्तःपुर भरलें होतें; ( परिग्रहबहुत्वेऽपि ). तथापि त्याला मुलगा नव्हता. वैखानस जरी आद्य ऋषि नव्हता तरी कडक ब्रह्मचर्यानें तें तेज त्याच्या अंगी आलें होतें. त्याचे शब्द खरे झालेच पाहिजेत. पण ते खरे होण्याला नवीन साधनसामग्रीची जरूर होती. अन्तःपुरांतल्या स्त्रिया वांझच ठरल्या गेल्या. आजपर्यंत त्यांना अपत्य झालें नाहीं, तेव्हां पुढेंही होणार नाहीं असें निश्चित झालें होतें; ( कष्टमनपत्यता नाम ). निदान चक्रवर्ती पुत्राला जन्म देण्याचें त्या स्त्रियांत सामर्थ्य नव्हतें. नवीन संबंधाची जरूर होती वैखानसाला ( प्रतिगृहीतं ब्राह्मणवचनं ) असें उत्तर दुष्यंत देतो. कारण, पुत्रमुख पाहण्यास तो आतुर झाला होता पण आशीर्वाद फलोन्मुख व्हावयाला इतक्यांतच प्रारंभ होईल असें त्याच्या स्वप्नींही नव्हतें. तो आश्रमांत शिरतो तोंच त्याचा बाहु स्फुरण पावूं लागतो. हें ब्रह्मचाऱ्यांचें आश्रमपद, येथें फलप्राप्ति कशी होणार ? परंतु व्हावयाचें असलें म्हणजे कोठेंही तें होणारच असें म्हणून तो आपलें शंकानिवारण करतो. दुष्यंत व शकुंतला यांची नजरानजर होते. तारा-मैत्रक जमतें. कामवासना तृप्त होत नाहींत म्हणून दोघेंही झुरतात व शकुंतला तर मृत्युपंथाला लागते. दोघांची गांठ पडते. एकांतांत दुष्यंत तिच्याशीं सलगी करूं पाहतो, पण ती कामाधीन असूनही त्याला रुकार देत नाहीं. अखेरीस त्यांचा प्रणयविवाह घडतो व शकुंतला गरोदर राहते. वैखानसाचा आशीर्वाद येथें सफल झाला. कण्व शकुंत-

केचे अनिष्ट ग्रह किंवा दैव शांत करण्याला सोमतीर्थाला गेला होता. त्याच्या गैरहजीरीत ह्या सगळ्या गोष्टी घडून आल्या. दुर्दैवाचा धागा अजून उरला होता. तसें नसतें तर बोलल्याप्रमाणें आठ पंधरा दिवसांतच शकुंतलेला नेण्यास दुष्यंतानें माणसें पाठविलीं असतीं. ( एकैकमत्र दिवसे दिवसे मदीयं नामाक्षरं गणय गच्छसि यावदन्तम् । तावत्प्रिये मदवरोधगृहप्रवेशं नेता जनस्तव समीपमुपैष्यतीति ). ह्या धाग्यामुळेंच माणसें पाठवावयाला वेळ लागला. त्यामुळे शकुंतला व तिच्या सख्या चिंतातुर झाल्या. राजानें फसविलें तर नाहींना असें त्यांस वाटूं लागलें. इतक्यांत दुर्दैवाला आणखी फाटा फुटला. अतिथींचा सत्कार करण्याला कण्वानें शकुंतलेला सांगितलें होतें. त्याप्रमाणें तिनें दुष्यंताचा पाहुणचार केलाही. पण दुसरा अतिथि आला तेव्हां ती चिंतेनें अगदीं ग्रासून गेली होती. सभोंवतीं काय चाललें आहे ह्याचें तिला भानही नव्हतें. हा अतिथि असा तसा नसून केवळ आग असा दुर्वास ऋषि होता. त्यानें तिच्या मनाची स्थिति ओळखली व तदनुरूप तिला शाप दिला व प्रियंवदेच्या रदबदलीमुळे शापाला उश्शाप होण्याला एक पुस्ती जोडली. ही पुस्ती जोडली नसती तर काय झालें असतें हा एक प्रश्नच आहे. दुष्यंताला कायमची विस्मृति झाली असती तर ('चक्रवर्तिनमाप्नुहि') ह्या उक्तीचें काय झालें असतें? दुर्वासाच्या शापाचा दुर्दैवांतच अन्तर्भाव केला पाहिजे. नाहींतर अशा वेळीं तोच कां उभा रहावा? ह्या शापामुळेच अंगठी शचीतीर्थांत गळून पडली. शकुंतलेची सासरीं बोळवण करतांना त्याचे वेळीं तिला 'बहुमानसूचक असें महादेवी नांव तुला मिळो!' ( बहुमानसूचकं महादेवीशब्दं लभस्व ), 'वीराला प्रसविती हो!' (वीरप्रसविनी भव ) 'नवरा तुझा बहुमान करो!' ( भर्तुर्बहुमता भव ), असे एकामागून एक तीन आशीर्वाद तीन तपस्विनी देतात. तेही आशीर्वाद सफल होणारच. नंतर 'शर्मिष्ठा जशी ययातीच्या अत्यादरास पात्र झाली तशीं तूं दुष्यंताच्या अत्यादरास पात्र हो; शर्मिष्ठेला जसा पुढें सम्राट् होणारा असा पुरु नांवाचा पुत्र झाला तसा तुलाही पुत्र होवो!' असा कण्व आशीर्वाद देतो. शकुंतलेच्या हातून जर कांहीं पाप घडलें असेल तर वैतानाग्नींच्या भोंवतीं तिला प्रदक्षिणा घालावयास सांगून त्या पापापासून तिला तो शुद्ध करितो. सर्वांचे आशीर्वाद, सर्वांचा-तपोवनांतील वृक्ष व वनदेवता ह्यांचा-रुकार मिळूनही शकुंतला सुखाला कांहीं काळ पारखी होते. ह्याचें कारण दुर्वासाचा शाप; ( दुर्वासःशाप एव विकारयति ). तो तिला सारखा

ढळतो. अपशकुनामागून अपशकुन घडतात. घाईघाईनें चालत असतां अनसूयेच्या हातांतून फुलांचें पात्र पडतें; (आवेगस्खलितया गत्या प्रभ्रष्टं मे हस्तात्पुष्पभाजनम् ). आलीच वेळ तर राजाला त्याच्या नांवाची अंगठी दाखीव, असे मैत्रिणीचे शब्द ऐकून तिला कांपरें भरतें; (अनेन संदेहेन वाम् आकम्पितास्मि). राजाकडे जातांना तिचा उजवा डोळा लवतो; (किं मे वामेतरं नयनं विस्फुरति). त्याचें अर्धा शार्ङ्गरवाला राजवाडा आगींत सांपडलेल्या व आगीनें गुरफाटलेल्या घरासारखा दिसतो. बोटांत अंगठी नाहींशी पाहून शकुंतला आपल्या दैवाला दोष देते; ( अत्र विधिना प्रभुत्वं दर्शितम् ). तिला टोंचण्यावर टोंचण्या सोसाव्याला लागतात. पांचसहा वर्षें अज्ञातवासांत घालवावीं लागतात. कारण काय तर दुर्वासाचा शाप; (दुर्वाससः शापादियं तपस्विनी सहधर्मचारिणी त्वया प्रत्यादिष्टा, नान्यथा). हा शाप इतका प्रखर होता कीं त्याचें निवारण कोणाकाही करतां आलें नसतें. कण्व एवढा तपस्वी, तपोबलानें सर्व कांहीं त्याला प्रत्यक्ष, तरी तत्संबंधानें त्यानें चकारही काढला नाहीं. शापाचें नांव काढल्यानें सर्व बिचकतील मात्र; फायदा कोणाचाही होणार नाहीं हें तो जाणून होता. शाप आपला प्रताप दाखविणारच हें त्याला माहीत होतं. पण कोणी म्हणेल कीं, इतकी फटफजीती टाळतां आली असती. दुष्यंत जासूद पाठवीपर्यंत शकुंतलेला आश्रमांतच ठेवून घ्यावयाची होती. आता आठवण होण्याला अंगठी दाखवावयाला पाहिजे होती, तर अंगठी हरवणार नाहीं अशी खबरदारी घेणें जरूर होतें. पण शापाची गति कण्वाला माहीत असलीच पाहिजे. दुर्वासाचा शाप म्हणजे अनिवार्य तीरच; त्याला कोण अडवणार ? अंगठी हरवलीच पाहिजे, शकुंतलेची चौघांदेखत नाचक्की झालीच पाहिजे, विरहव्यथा पांचसहा वर्षें टिकलीच पाहिजे. हें नाटक दैवदुर्विपाकाचें ठळक उदाहरण होय. आम्ही हिंदू दैववादी; (भवितव्यता बलवती, विधिना दर्शितमत्र प्रभुत्वम् )! कालिदास झाला म्हणून काय ! तो दैवाचा तडाखा थोडाच विसरणार ! दैव शकुंतलेचा सारखा पाठलाग करतें. कामवेदना तिला मरणोन्मुख करितात निरुपाय म्हणून गांधर्वविवाह करणें भाग पडतें. कण्वाची वाट पाहणेंसुद्धां मुष्किलीचें होतें. दुष्यंत स्वनगरीला जातो न जातो तोंच तिला विरह पीडूं लागतो. स्वतःचेंही भान राहत नाहीं, मग दुसऱ्याचें कोठून ! अथपासून इतिपर्यंत हा दैवाचा इतिहास होय. शकुंतलेच्या हातून अक्षम्य चूक झाली, त्याचें प्रायश्चित्त तिला भोगावें लागलें असें डॉक्टर रवींद्रनाथ टागोर व डॉक्टर बेलवलकर म्हणतात; पण त्यांचा हा आरोप मला बिलकुल कबूल नाहीं. त्याचीं कारणें खालीलप्रमाणें.

## दुष्यन्ताचें शील.

वैखानस दुष्यंताला पुरुवंशप्रदीप म्हणतो. त्याच्या हातून अयोग्य वर्तन घडावयाचेंच नाहीं अशी त्याची खात्री; ( जन्म यस्य पुरोर्वंशे युक्तरूपमिदं त्वयि ). प्रियंवदा त्याला पौरवांचा अलंकार ( ललामभूतः पौरवाणां ) असें म्हणते. पूज्य पुरुषांमध्यें तूं निखालस पहिला असें आम्हांला माहीत आहे; ( त्वमर्हतां प्राग्रसरः स्मृतोऽसि नः ), असें कण्व विधान करतो. दुष्यंताला आपल्या उच्च कुलाची तीव्र जाणीव असते व डोळ्यांत तेल घालून जरी लोक बघावयाला लागले तरी त्यांस गर्ह्य असें यत्किंचितही सांपडूं नये अशाबद्दल तो काळजी घेतो; (प्रथितं दुष्यंतस्य चरितम् । तथाप्येतन्न लक्षये ). तूं धर्मशील म्हणून ढोंग करतोस, तृणानें आच्छादलेल्या कूपासारखा तूं आहेस; ( धर्मकञ्चुकप्रवेशिनः तृणच्छन्नकूपोपमस्य ), हे शकुंतलेचे शब्द त्याला सहन होत नाहींत. आणाशपथा घेऊन, गोडगोड शब्द बोलून, मला आतां टाकतोस ? हे तिचे शब्द ऐकतांच, असें पाप माझ्या हातून कधींही घडावयाचें नाहीं, ( शान्तं पापं ), असें तो उत्तर देतो. केलेल्या कर्माचा तिटकारा येऊन धर्म-कर्तव्य-ह्याकडे पाठ करणें राजाला शोभतें काय? (किं कृतकार्यद्वेषाद्धर्मं प्रति विमुखतोचिता राज्ञः ), असें शार्ङ्गरव म्हणतो, तेव्हां भलतीच कल्पना करून असा प्रश्न कां विचारतां असें त्याचें उत्तर येतें. मी हिच्याशीं गांधर्वविवाह केला आहे, त्याचा तिटकारा मला आला आहे, तेव्हां कर्तव्यविन्मुख व्हावें झुगारून; असा माझ्यावर आरोप करितां पण तो साफ खोटा आहे. ऐश्वर्यानें बेफाम झाले म्हणजे लोक काय करीत नाहींत ? ( मूर्च्छन्त्यमी विकाराः प्रायेणैश्वर्यमत्तेषु ). हा टोमणा त्याला मर्मी लागतो; ( विशेषेणाधिक्षिप्तोऽस्मि ). दुसऱ्याला गोत्यांत कसें आणावें ही विद्या तुम्ही जन्मापासून पढतां तरी तुमच्या बोलण्यावर विश्वास ठेवावा असें तूं म्हणतोस अं ! असें शार्ङ्गरव जेव्हां टोंचून बोलतो तेव्हां, अहो सत्यवादी, दुसऱ्याला फसवून आम्हांला काय प्राप्ति सांगा पाहूं ? असें राजा विचारतो. नरकप्राप्ति, दुसरी प्राप्ति कोणची पाहिजे ! हें ऐकून पुरुकुलांतले लोक नरकाची वांछा करतात ह्यावर कोणाची तरी श्रद्धा बसेल काय ? असें राजा उत्तर देतो. केवढा कुलाचा अभिमान ! संतति होऊन कुलाचें नांव कायम कसें राहील व पूर्वजांना श्राद्धोदक कसें मिळेल याची त्याला सारखी चिंता लागलेली दिसते.

दुसऱ्या अंकांत ऋषिकुमार त्याला ऋषीसारखा ( ऋषीच ) म्हणतो व राक्षसां-

थासून तुमच्या यज्ञाचें रक्षण करतो असें दुष्यंतानें दिलेलें आश्वासन मिळतांच पूर्वीच्या पौरवांचें अनुकरण करणारा असेंच करील; त्रस्त लोकांस अभय देणें हें पौरवांचें आमरण व्रतच आहे; (आपन्नाभयसत्रेषु दीक्षिताः खलु पौरवाः). दुष्यंत धनुष्य हातीं धरतो तें पीडित प्राण्याचें भय घालविण्याकरितां; (आर्तानां भयमपनेतुमात्तधन्वा), गरीब हरणांवर प्रहार करण्याकरितां तुमचीं शस्त्रें नव्हत; पीडितांचें रक्षण करणें हा त्यांचा उद्देश आहे; (आर्तत्राणाय वः शस्त्रं न प्रहर्तुमनागसि). हे वैखानसाचे शब्द ऐकून दुष्यंत बाण भात्यांत परत टाकतो. आपल्या मुलांबाळांप्रमाणें प्रजेचें रक्षण राजानें केलें पाहिजे; (प्रजाः प्रजाः स्वा इव तन्त्रयित्वा), हें काम विश्रांतीचा विचार मनांत न आणितां त्यानें केलें पाहिजे; (अविश्रामोऽयं लोकतन्त्राधिकारः). स्वसुखाचा विचार न करितां लोककल्याणार्थ झटलें पाहिजे; (स्वसुखनिरभिलाषः खिद्यसे लोकहेतोः). हे कर, ते कर, हीं कपाळाचीं कटकट राजाची कधीं सुटत नाहीं; (राज्ञां चरितार्थता दुःखोत्तरैव). भलत्या मार्गानें जाणारांचें नियमन त्यानें केलेंच पाहिजे; (नियमयसि विमार्गप्रस्थितानात्तदण्डः). प्रजेचा खरा सखा म्हणजे राजा; (त्वयि तु परिसमाप्तं बन्धुकृत्यं प्रजानाम्). कोणीही नातलग जावा त्याच्या जागीं प्रजेला मी आहें अशी द्वाही फिरविण्यास तो आज्ञा करतो; (येन येन वियुज्यन्ते प्रजाः स्निग्धेन बन्धुना । स स पापादृते तासां दुष्यन्त इति घुष्यताम्). शेवटच्या भरतवाक्यांतही राजाचें प्रजाहित हें ध्येय दृष्टोत्पत्तीस येतें; (प्रवर्ततां प्रकृतिहिताय पार्थिवः). त्याचा दरारा सर्व देशभर होता. प्रजेच्या केसाला धक्का लावण्याची कोणाचीही प्राज्ञा नव्हती; (शास्ति कियद् भुजो मे रक्षति मौर्वीकिणाङ्क इति). तुझ्यासारखा रक्षण करणारा असतांना धर्मक्रियेला विघ्न कोठून येणार ? (कुतो धर्मक्रियाविघ्नः सतां रक्षितरि त्वयि), असें जेव्हां शार्ङ्गरव म्हणतो तेव्हां 'राजा' हें पद माझ्याठायीं सार्थ आहे, उगाच पोकळ नांव नाहीं, यानें त्याला अति संतोष व समाधान वाटतें. दुष्यन्त राजा इतका प्रतापी कीं त्याच्या धनुष्याच्या दोरीच्या नुसत्या टणत्कारानें विघ्नें दूर होतात, (हुङ्कारेणेव धनुषः स हि विघ्नानपोहति). दैत्यांशीं झुंजावयाला व लढून जय मिळवावयाला देव त्यालाच पाचारण करतात; (आशंसन्ते समितिषु सुराः सक्तवैरा हि दैत्यैः). त्याच्या पराक्रमाचा इतिहास देव लिहून ठेवतात. (दिवौकसस्त्वच्चरितं लिखन्ति). त्याचा प्रभाव इतका जाज्वल्य होता कीं, आज्ञा मोडणें

हें शार्ङ्गरवाला व पारधीलाही शक्य नव्हतें; ( वासन्तिकैस्तरुभिरपि देवस्य शासनं प्रमाणीकृतं तदाश्रयिभिः पतत्रिभिश्च ). राजधर्म म्हणजे काय व तो कसा पाळावा हें दुष्यंताला पूर्ण माहीत होतें. आपण प्रजेच्या उत्पन्नाचा सहावा भाग जर घेतों तर प्रजेच्या उपयोगीं आपण हरतऱ्हेनें पडलेंच पाहिजे हें तो जाणून होता; ( षष्ठांशवृत्तेरपि धर्म एषः ). शार्ङ्गरवाचा राजधानी व त्यांतील हरएक वस्तु ह्यांविषयीं वाईट ग्रह झाला होता; तथापि राजाला आंखून दिलेली जी मर्यादा तिचें उल्लंघन दुष्यंतानें कधींहि केलें नाहीं असें त्याला कबूल करावें लागलें; (नस्पतिरभिन्नस्थितिरसौ). आपण लोकरक्षण, लोककल्याण ह्यांविषयीं इतकी काळजी वाहतों, तर मग कण्वाकडून कसला निरोप घेऊन शिष्य येत आहेत, तपाला विघ्न तर येत नाहींत ना, तपोवनांतील प्राण्यांची हिंसा तर कोणी करीत नसेल ना, माझ्या वाईट कृत्यांनीं लतावृक्षादिकांची पुष्पफलसमृद्धि तर खुंटली नसेल ना, अशा भलत्या शंका त्याच्या मनांत येतात. तो किती जपून पाऊल टाकी त्याचें हें स्पष्ट उदाहरण आहे.

दुसरें उदाहरण म्हणजे परस्त्रीसंबंधीं त्याचें आचरण. शार्ङ्गरव वगैरे-बरोबर बुरखा घेतलेली तरुण व सुंदर स्त्री पाहून ही कोण बरें असेल असें तो प्रतीहारीला विचारतो व ती, तर्क करून नाहीं सांगता येत, सुंदर मात्र खरी, असें उत्तर देते; तेव्हां परस्त्रीकडे पाहणें पाप आहे (अनिर्वर्णनीयं परकलत्रं ) असें म्हणून तो स्वतःला दाबतो. अशी सुंदर स्त्री आपण होऊन मी तुमची परिणीत स्त्री असें म्हणत असतां राजा विचार करीत बसतो त्याचा प्रतीहारीला चमत्कार वाटतो. दुसरा कोणी धर्म की अधर्म असा विचारसुद्धां करणार नाहीं; (अहो धर्मावेक्षिता भर्तुः) असें तो म्हणतो; कितीहि विचार केला तरी हिच्याशीं आपण विवाह केला असें राजाला बिलकुल स्मरत नाहीं. त्याचें मन गुटमळूं लागतें; ( प्रथमपरिगृहीतं स्यान्न वेत्यव्यवस्यन् ). तिचा तो अकृत्रिम क्रोध पाहून त्याला शंका येते व तो आपल्याला दोष देऊं लागतो; ( विस्मरणदारुणचित्त-वृत्तौ ). शार्ङ्गरवादि जेव्हां शकुंतलेला सोडून जातात तेव्हां परस्त्रीचा स्वीकार मी कसा करूं असें तो विचारतो; ( वशिनां हि परपरिग्रहसंश्लेषपराङ्मुखी वृत्तिः ). घालवून दिली तर बायको टाकली असें दूषण लागतें; ठेवली तर पर-स्त्रीचा अंगीकार केल्याचें पाप लागतें. शकुंतलेला कोणी आकाशचारिणी स्त्री घेऊन गेली असें ऐकून परस्त्री म्हणून तिचा आम्ही आधींच त्याग केला आहे.

( प्रागपि सोऽर्योऽस्माभिः प्रत्यादिष्टः ). हिच्याशीं विवाह केल्याचें मला मुळीं स्मरत नाहीं असें तो म्हणतो. अधर्माला भिऊन त्यानें शकुंतलेला टाकून दिली ( अधर्मभीरोः ), असें सानुमतीला कबूल करावें लागतें. हेमकूट पर्वतावर अनेक कारणांनीं सर्वदमन आपला मुलगा अशी त्याची खात्री होते व त्या मुलाची आई कोण असें विचारावेसें वाटतें तरी तो स्वतःला दाबतो; (अन्याय्यः परदारपृच्छाव्यापारः ).

पहिल्या अंकांत शकुंतलेला पाहतांच तिजविषयीं त्याच्या मनांत अभिलाष उत्पन्न होतो. पण ही ब्राह्मणाची मुलगी असली तर ! अभिलाष दाबून, नाहींसा करून टाकण्याचें त्याच्यांत सामर्थ्य होतें आणि त्यानें तो खास दाबून टाकला असता, किंबहुना त्याचा नायनाट केला असता. तो आपल्याला वशी म्हणतो; इंद्रियदमन करणें त्याला शक्य होतें. पण पौरवांचें मन भलताच अभिलाष धरीत नाहीं; ( न खलु परिहार्ये वस्तुनि पौरवाणां मनः प्रवर्तते ). मी आर्य आहें व माझ्यासारख्यांच्या मनांत संशय उत्पन्न झाल्यास त्याचा निर्णय मनच करतें: मन जिकडे ओढा घेईल ती गोष्ट चांगली असलीच पाहिजे, ( सतां संदेहपदेषु वस्तुषु प्रमाणमन्तःकरणप्रवृत्तयः ), असें त्याला वाटतें. शकुंतला कण्वाला इतर वर्णाच्या स्त्रीपासून झाली असेल काय असें तो प्रथम स्वतःला विचारतो. पण ही ब्राह्मणी आहे असें मानण्याचें कारणच नाहीं, ज्याअर्थी माझ्या मनांत हिजविषयीं अभिलाष उत्पन्न झाला आहे त्याअर्थी क्षत्रियानें हिला वरण्यास कांहीं हरकत नाहीं; असें म्हणून तो शंकेचें निवारण करतो. पण एवढ्यानेंच तो थांबत नाहीं. खरें काय आहे हें शोधलेंच पाहिजे असें म्हणून तो स्वस्थ बसतो. पुढे त्याला खरी हकीकत कळते तेव्हां त्याची खात्री होते; ( संदेह-निर्णयो जातः ), व जी केवळ विस्तवच असें वाटत होतें तें स्पर्शक्षम रत्न आहे ( आशङ्कसे यदग्निं तदिदं स्पर्शक्षमं रत्नम् ), म्हणून अभिलाषाला तो मनांत थारा देतो. कित्येक दुष्यंताला घमेंडखोर म्हणतात, बोलून चालून माणूस, इतकी आत्मप्रौढी कशाला ? पण ही पोकळ फुशारकी नाहीं हे तें विसरतात. फुशारकी लोकापाशीं मारतात; स्वतःला कोण फसवील ? दुष्यंत हा निःसंशय कुलानें व शीलानें उत्तम कोटींतला मनुष्य आहे. आपल्या हातून चूक व्हावयाचीच नाहीं अशी त्याची स्वतःची समजूत. कालिदासाच्या ह्या नाटकांत सहज प्रेरणेला ( intuition अथवा instinct ) अग्रस्थान दिलें

आहे. तर्कबुद्धि या प्रेरणेला नुसता पाठिंबा—पाठिंब्याची जरूर नसतां—देते. दुष्यंत व शकुंतला यांचें प्रथमदर्शनींच एकमेकांवर प्रेम जडतें. त्यांत दर्वीला वावगें कांहीं दिसत नाहीं. अशा प्रेमाचें पर्यवसान सुखांत झालेंच पाहिजे. वर्ड्स्वर्थनें म्हटल्याप्रमाणे प्रेम हाच न फसविणारा मार्गदर्शक दिवा; (Love is an unerring light); व त्या प्रेमापासून होणारा आनंद हा सात्त्विकच (Joy its own security). हा न्याय कलियुगांत लागू नाहीं. त्याचा अंमल कृतयुगांत. निष्पापबुद्धीच्या माणसांत अशा प्रेमाचा संभव व अशा शुद्धप्रेमापासून होणारा आनंदही शुद्धच. दुष्यन्त व शकुंतला हीं दोघेंही निष्पाप, त्यांचें प्रेम शुद्ध, तर मग त्यांच्या प्रेमाचा असा विरस कां व्हावा ? याचें उत्तर शकुंतलेच्या स्वभाववर्णनानंतर देणें बरोबर होईल. दुष्यंताच्या स्वभावांतील आणखी कांहीं गोष्टी सांगणें जरूर आहे.

प्रेमसिद्धीच्या आड येणाऱ्या गोष्टी त्याला ठाऊक होत्या. कण्व घरीं नाहीं, ती परतंत्र, तेव्हां काम सकाम होणें कठीण. शिवाय ती मजवर प्रेम करते हें तरी कशावरून ? कामी मनुष्याला प्रेमपात्रानें केलेलें सर्व कांहीं मलाच उद्देशून केलें आहेसें वाटतें. पण यांत त्याची चूक होत नसेल कशावरून ? सख्या जेव्हां कुणाकरितां तूं इतकी झुरते आहेस असें विचारतात तेव्हां, नेकूं ? कां नको ? कदाचित् दुसऱ्यावर हिचें प्रेम बसलें असेल; ( अत्रान्तरे श्रवणकातरतां गतोऽस्मि ) अशी त्याला भीति वाटते. पण शकुंतलेचें उत्तर ऐकून त्याचा जीव खालीं होतो. कामानें दोघें वेडावून गेलीं तीं एकदोन दिवसांच्या अवधींत नव्हत. तशी स्थिति येण्याला कित्येक अठवडे गेले असले पाहिजेत तपोवनांत दुष्यंत राहिला होता तो केवळ शकुंतलेकरतां राहिला नव्हता. कण्व दुसरीकडे गेल्यामुळें राक्षस यज्ञाला विघ्नें करीत होते. तेव्हां कांहीं दिवस तूं यज्ञाचें रक्षण कर असें ऋषिकुमारांनीं सांगितल्यावरून तो तपोवनांत राहिला होता. राहिल्या वेळांत तो शकुंतलेविषयीं विचार करी व तोही गुप्तपणें. तिसऱ्या अंकांत दोघांची गांठ पडते, पण शकुंतला दुष्यंताला सलगी करूं देत नाहीं. गौतमी येते त्यामुळें दोघांची पांगापांग होते व दुष्यंतालाही राक्षसांना हाकलून द्यावयाला जावें लागतें. शारीरतृप्ति जितकी दूर ठेवितां येईल तितकी दूर ठेविली जाते. ही शारीरतृप्ति तिसऱ्या व चौथ्या अंकाच्या दरम्यान केव्हां तरी दोघें करून घेतात व तीही विधिपूर्वक—गांधर्वविवाह उरकून.

आईचा निरोप येतो तेव्हां तो गोंधळतो. यज्ञरक्षण केलेंच पाहिजे. पण आईची आज्ञा मोडतां येत नाहीं. अखेर विदूषकाला पाठवून देतो. केवळ शकुंतलेकरितां तपोवनांत त्याला राहतांच आलें नसतें.

तो विनयशील होता म्हणून साधा पोषाख घालून ( विनीतवेषेण ) तपोवनांत जावें असें त्याच्या मनांत आलें. इंद्रानें केलेल्या सत्कारानें तो अगदीं दडपून जातो व आपण कांहींच केलें नाहीं असें त्याला वाटतें. इतकी मी मेहेनत करितों, दोष दिसला कीं काढून टाकतों, तरी चित्राला तिच्या लावण्याची यत्किंचितही सर येत नाहीं हे त्याचे शब्द ऐकून सानुमती त्याच्या निगर्वीपणाची स्तुति करते; ( सदृशम् अनवलेपस्य ). जेथें तेथें नागरिकत्वाचीं, दाक्षिण्याचीं उदाहरणें दृष्टीस पडतात व कवीचा विनोदी स्वभाव त्याच्यांत तंतोतंत उतरला आहेसें दिसतें. असा सर्वगुणसंपन्न राजा दुष्यंत होता. दोषाला ( अवगुणाला ) त्याच्यांत जागाच नव्हती. त्याची आकृति पाहून त्याच्या हातून भलतें वर्तन होईल अशी लोकांना कल्पनाच करवत नसे; ( न तादृशा आकृतिविशेषा गुणविरोधिनो भवन्ति ). लोक नेहमी चेहऱ्यावरून अनुमानें बांधतात. त्याला पाहिल्याबरोबर त्याची आकृतिच सांगते कीं तो शूर असला पाहिजे; (संभावनीयानुभावास्याकृतिः ) असें अदिति म्हणते. एवढ्या मोठ्या पृथिवीचें हा पालन करितो, देव दैत्यांशीं लढतांना ज्याच्या कर्तबगारीवर जयाची आशा करतात त्यांत नवल तें कोणचें ? नगरपरिघासारखे ज्याचे बाहुच सांगतात हा काय करील तें. असा गुणनिधि कालिदासानें आपल्यापुढें उभा केला आहे.

## शकुंतलेचें शील.

ही तपोवनांतल्या वृक्षांना भावांप्रमाणें मानते. केसरवृक्ष पल्लव हलवून आपल्याला बोलावीत आहेसें तिला वाटतें. नवमालिका आम्रवृक्षावर वाढलेली पाहून ती त्यांचा विवाह करते व वनज्योत्स्ना असें तिचें सासरचें नांव ठेवते. ती तिला जीव कीं प्राण करते. तिला विसरणें म्हणजे स्वतःलाच विसरण्यासारखें होय. झाडांना पाणी घातल्याशिवाय आपण पाणी प्यावयाचें नाहीं. स्त्रियांना अलंकारांची किती तरी आवड! तरी ती आवड दूर सारून ती त्यांचें पानही तोडीत नाहीं! झाडांवर फुलें दिसावयाला लागल्याबरोबर तिला आनंदच आनंद! काय तें झाडांवर व पशुपक्ष्यांवर प्रेम! ही गर्भिणी मृगवधू ( हिचें सुद्धां शकुंतलेनें मृगाशीं लग्न लाव-

केलें दिसतें ) गर्भभारामुळें हळूं हळूं चालली आहे; व्यायली म्हणजे मला कोणाच्या हातीं कुशलसमाचार बाबा कळवा आं ! म्हणून म्हणते. वनज्योत्स्ने, तिकडच्या शाखांनीं आम्हाला कवटाळलें आहेस, इकडच्यांनीं मला कवटाळ कशी, असें म्हणून वनज्योत्स्नेला मैत्रिणींच्या हवालीं करते. पुत्र मानलेला मृगशाव, बिचाऱ्याची लहानपणींच आई मेली, त्याचे तोंडांत इंगुदीतैल ओतून तोंडाला झालेले व्रण शकुंतला बरे करते, मूठमूठ सावा खावयाला घालून त्याला वाढविते. तो कां नाहीं बरें नेसूंचें वस्त्र ओढणार ! त्याला सोडून जाणें तिच्या जिवावर येते ! झाडांचें व तेथील प्राण्यांचें काय तें तिजवरील प्रेम ! कोकिलरवानें वृक्ष तिला सासरीं जाण्यास हुकार देतात ! वनदेवता अतिशय गोड शब्दांनीं, तुझा प्रवास सुखकर होवो ! असें म्हणतात. ही झाली झाडें, वेली व पशुपक्ष्यादिकांची कथा. काय तें मैत्रिणींवरचें प्रेम ! मला दोघीजणी एकदम कवटाळा असें ती म्हणते ! बाबा, तुमच्यापासून मी दूर गेलें म्हणजे माझें कसें हो होईल ? पुन्हां हें तपोवन मला दिसेल काय ? तपाच्या कष्टानें तुमचें शरीर आधींच झिजलेलें, माझ्याकरितां बाबा कष्टी होऊं नका आं ! म्हणून म्हणते. पण बिचारा कण्व कष्टी होणार नाहीं तर काय ! घरींदारीं जिकडे तिकडे तिच्या प्रेमाचीं व कृतींचीं चिन्हें ! शकुंतले, तूं मूर्तिमंत प्रेमच !

काय तो तुझा भोळेपणा ! जिथें इतर खात्री पटविणारीं प्रमाणें खुंटलीं तिथें, हस्तिनापुरच्या वनिताहस्तात तूं हस्तिबालक माझ्या हातचें पाणी प्यायला, तुझ्या हातचें पिईना, त्या आठवणीचा काय उपयोग !

इतकी जरी तूं साधीभोळी, प्रेमानें जरी इतकें तुला पछाडलें तरी दुष्यंताला तूं सलगी करूं दिली नाहींस, शरीरतृप्तीकरितां मर्यादातिक्रमण केलें नाहींस, गांधर्वविधीनें लग्न करणें गर्ह्य नाहीं, शास्त्रसंमत आहे, अशी खात्री झाल्यावरच लग्न लाविलेस, पातिव्रताधर्म ओळखून दुष्यंतानें तुला टाकलें असतांनाही त्याच्याकरितां विरहदुःख करीत राहिलीस, मळकट वस्त्रें परिधान केलींस, एकपेढी वेणी ठेविलीस ! दुष्यंताला दुसरे व्यवसाय तरी होते, पण तुला विरंगुळा कशानें पडणार !

आपल्या पवित्र आचरणाची तुला इतकी चाड कीं दुष्यंतालासुद्धां अनार्य, कितव, धर्मकंचुकप्रवेशी अशीं नांवें ठेवणें तुला भाग पडलें. आर्य स्त्रीला पाति-

नस्याशिवाय दुसरें कोणचें भूषण ! वसुंधरे आई, घे पोटांत, असें आर्यस्त्री म्हणेल व तसेंच शकुंतला म्हणाली.

शकुंतलेला दोष द्यावयाला आमचे जवळ पुरावा नाहीं. ' शकुंतला मूर्तिमती सत्क्रिया ' असें कण्व म्हणतो. त्यानें दोष देणारा निरुत्तर झालाच पाहिजे. अशीं वधूवरें एके ठिकाणीं कधीं काळींच येतात.

तुला योग्य अशा ज्या वराला तुला देण्याचें मीं ठरविलें होतें तोच पूर्वपुण्याईनें तुला पति मिळाला: (संकल्पितं प्रथममेव मया त्वदर्थं भर्तारमात्मसदृशं सुकृतैर्गता त्वम् ). त्यामुळें माझी चिंता आतां नाहींशी झाली. धुरानें दिसत नाहींसे झालें तरी यजमानानें दिलेली आहुति जशी अग्नींतच पडावयाची तशी तूं योग्य ठिकाणींच पडलीस. चांगल्या शिष्याला दिलेल्या विद्येबद्दल जसा गुरूला खेद वाटत नाहीं तसा योग्य मनुष्याला तुला दिल्यामुळें मला खेद वाटत नाहीं. शकुंतला ही श्रद्धा, दुष्यंत हा विधि, असें मरीचि म्हणतो. श्रद्धेनें केलेलें कर्म फलदायक होतें. शकुंतला व दुष्यंत या जोडप्यापासून जगाचें कल्याणच झालें पाहिजे. कण्व शकुंतलेला यत्किंचितही दोष देत नाहीं. हिनें फार घाई केली, मर्यादपणा केला, हिला केलेल्या कृत्याचें प्रायश्चित्त भोगावें लागेल असें त्याच्या बोलण्यांत कोठेंही ध्वनित होत नाहीं. खुद्द आकाशवाणी, झालेलें शुभवर्तमान, त्याला कळविते. दुष्यंतानें दिलेला गर्भ जगाच्या कल्याणाकरितां शकुंतला धारण करीत आहे असें ती म्हणते. लग्नाबद्दल सर्वत्र आनंदीआनंद ! वृक्ष उत्तम वस्त्रें, उट्या, उत्तम अलंकार पुरवितात; सासरीं जायला निघाली तेव्हां ते कोकिलरवानें रुकार देतात; वनदेवतांची अनुमति मिळते. अशी जिथें एकवाक्यता तिथें शकुंतलेला दोष कोणत्या आधारावर लावणार ! तिला दोष दिलला ऐकून जसा शार्ङ्गरव याला क्रोध येतो व त्या क्रोधावेशांत तो जसा कडक, स्पष्ट शब्दांनीं राजाची निर्भर्त्सना करतो तशी आमची स्थिति होते. शकुंतला व दुराचरण किंवा अविचारी आचरण यांची त्याला जशी सांगड घालतां येईना तशी आम्हांलाही घालतां येत नाहीं. प्रेम हा खरा मार्गदर्शक दिवा व त्यापासून होणारा आनंद शुद्धच, असें शकुंतलेविषयींही म्हटलेंच पाहिजे. तर मग सुखाला प्रत्यवाय कां आला हा प्रश्न साहजिक उत्पन्न होतो. त्याला उत्तर शकुंतलेनेंच दिलें आहे. दुष्यंतानें जेव्हां मला टाकलें तेव्हां मागें केलेलें पाप माझ्या आड आलें. पूर्वपुण्याईनें प्रेम जडून आलें, पण लग्न होतें न होतें तोंच केलेल्या पापाला फलोन्मुख व्हावयाला सुरवात झाली व त्याची

पूर्णता त्यागांत व विरहांत झाली: ( नूनं मे सुचरितप्रतिबन्धकं पुराकृतं तेषु दिवसेषु परिणाममुखमासीत् ), असें शकुंतला दुष्यंताला म्हणते. जात्या इतके दयाळू तरी मजबद्दलची दयामाया सर्व विसरलांत. हें कां, तर माझ्या हातून कांहीं अपराध घडला असला पाहिजे म्हणून. नेहमींचें चांगलें वर्तन (सुचरित) त्याला अडविणारें वाईट वर्तन म्हणजे दुर्वासाचा—अजाणपणें कां होईना—केलेला अपमान. तो योग्य वेळीं फल देणारच. त्याला प्रारंभ तपोवनांतच झाला. दुष्यंत शकुंतलेला अज्ञानात विसरला. पत्र. जासूद वगैरे कांहीं नाहीं. राजधानींत ती समोर उभी असतांनाही तिची ओळख पटेना. तुझा माझा संबंध नाहीं असें त्याला निष्ठुरपणें तिला सांगावें लागलें. फलाचा शेवट व्हावयाला पांच सहा वर्षे लागलीं. रघुवंशकाव्याच्या आरंभींच वसिष्ठ दिलीपाला म्हणतो, पूज्यांचा अनादर कल्याणाच्या आड येतो: ( 'प्रतिबध्नाति हि श्रेयः पूज्यपूजाव्यतिक्रमः' सर्ग १, श्लोक ७९ ). शकुंतला शुद्धीवर असती तर दुर्वासाचा अपमान झालाच नसता. थोडक्याच दिवसांत दुष्यंताचे जासूद तिला नेण्यास आले असते. दुष्यंत जर इतर राजांच्यासारखा पाजी असता तर शकुंतला टाकून देणें त्याच्या ठायीं संभवनीय झालें असतें. पण कवीनें तो अत्युच्च, उदात्त, दयाशील, कर्तव्याला जागणारा असा दाखविला आहे. त्याचें मन गुटमळतें, तो विचार करीत बसतो, तथापि त्याला आठवत नाहीं. शेवटीं तो तिजविषयींचा सगळा विचार टाकून देतो. अंगठी सांपडल्याबरोबर सर्व कांहीं आठवतें. मनाला हुरहुर लागते; ( पर्युत्सुकमना आसीत् ). तिच्या प्रतिकृतीवर प्रेम करूं लागतो, शोक करून करून बेशुद्ध पडतो. आपण शकुंतलेला कसें विसरलों याचें त्याचें त्यालाच नवल वाटतें: ( मयैव कस्मादवधीरिता प्रिया ). ही समोर उभी असतांना आठवू नये, अंगठी पाहिल्याबरोबर आठवण व्हावी हें सगळें विचित्र दिसतें, याचा उलगडा मला होत नाहीं. धडधडीत हत्ती पुढें असतांना हा हत्ती नव्हे अशी समजूत व्हावी, तो दृष्टीआड होतांच संशय उत्पन्न व्हावा; पावलें पाहून, हत्ती रे हत्ती ! अशी खात्री व्हावी; असांतला हा प्रकार झाला असें तो मारीचास म्हणतो. ही हत्तीएवढी (घोड्याएवढीच नव्हे) चूक खात्रीनें—अगदीं अक्षम्य, अनिर्वचनीय. तूं केलेस यांत तुझा अपराध नाहीं. खरी गोष्ट अशी आहे असें म्हणून तो दुर्वासाच्या शापामुळें हिला तुला टाकावी लागली असें त्याचें समाधान करतो. तर मग माझ्याकडे दोष नाहीं, असें म्हणून राजा समाधानाचा सुस्कारा टाकतो. सानुमतीला हा शाप

माहीत नसल्यामुळें दुष्यंताला विस्मरण व्हावें व तें विस्मरण अंगठी पाहून नाहीसें व्हावें ह्याचेंच तिला आश्चर्य वाटतें. सामान्यजनांची तर राजा कपटी आहे अशीच समजूत होत. नगरीं गेल्यावर इकडचें त्याला स्मरण होईल कीं नाहीं असें अनसूया विचारते. कांहीं दिवस गेल्यावर राजाकडून पत्र वगैरे कांहीं येत नाहीसें पाहून शकुंतलेला त्यानें फसविलें, लबाड मेला ! असे उद्गार ती काढते व शकुंतलेलाही ती नांव ठेवते. शार्ङ्गरव सामान्य जनांप्रमाणेंच राजाची निर्भर्त्सना करतो. खुद्द शकुंतलाही तसली भाषा वापरते. खरी स्थिति माहीत नसल्यानें नेहमीं आपण अशीं मतें ठोकून देतों. पण कण्व व मरीचि हे खरी स्थिति जाणून होते.

शाकुंतलांतल्या सर्व गोष्टी अलौकिक आहेत. ऋषींचें अन्तर्ज्ञान, त्यांच्या खऱ्या होणाऱ्या उक्ति, शकुन, अपशकुन, तिरस्करिणीविद्या, स्वर्ग, हेमकूटदर्शन—जो स्वर्गाहूनही अधिक मनःस्वास्थ्य देतो, जेथें अमृताच्या डोहांत डुबत असल्याचें वाटतें, कण्वाचें तपोवन,—जेथें वृक्ष, पशु, पक्षी, माणसें, वनदेवता ह्यांचा एकजीव समाज बनतो, शकुंतला,—जिच्यासारखी स्त्री इतर श्रेष्ठ कवींना मुद्दां निर्माण करता आली नाहीं; सर्व कांहीं अलौकिक ! अशा सृष्टींत आमच्या कांजव्यासारख्या तर्कानें शिरून दोष काढीत बसूं नये. दुष्यंताला कदाचित्—तो पुरुष म्हणून—दोष देतां येईल. पण शकुंतले ! तुला दोष देण्याचें पाप आमच्या हातून घडावयाचें नाहीं. वाटांत अंगठी नाहीं अशी पाहून तूं कावरी बावरी होतेस, त्याबरोबर आम्हांही कावरे बावरे होतों. शार्ङ्गरवाप्रमाणें दुष्यंताला खाऊन टाकावेसें वाटतें. तुझे हाल आम्हांस पहावत नाहींत. शकुंतले ! अनसूया व प्रियंवदा तुला पुन्हां भेटल्या काय ? मुलाला गादीवर बसवून वृद्धपणीं दुष्यंतासह तूं तपोवनीं येशील असें कण्व म्हणाला. पितृवत्सल तूं; खात्रीनें पित्यापाशीं थोडासा काळ घालविला असशील ! तुझ्या येण्यानें तपोवनांतील वृक्ष व वनदेवता ह्यांना किती तरी आनंद झाला असेल ! अनसूया व प्रियंवदा सासरहून आश्रमांत तुला भेटण्यासाठीं मुद्दाम आल्या असतील नाहीं ? तुम्हां तिघींच्या किती तरी गुजगोष्टी चालल्या असतील ! वनज्योत्स्नेनें एका अंगानें आम्राला तर दुसऱ्या अंगानें तुला कवटाळलें असेल. मृगवधूला किती तरी नातवंडें, पंतवंडें झालीं असतील ! आई व तूं ह्यांनीं विरहित झालेला मृगबालक कितीतरी मोठा झाला असेल ! त्याच्या लग्नाच्या वेळीं तूं हजर असलीच पाहिजेस. कदाचित् वधूही

-सून निवडली असतील. पण कविवर्यांनीं ह्यासंबंधीं मुग्धताच स्वीकारिली, त्यामुळें आम्हांला तर्क करूनच समाधान मानावें लागत आहे !

शाकुंतलेची भूमिका घेणें फार अवघड काम आहे. तिचा स्वभाव कोण-च्याही नटाच्या लक्षांत येणार नाहीं. त्याचें अनुकरण करणें तर बाजूलाच. क्लिओपेट्रा मरावयाच्या आधीं म्हणते, " रोमला नेऊन रस्त्यांतून लोक माझी धिंड काढतील; कोणी चाहटळ नट माझी भूमिका घेऊन मी एका मोठ्या देशाची राणी नसून एखादी बाजारबसवी होतें असें प्रेक्षकांना दाखवील, त्यापेक्षा विष खाऊन येथल्या येथें मरणें बरें ! क्लिओपेट्रा इतकी नखरेबाज, इतकी लहरी, मी मी म्हणणाऱ्या सीझरॲंटनीसारख्यांना अंकित करणारी, तिचा तो अल्लड-पणा, भररस्त्यांत नाचणें बागडणें, हास्य, हसित, सर्वांना मोहनी घालण्याची कला, तो क्रोधाचा झंझावात, इतके बहुरंग कोणा नटाला दाखवितां येतील ? हेही एखादा हुशार नट दाखवूं शकेल. पण शकुंतलेची प्रतिमा कोणचाही नट उठवूं शक-णार नाहीं. ही खरी कवींची करामत !

## डॉ० रवीन्द्रनाथ टागोर

शाकुंतल वाचून जर्मन कवी गह्टे ह्याला इतका कांहीं आनंद झाला कीं, आनंदाच्या भरात त्यानें पुढील उद्गार काढले:—जो शब्द उच्चारितांच ' वसं-ताचा बहर; शारदी फलसंपत्ति; ज्या ज्या वस्तूंनीं आत्मा उल्हासित होतो, तल्लीन होतो, तन्मय होतो, आनंदाच्या परमावधीला पोंचतो, त्या वस्तु; भूमि व स्वर्ग; हीं सारीं एकदम पुढें उभीं राहतात, तो शब्द कोणचा म्हणशील तर शाकुंतल ! जिकडे तिकडे सौंदर्यच सौंदर्य ! पहिल्या अंकांतील शकुंतला व दुष्यंत ह्यांची पहिली भेट, तिसऱ्या अंकांतील त्यांची परस्परांविषयींची आतु-रता; चौथ्यांत सासरीं पाठविण्याची तयारी, सहाव्या अंकांतील दुष्यंताच्या विरहयातना व सातव्यांतील हेमकूटावरील नवराबायकोची कायमची गांठ, ह्या सगळ्या गोष्टी सृष्टिसौंदर्यांत घडतात, ह्या विविध सौंदर्यानें सहृदय वाचक मोहून जातो, ' असें गह्टे म्हणतो. ह्या प्रशंसोद्गारांत अतिशयोक्ति कोठेंही नाहीं. प्रशंसा योग्य व अक्षरशः खरी आहे. पहिल्या अंकापासून चौथा अंक संपेपर्यंत वसंताचा बहर दिसतो; चौथ्यांत वृक्षांनीं अर्पिलेलीं वस्त्राभरणें; कोकिल-रवानें दिलेला हुकार; वनदेवतांचा आशीर्वाद; वनज्योत्स्ना, मृगवधू, मृगशावक,

प्रियंवदा व अनसूया ह्यांना शकुंतलेने दिलेले आलिंगन; कण्वाचा बाष्पांनी दाटलेला कंठ; ह्या अंकातील प्रत्येक गोष्ट अश्रु आणतेच आणते, ह्यांनी आत्मा सचंचळतो, तल्लीन होतो, आनंदाच्या परमावधीला पोंचतो! सहाव्यांत वसंत आहे आणि नाहींही! येथें भूभाग संपतो. दुष्यंताबरोबर आपण स्वर्गाला जाऊन खालीं हेमकूटावर उतरतो. तेथें शारदीफलसमृद्धि आहे पण ती भोगावयाची नाहीं. गटे खरा कवी होता. हें विविध सौंदर्य पटकन् त्याच्या ध्यानांत आलें. त्यानें हॅमलेटचें मर्म सांगितलें. पण शाकुंतलांतील मर्म काढण्याचा त्याचा हेतु नव्हता. तो सौंदर्यानें चकित झाला व त्यामुळें त्याला दुसरें कसलेंही भान राहिलें नाहीं.

डॉक्टर टागोर म्हणतातः—ऐहिक सुखांत रत झालेला आत्मा आपला अधःपात ओळखून पारमार्थिक सुखाकडे वळतो, भौतिक सुख अशाश्वत व खोटें, आध्यात्मिक शाश्वत व खरें, जड टाकून देऊन चित्-कडे आत्मा धांव घेतो हा आध्यात्मिक इतिहास. ही आध्यात्मिक उत्क्रांति ह्या नाटकांत कवीनें दाखविली आहे, असा गट्टाच्या प्रशंसेचा अर्थ. दुष्यंत व शकुंतला ह्यांचें परस्परांवरील प्रेम शारीरिक होतें, कामवासना ( Lust ) तृप्त करणें एवढेंच त्या प्रेमाचें कार्य होतें. प्रेम झालें ते दोन शरीरांचें, आत्म्यांचें नव्हे. त्यामुळें हें प्रेम टिकाऊ नव्हतें. दुष्यंत कोण, काय व कसा ह्याची शकुंतलेनें चौकशी करावयाची होती. कण्वाची वाट पाहणें तिचें कर्तव्य होतें. एकदम दुष्यंताला वश झाली हा तिचा मूर्खपणा व अधःपात किंवा नैतिक भ्रंश. ह्या घाईचे परिणाम तिला भोगावे लागतात. दुष्यंत तिला झिडकारतो. तेव्हां ती पस्तावा पावते व हेमकूटावर पापक्षालन करिते. दुष्यंत हा मजा मारणारा मनुष्य! एका स्त्रीला टाकून दुसरीच्या पाठीमागें लागणारा! केव्हांना केव्हां तरी शकुंतलेला टाकणारच! दुर्वासाचा शाप हें केवळ मिष आहे! राजा बदफैली हें खरें कारण! त्याचा हा चंचल स्वभाव न जाणल्यामुळें शकुंतला फशीं पडली. दुष्यंत चंचल स्वभावाचा होता हें चुटपुरतें कवीनें पांचव्या अंकाच्या आरंभीं दाखविलें आहे. हंसपदिकेच्या गाण्याचा अर्थ तुझ्या लक्षांत आला काय असें विदूषक विचारतो तेव्हां राजा म्हणतो, मी राणी वसुमतीवर प्रेम करतो, त्यामुळें हंसपदिका मला टोंचीत आहे. एकीला टाकून दिलें तेव्हां दुसरीला टाकणारच हा अर्थ ह्या गाण्यांत ध्वनित होतो. टाकल्यानंतर शकुंतला कण्वाकडे जात नाहीं. कोणच्या तोंडानें ती तिकडे जाणार! भलत्याच ठिकाणीं

खी आलें असें तिला वाटलें असतें. जेथें कोणी आपल्याला ओळखणार नाहीं असें ठिकाण तिला पाहिजे होतें. इतकेंच नव्हे तर संसारी जगाचा जेथें संबंध येणार नाहीं असें ठिकाण तिला हवें होतें. तें ठिकाण म्हणजे हेमकूट. एथें शकुंतला व्रतनियमांत काळ घालविते. कालेंकरून दुष्यंतालाही पश्चात्ताप होतो. तो सर्व सुखोपभोग टाकून देतो. शकुंतलेप्रमाणें त्यालाही एक प्रकारची तपस्या करावी लागते. ह्या तपस्येमुळेंच दोघांचे स्वभाव शुद्ध झाले व शकुंतलेची खरी ओळख राजाला झाली.

राजधानींत आल्याबरोबर जर बिनहरकत तिचा अंतःपुरांत प्रवेश झाला असता तर अंतःपुरांतील इतर स्त्रियांप्रमाणेंच तिची गत झाली असती. महाराणीपद तिला कधींही मिळालें नसतें. कारण इतकी पात्रताच तिच्या अंगीं आली नसती. दुष्यंतानें तिला टाकली हें एक प्रकारें बरें झालें. दोघांनाही स्वतःची व एकमेकाची खरी ओळख झाली. दोघांनाही दुःख सोसून अनुभव आला. स्वभाव शुद्ध होण्याला दुःख हा रामबाण उपाय आहे. दुर्वासाचा शाप, अंगठी सांपडणें ह्या केवळ नाटकाकरितां कल्पना !

खरें कारण म्हणजे दोघांच्या स्वभावांतले दोष. हे दोष जेव्हां दुःखाश्रूंनीं धुतले जातात तेव्हां प्रेमाचा ऐहिकपणा, शारीरत्व जाऊन त्याला स्वर्गीय स्वरूप किंवा आध्यात्मिकता प्राप्त होते. शारीर प्रेम ह्यांत सुख आहे. तेथेंही एक प्रकारचा स्वर्ग आहे, पण तेथील वसति अशाश्वत होय. हा स्वर्ग गमावणें (Paradise Lost) इष्ट आहे; त्याशिवाय उच्च स्वर्गाची प्राप्ति (Paradise Regained) होणें अशक्य आहे. नुसत्या सौंदर्यानें मोहून जाऊं नये, प्रेमाला कडक नैतिक बंधनांनीं आवळलें पाहिजे, प्रेमाला हवें तसें वावरूं देतां कामा नये, तें ताब्यांत ठेवलें तरच आपलें व जगाचें कल्याण होतें. बंधनें झुगारून देणें म्हणजे जगाला झुगारून देणें. दुष्यंत व शकुंतला ह्यांनीं आपल्यापुरतें पाहिलें, तात्पुरता विचार केला, परिणामाकडे लक्ष दिलें नाहीं, त्यामुळें त्यांना पस्तावा झाला. वडील माणसांचा त्यांनीं सल्ला घ्यावयास पाहिजे होता. त्यांची संमति मिळविणें हें त्यांचें कर्तव्य होतें. दोघें कर्तव्य विसरलीं म्हणून दुःख सोसावें लागलें. ही गोष्ट कालिदासानें शाकुंतलनाटकाच्या द्वारें जगाच्या निदर्शनास आणिली आहे.

## डॉक्टर बेलवलकर.

डॉ० बेलवलकर ह्यांनीं डॉक्टर टागोरप्रमाणेंच दुष्यंत व शकुंतला ह्यांचें प्रेम आरंभीं उच्च प्रतीचें नव्हतें असें प्रतिपादन केलें आहे. ह्या प्रश्नाचा त्यांनीं फार बारकाईनें विचार केलेला दिसतो. प्रस्तावनेंतील ' इममेव अचिरप्रवृत्तम् उपभोग-क्षमं ग्रीष्मसमयं ' ह्यांतील उपभोगशब्दावर विशेष जोर देऊन शकुंतला व दुष्यंत हीं दोघेंही आरंभी उपभोगाच्या पाठीमागें लागलीं होतीं. दुष्यंत बोलून चालून उल्ल. तारुण्य व सत्ता ह्यांनीं ताठलेला. आपण जें म्हणूं तें लोकांनी ऐकलेंच पाहिजे, आपल्या कामवासनादिक सर्व इच्छा ताबडतोब पूर्ण झाल्याच पाहिजेत, आपण सज्जन, आपल्या मनाला जें आवडेल तें निर्दोष, आपलें मन भलत्या मार्गाकडे जाणार नाहीं अशी त्याची बालंबाल समजूत. काय ही घमेंड ! आणि चमत्कार हा की सर्व कांहीं त्याच्या इच्छेप्रमाणें घडून येतें ! शकुंतलेच्या क्षत्रियत्वाविषयीं मानसिक प्रमाणाखेरीज त्याला बाह्य प्रमाण मिळतें. ती कोणाची मुलगी वगैरे सर्व हकीकत त्याला प्रियंवदेकडून कळते. शकुंतला त्याच्यावर प्रेम करिते. तपोवनांत यज्ञरक्षणार्थ रहावयाला ऋषिलोक त्याला बोलाविनात. कामतृप्तीच्या कामांत शकुंतलेच्या सख्या त्याला मदत करितात. उपभोगाच्या आड कांहींच येत नाहीं.

शकुंतलेला सुद्धां उपभोगाशिवाय दुसरें कांही सुचत नाहीं. आधीं अप्सरेची मुलगी अप्सरा म्हणजे विलासमग्न. मेनकेनें जसें विश्वामित्राला आपल्या तावडींत आणलें तसें इतकें वेडावून टाकणारें रूप मदतीला असल्यामुळें शकुंतला दुष्यंताला आपल्या तावडींत कां आणणार नाहीं ? आम्रवृक्षाविषयीं बोलतांना ती त्याला उपभोग-क्षम म्हणते. आईच्या वळणावर मुलगी जाणारच. कण्व तिला आश्रमांतील कडक व्रतें पाळावयाला लावतो. दुर्दैवानें तिला छळूं नये म्हणून आपण स्वतः उपवास, जप, शांति वगैरे करतो. पण त्याचें तिला काय ! दुष्यंत दिसल्याबरोबर ईश्वर-संकल्पित हाच आपला भावी पति, ह्याच्यावर प्रेम केलेंच पाहिजे. आणि प्रेम म्हणजे उपभोग—चैन. विवाह केवळ शारीरिक नसून आध्यात्मिक आहे, विवाहा-नंतर चैन करावयाची नसून कर्तव्यें करावयाचीं असतात, विवाह हा एक आत्मयज्ञ आहे, कुटुंबाच्या, समाजाच्या उपयोगीं पडणें हें त्याचें उद्दिष्ट आहे, हें तिच्या ध्यानीं मनींही आलें नाहीं. अशा कोत्या विचारानें झालेलें लग्न सुख कसें देणार ? ' हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं ! '

अशा कोत्या विचारानें त्यांना लबाडया कराव्या लागतात. दुष्यंतच पहा. शकुंतला व तिच्या सख्या ह्यांचा संवाद आडून ऐकतो; (लबाडी १). एकदम पुढें कां नाहीं जात ? आडून ऐकण्याची त्याला संवयच ! मी राजा नाहीं, राजाचा नोकर आहे, असें धडधडीत खोटें सांगतो. हेतु काय तर आपलें वैर पाहून शकुंतलेनें आपणांस वश व्हावें. पर्णशालीच्या भानगडींत पडूं नये; ( लबाडी २ ). मी हिच्यावर प्रेम करीत नाहीं ओ ! मी उगाच थाप मारली; असें निर्लज्जपणें विदूषकाला सांगतो: ( लबाडी ३ ).

शकुंतला व तिच्या मैत्रिणी ह्यांनाही असेंच खोटें काम करावें लागतें. नखऱ्यानें पहावयाला वेळ मिळावा म्हणून काटा बोचल्याचें व पदर आडकल्याचें ती ढोंग करते. म्हणजे दोघांची आणखी कांहीं वेळ नजरानजर व्हावी; ( लबाडी १ ). गौतमीसारख्या वडील वृद्ध माणसापासून काय चाललें आहे तें तिघीजणी छपवितात: ( लबाडी २ ). सख्या शकुंतलेला प्रेमपत्र लिहावयाला सांगतात; ( लबाडी ३ ). काय ही धिटाई ! दुर्वासाचा शाप शकुंतलेला कळवीत नाहीत; ( लबाडी ४ ). गाढवपणा झाला हें गौतमीच्या व शार्ङ्गरवाच्या लक्षांत येतें व ती तसें बोलूनही दाखवितात.

कांहीं काळ सर्व कांहीं सुरळित चालतें. गांधर्वविवाह होतो; कण्व, तापसी वगैरे आशीर्वाद देतात; जिकडून तिकडून वाहवा वाहवा होते. पण हें असें नेहमींच चालणार म्हणून कशावरून ? शकुंतला भुरळून जाते, वैभवाच्या शिखराला आपण आतां पोहोंचणार असें तिला होतें. इतकी भुरळून गेली नसती तर पुढच्या संकटाची थोडी तरी तिला भीति वाटली असती. चक्रवाकीचें रडणें हा अपशकुन आहे, उजवा डोळा लवला हें दुश्चिन्ह आहे, असें तिला खास वाटलें असतें. पण ती आपल्या मनाला बिनधोक म्हणते, मना भिऊं नको, आर्यपुत्राचें प्रेम लक्षांत आण. काय चढेलपणा व निर्धास्तपणा ! अशा दांडगाईचें पर्यवसान अधःपातांत होणारच आणि झालें.

विश्वामित्राचें तप, कण्वाची दूरदृष्टि व दुर्वासाचा शाप ह्या त्र्यानें शकुंतला वांचली. दुर्वासाला लोक दोष देवोत ! आम्ही तर त्याला जगाचा कल्याणकर्ता असेंच म्हणूं. शकुंतला व दुष्यंत ह्यांच्या अंगीं दोषांप्रमाणें गुणही आहेत हें कबूल केलें पाहिजे. ऋषिवगैरेशीं कसें वागावें हें त्याला चांगलें अवगत होतें. ब्राह्मण--कुमारीशीं आपल्याला लग्न करतां येणार नाहीं हेंही तो जाणत होता. कोणालाही

त्याच्याजवळ जाण्याची भीति वाटत नसे. आपलीं कर्तव्यें तो उत्तम रीतीनें बजावी. त्याला कुचराई ठाऊक नव्हती. ह्या गुणांमुळेंच तो वांचला. असे जर गुण त्याच्या अंगीं नसते तर त्याचा कायमचा अधःपात झाला असता. शकुंतलेला कित्येक वर्षे अज्ञातवासांत, व दुष्कर तप करण्यांत घालवावीं लागतात. आपण हिला फसविलें, दुःखोदधींत लोटून दिलें, तपोवनांतून घाणेरड्या संसारांत आपणच हिला ओढलें असे दुष्यंतास कबूल करावें लागतें व त्याच्या दुःखाला सीमा रहात नाहीं. क्षणो-क्षणीं मी जर नकळत चुका करतों तर राज्यांतला प्रत्येकजण कसा वागतो हें अथपासून इतिपर्यंत मला कसें कळेल असें तो खेदानें म्हणतो. त्याची घमेंड उत-रते. मारीचाश्रमांत गेल्यावर पदोपदीं जरी शकुंतला एथें आहे, सर्वदमन तुझा मुलगा अशी खात्री पटविणारीं प्रमाणें त्याला आढळतात, उजवा बाहु स्फुरण पावतो, तरी त्याच्या मनाची खात्री होत नाहीं. इतका तो नरमतो. जी शकुंतला, मी हिला पट्टराणी करीन असें वचन घेतल्यावरच, त्याच्या स्वाधीन होते, ती आतां दैवावर सर्व हवाला टाकते. सर्व माझी चूक, मला पाहिजे तें शासन कर, असें दुष्यंताकडून म्हणवीत नाहीं. दोघेंही नरमतात. आतां दोघांचें प्रेम दुःखाग्नींत तावून सुलाखून निघतें. आतां त्याला कायमपणा येतो.

हीं मतें किंवा हें मत मला कां ग्राह्य वाटत नाहीं हें प्रारंभींच सांगितलें आहे. दुष्यंत व शकुंतला हीं उत्तम कोटींतलीं माणसें होतीं असें नाटकांतल्या वाक्यां-वरून मीं सिद्ध केलें आहे. दोघांना कण्व वगैरे कोणीही नांवें ठेवीत नाहीत. उलट मारीचसुद्धां स्तुतिच करतो. एकानें तरी त्यांना दोष द्यावयाचा होता. दुष्यंताच्या चंचल स्वभावाची थोडीशी चुणूक कवीनें दाखविली आहे. डॉ० टागोर म्हणतात, ही चुणूक म्हणजे हंसपदिकेनें मारलेला टोमणा. हंसपदिका ही अंतःपुरांतली एक स्त्री. ' परिग्रहबहुत्वेऽपि ' असें खुद्द दुष्यंत म्हणतो. दोष असेल तर तो एकाहून अधिक स्त्रिया करण्याचा. पण पुरातनकालीं बहुपत्नीकत्व हें राजे लोकांत दूषण मानलें जात नसे. एकाहून अधिक स्त्रिया करण्याची त्यांना मुभा असे. कदाचित् तो गुणही समजला जात असेल. नीतिबंधनें हीं सगळ्याच काळीं सारखीं नसतात. लग्नासंबंधीं तरी हीं बंधनें शिथिल असतात. आतां अनेक स्त्रियांपैकीं कोणावर प्रेम करावयाचें हें सौंदर्य, गुण, प्रजोत्पादन ह्यांच्यावर अवलंबून राहील. दुष्यंत अनपत्यतेमुळें कष्टी होता. तपोवनांत आल्यावर त्याला चक्रवर्तिपुत्रप्राप्तीचा आशीर्वाद मिळतो. लवकरच स्त्रीरत्न दिसतें. बाहु-स्फुरणानें आपल्या मनांतली

आशा सफल होणार असें त्याला क्षणापूर्वी वाटत होतें त्याला ह्या दर्शनानें बळकटी येते. आजपर्यंत मिळालेल्या स्त्रिया इतक्या सुंदर नव्हत्या. शिवाय त्यांना मूलबाळ झालें नव्हतें. आणखी एकवार लग्न करण्यास कोणचीही आडकाठी नव्हती. शकुंतला क्षत्रिय होती, अतिलावण्यवती होती; ती इतकी कीं नवीन अलौकिक अशा साधनांनीं प्रजापतीनें तिला उत्पन्न केलें असावें असें दुष्यंताला वाटलें व हिच्यापासून आपल्याला चक्रवर्ती मुलगा होणार असें त्याला वाटलें असल्यास नवल कोणचें ? कामवासना अनावर झाली, निदान शकुंतला मरणाच्या पंथाला लागली ! त्यावेळीं गांधर्वविवाहा--खेरीज जीव रक्षण करण्याला दुसरा उपाय कोणचा होता ? प्रेमाचा बोभाटा झाला असता तर शकुंतला लज्जेनेंच मेली असती. गौतमी वगैरेंनीं काय सल्ला दिला असता ? वाट पाहणें अशक्य आहे असें त्यांनाही वाटलें असतें. गांधर्वविवाह हाच एक उपाय होता व तो शास्त्रसंमत होता.

शकुंतलेनें मन्मथव्यथा किती काळ अनुभविली हा एक प्रश्न आहे. त्याचें थोडक्यांत उत्तर द्यावयाचा प्रयत्न करतों.

पहिल्या अंकांत दोघांची गांठ पडते हा पहिला दिवस. हा अंक व दुसरा अंक ह्यांमध्यें किती दिवस गेले हें ठरविण्याला मार्ग नाहीं. शकुंतलेला पाहिल्यापासून दुष्यंत नगराला जाण्याची गोष्ट सुद्धां काढीत नाहीं अशी विदूषक तक्रार करतो. शकुंतलेच्या रूपाशिवाय दुसऱ्या कशाचाच तो विचार करीत नव्हता हें दुसऱ्या अंकावरून दिसतें. तिसऱ्या अंकांतील विष्कंभकावरून झळ लागून शकुंतला हैराण असल्याचें कळतें. कण्व कडक तपस्वी आहे. ती गरीब बिचारी सर्वस्वी त्याच्यावर अवलंबून आहे. कण्वाच्या संमतीशिवाय कांहींच करतां येत नाहीं, तर मग अलभ्य वस्तु म्हणून शकुंतलेचा नाद सोडून द्यावा तर तेंही करवत नाहीं असें दुष्यंत म्हणतो त्याला अतिशय मदनबाधा होते. आर्ताशी राजा जागरणानें मनुष्य कृश व्हावा तसा दिसतो; शकुंतला तर इतकी झुरत चालली आहे कीं, अशाच स्थितींत ज्यास्त काळ घालविणें तिला शक्य नाहीं असें प्रियंवदा म्हणते. दोघांची अशी अवस्था व्हावयाला आठ पंधरा दिवस पुरणार नाहींत. महिना दोन महिने तरी गेलेच पाहिजेत.

तपोवनविरोधी जो विकार तिच्या मनांत उद्भवला त्याच्याशीं ती महिना दोन महिने झगडते. हा कालावधि घाईचा द्योतक खास नव्हे. राजाला मजकूर

दया करण्यास सांगा, तसें न कराल तर माझ्या नांवानें तिलोदक द्यावयाची तुम-च्यावर पाळी येईल असें शकुंतला म्हणते व त्याही आणखी वाट पाहणें धोक्याचें होईल असें पाहून तिला मदनलेख तयार करण्यास सांगतात.

दोघांची त्याच दिवशीं एकांतीं गांठ पडते. तरी दुसरे काय म्हणतील म्हणून त्याच्यापासून ती निसटते. त्यांचा गांधर्वविवाह तिसऱ्या व चौथ्या अंकांच्या दरम्यान घडतो विवाह होण्याच्या अगोदर मनोविकाराविरुद्ध शकुंतलेनें किती दिवस झगडा चालविला हें ठरविण्यास साधन नाहीं. पण ती निरुपाय होईपर्यंत झगडली असेल खास; कारण ती जात्या शालीन होती; धिटकुली खास नव्हती.

मनोविकार आवरून धरणें हें मनुष्याचें कर्तव्य आहे व त्यांतच त्याची आध्या-त्मिक उन्नति आहे. प्राण गेला तरी बेहत्तर, पण कामाला वश होणार नाहीं हाही एक मार्ग आहे. असें जर शकुंतलेनें केलें असते तर शाकुंतलनाटकाला अस्तित्वच आलें नसतें. कामाशीं करवेल तितका झगडा करून शेवटीं जेव्हां हालटेकीची पाळी आली, जेव्हां प्राणावर बेतली, तेव्हांच ती कामाला हार गेली. हार जाण्याची तिच्यावर पाळी आली हा प्रतिकूल दैवाचाच परिणाम. प्रतिकूल दैव जर आडवें आलें नसतें तर कण्व सोमतीर्थाहून परत येईपर्यंत ती थांबलीच असती. दुष्यंत व शकुंतला ह्यांचें प्रेम जर केवळ शारीरिक स्वरूपाचें असतें तर कामतृप्ती-शिवाय त्यांनीं दुसरें कांहींच केलें नसतें. पण दुष्यंत यज्ञरक्षणाचें काम करीत होता; अशा वेळीं शकुंतलाही गृहकृत्यांत गुंतली असलीच पाहिजे. शिवाय तपोवन-विहारही त्यांनीं केला असावा; नाहीं तर माझ्या हातून मृग पाणी प्यायला, तुझ्या हातून नाहीं; अशा गोष्टी शकुंतलेच्या ध्यानांत कशा राहिल्या असत्या ? नवरा-बायको होण्याला योग्य अशा स्त्रीपुरुषांचें प्रेम शारीरिक असलेंच पाहिजे. पण तें केवळ शारीरिक नसावें एवढाच काय तो निर्बंध. कण्व आल्यावर यथाविधि विवाह झाल्यावरही शरीरसंबंध घडलाच असता. तो गांधर्वविधीनें आधीं घडला. दोहोंत फरक आहे व तो कमी--ज्यास्त आत्मनियंत्रणाचा आहे. ज्यास्त वेळ आत्मनियंत्रण शकुंतलेला अशक्य होतें हें वर सांगितलेंच आहे.

ज्याच्यावर आपलें प्रेम जडलें आहे तो कोणी लफंग्या नसून प्रजेचें पालन कर-णारा विख्यात राजा दुष्यंत आहे असें चहूंकडून शकुंतलेला कळलें होतें. वडील माणसांना विचारल्याशिवाय लग्न केल्याबद्दल तिला पस्तावा झाला असें कोठें म्हटलें आहे? थोडीशी भीति वाटणें हें स्वाभाविक आहे. पण कण्वाच्या शब्दांनीं ती भीति पार नाहींशी झाली.

डॉ० टागोरनीं गइटनें योजलेल्या भूमि व स्वर्ग ह्या शब्दांना विनाकारण विशेष महत्त्व दिलें आहे. भूमि हा ऐहिकसुखदर्शक शब्द व स्वर्ग हा आध्यात्मिकसुखदर्शक अशी त्यांनीं आपली समजूत करून घेतली. पण तसें समजण्याचें कारण नाहीं. 'भगवति वसुधे देहि मे विवरं' असें शकुंतला म्हणाली. तेव्हां पृथ्वीवर कोठेंही राहणें तिला असह्य झालें असतें.वर्तनानें किर्तीजरी शुद्ध असली तरी नवरावाल्या स्त्रीला ती जर माहेरीं राहिली तर लोक दोष देतात व तिच्या वर्तनांत कांहीं तरी गोम आहे असें समजतात;म्हणून नवऱ्याला आवडत नसली तरी मुलीला आईबाप नवऱ्यापाशींच ठेवतात, व नवऱ्याच्या घरीं दासीसारखी रहा असें शार्ङ्गरव म्हणतो. तेव्हां माहेरीं जाणें तिला अशक्यच होतें. सासरीं राहणें तितकेंच अशक्य. नवऱ्यानें टाकून दिली ह्यासारखी पतिव्रतेला दुसरी लाजिरवाणी गोष्ट कोणची? ती लाज पृथ्वीवर कोठेंही लपवितां आली नसती. पृथ्वीबाहेर जाणें जरूर होतें. म्हणून मेनकेनें तिला हेमकूटावर नेलें व राजानें टाकली असतांही त्याच्याकरितां ती विरहव्रत पाळीत राहिली; ( मम दीर्घं विरहव्रतं बिभर्ति ). तिनें दुसरी कोणचीही तपस्या ( Penance ) केली नाहीं. मातलीनें जेव्हां मारीच ऋषि काय करीत आहेत असें विचारिलें, तेव्हां ते दाक्षायणीला पतिव्रताधर्म सांगत बसले आहेत असें त्याला उत्तर मिळालें. हें उत्तर शकुंतलेच्या पातिव्रत्याला अनुलक्षून आहे. आर्यस्त्रीचा पातिव्रत्य हाच धर्म. शकुंतला तो विवाह झाल्यापासून एकचित्तानें पाळीत होती. पतीवांचून क्षणभर वेगळें राहणेंही तिला खपलें नाहीं. दुष्यंत न्यायला केव्हां माणसें पाठवितो असें तिला झालें. त्यानें विलंब लावला म्हणून ती चिंतातुर झाली. सासरीं केव्हां जातें असें तिला झालें; ( आर्यपुत्रदर्शनोत्सुका ). पातिव्रत्य हेंच आर्यस्त्रियांच्या प्रेमाचें आध्यात्मिकत्व. उगाच पाश्चात्य कल्पना डोक्यांत घेऊन शकुंतलेला दोष देण्यांत काय अर्थ ? Ethical, Spiritual, ह्या शब्दांनीं टागोर ह्यांना वेडावून टाकलें आहे ! उत्तम इंग्रजी लिहितां येणें हें एक प्रकारचें विघ्न आहे. त्यामुळें भलतेच अर्थ डोक्यांत येतात.मोठाले व मधुर शब्द एके ठिकाणीं गोंवण्याची डॉ०टागोर यांना हातोटी साधली आहे.दुष्यंतानें टाकली म्हणून जगानेंही तिला टाकून दिलें असें कसें म्हणतां येईल ? (The world-abandoned Sakuntala's infinite sorrow ). प्रसूति होईपर्यंत राजगृहीं रहावें ह्याला राजाही कबूल होता. Paradise Lost व Paradise Regained हे शब्द डोक्यांतून पार

हाकलून दिले पाहिजेत. त्यांनीं भलतेच अर्थ केले जातात. शाकुंतलांत ऐहिक सुख पारमार्थिक सुखांत परिणत झाल्याचा इतिहास नाहीं. येथें खडतर पातिव्रत्याचा इतिहास आहे, दुर्दैवाचा इतिहास आहे, शापाचा इतिहास आहे; दुसरा कशाचा इतिहास नाहीं.

दुष्यंतानें टाकून दिली नसती तर शकुंतला राजाच्या इतर बायकांच्या पंक्तीला बसली असती. पण ती चक्रवर्ती पुत्राची आई होणार होती व राजानेंही माझ्या कुलाचे दोन आधार; पृथ्वी व तुमची ही सखी; ( द्वे प्रतिष्ठे कुलस्य मे । समुद्रवसना चोर्वी सखी च युवयोरियं ). असें म्हटलें होत. तोही राजर्षि, तेव्हां त्याचेही शब्द खरे होणारच.

समजा कीं, राजानें तिचें कधींही नांव घेतलें नसतें तरी तिच्या मनानें, तूं कोणचेंही पाप केलें नाहींस, तूं लग्नाची बायको आहेस, असेंच म्हणून तिचें सांत्वन केलें असतें. परंतु उगाच तर्कवितर्क करण्यांत अर्थ नाहीं.

हंसपदिकेचें गाणें राजाची चंचल वृत्ति दाखविण्याकरितां नसून त्याला कसली तरी अनिर्वचनीय अशी हुरहुर लागली आहे असें दाखविण्याकरिता आहे. कोणाला तरी आपण विसरलों, पण तें कोण हें आठवत नाहीं ह्या मनोभावनेची तयारी करण्याकरितां तें गाणें घातलें आहे.

डॉ० बेलवलकरांच्या बहुतेक मुद्यांचें निराकरण वर केलेल्या टीकेंत आलेंच आहे. बाजू शाबीत होण्यासारखी नसूनही, कारणें लेचींपेचीं असतां, तीं पुढें करून, आपली बाजू समर्थनीय आहे असें कांहीं लोक जोरानें प्रतिपादन करितात. ह्याला इंग्रजींत Special pleading म्हणतात. तशांतला कांहींसा प्रकार डॉ० बेलवलकरांच्या निबंधांत झाला आहेसा वाटतो. ज्याला कधीं कोणीही लबाडी म्हणणार नाहीं त्याला ते लबाडी म्हणतात. शकुंतला व तिच्या सख्या ह्यांचें कांहीं गुप्त कारस्थान चाललें नव्हतें; राज्याच्या उलाढाली त्या थोड्याच करीत होत्या ! बागेंत–घरांत किंवा घरांतल्या एखाद्या खोलींत नव्हे–त्या विनोदी भाषण करीत होत्या. तें ऐकून ऐकण्यांत कोणचें पाप ? योग्य संधि साधून तो पुढें गेला नसता तर नागरिकत्वाविरुद्ध त्याचें आचरण झालें असतें. कुमारिकांनीं गांगरून जाऊं नये, भीतीनें मुग्धता स्वीकारूं नये म्हणून मी राजाचा नोकर आहे असें तो म्हणतो. ह्यांत आम्हाला पापाचा लेशही दिसत नाहीं. आपल्याला एक नवीन सवत उत्पन्न झाली म्हणून अंतःपुरांतल्या स्त्रियांनीं

रुसून फुगून बसूं नये ह्याकरितां राजा सावधगिरी ठेवतो. अंतःपुरांत बातमी कळल्यानें कोणाचा फायदा होणार ? अन्तःपुरांतल्या स्त्रियांना हेवा वाटेल, दुःख होईल म्हणून त्यानें शकुंतलेवर प्रेमच करावयाचें नव्हतें हें म्हणणें निराळें. पण प्रेम व लग्न करण्याला जर डॉक्टर बेलवलकर हरकत घेत नाहींत तर दुष्यंतानें सावधगिरी ठेविली ह्याला त्यांची कां हरकत असावी ?

दुष्यंताचें मन आपल्याकडे ओढण्याकरितां शकुंतलेनें कांटा रुतल्याचें व पदर आडकल्याचें मिष केलें हें खरें. पण ह्या कृतीनें तिनें आपलें प्रेम व्यक्त केलें (शालीनतयापि मयाविष्कृतो भावस्तत्रभवत्या). दुष्यंत तिला शालीन म्हणतो; धिटकुली, दांडगी म्हणत नाहीं. माझें मन दुष्यंतावर बसलें आहे, त्याच्याशीं मला लग्न करावेंसें वाटतें असें शकुंतला आपल्या मैत्रिणींना सुद्धां होतां होईल तों सांगत नाहीं. मग गौतमीजवळ तशी गोष्ट ती कशी काढील ? मैत्रिणींना ती गोष्ट शेवटीं शेवटीं कळते व दोघांचा समागम ताबडतोब जुळवून आणिला पाहिजे, नाहीं तर ही प्राणास मुकेल अशा विचारानें त्याही मुग्ध राहतात. शकुंतला जर मदनव्याधीनें ग्रस्त झाली नसती तर वडिलांची संमति मिळविणें वगैरे सर्व गोष्टी नेहमींच्या पद्धतीप्रमाणें घडून आल्या असत्या. व्याधि अनावर झाल्यामुळेंच मदनलेखाची युक्ति त्यांना सुचते. दृष्टादृष्ट झाल्याबरोबर शकुंतला मदनाधीन झाली, त्यामुळें ह्या गोष्टी क्षम्य आहेत. एरव्हीं त्या दोषाई ठरतील. दुर्वासाचा शाप शकुंतलेला कळविणें म्हणजे वनज्योत्स्नेला कढत पाण्यानें भाजणें होय; शाप ऐकल्याबरोबर ती मूर्च्छित होऊन पडली असती; प्राणही जाण्याचा संभव होता; कारण तिची प्रकृति इतकी नाजूक झाली होती; (रक्षणीया खलु प्रकृतिपेलवा प्रियसखी). ह्या गोष्टींना लबाड्या म्हणतां येणार नाहीं. अपरिहार्य हेंच विशेषण त्यांना लाविलें पाहिजे.

उपभोग शब्द फक्त दोनदां आला आहे. त्याच्यावर एवढी इमारत उभी राहणार नाहीं. ग्रीष्म किंवा वसंत ह्यांत शीतस्नान करणें, थंड वारा घेणें, सावलींत निजणें, बसणें वगैरे गोष्टी साधुसंतही करतील. त्यांनीं ग्राम्य अर्थ कसा सूचित होतो ! शरीराची पुरी वाढ झाल्यावरच स्त्रीपुरुषांचीं लग्नें होणें इष्ट आहे. सहकार उपभोगक्षम झाला; नवमालिका उपवर झाली, म्हणून त्यांचा संबंध झाला. बाहुलाबाहुलीचें लग्न पोरी लावितात, थोर लावीत नाहींत. ह्या एका शब्दावरून उपभोगाशिवाय शकुंतलेच्या डोक्यांत दुसरें कांहीं नव्हतें असें कदापि म्हणतां येणार नाहीं. दुष्यंत व शकुंतला ह्यांना आधीं दोषी ठरवून मग कसला

तरी पुरावा गोळा करण्यासारखें हें होयं लतांना तुडविणारा मत्त हत्ती, ह्यांत व्यंग्यार्थ आहे असें डॉ० बेलवलकर म्हणतात. मत्त हत्ती जसा लतांना पाया-खालीं तुडवितो ( पादाकृष्टव्रतति० ), तसा दुष्यंत शकुंतलेला चिरडून टाकतो. आपण हिला तपोवन सोडावयाला लावलें, नरकप्राय अशा राजधानींत आपण हिला ओढलें असें दुष्यंत कोठें म्हणतो ? मींच कां तिला झिडकारिली, मला भ्रम वगैरे झाला होता कीं काय, हत्ती समोर उभा असून हत्ती नाहीं अशा म्हणण्यासारखाच मीं मूर्खपणा केला, एवढेंच तो म्हणतो.

त्यांच्या प्रेमाच्या मार्गांत अडचणी होत्या; मदनव्यथा अनावर होईपर्यंत दोघांनीं—निदान शकुंतलेनें—सहन केली; तिच्या मैत्रिणींनीं जर गोष्ट काढली नसती तर स्वत: होऊन तिनें चकारही काढला नसता. दोघांचा प्रेमपथ केव्हांही सुकर नव्हता. विवाहानंतरही शकुंतला चिंतातुर होती. तिचें सगळें लक्ष दुष्यंताचे जासूद केव्हां येतात याकडे होतें. डॉ० बेलवलकर म्हणतात कीं, शकुंतला अगदीं जोरांत होती; राजधानींत गेल्याबरोबर पट्टराणीपद ठेवलेलेंच अशी तिची खात्री होती. आमच्या मतें चौथ्या अंकाला ' अश्रुप्रवाहो नाम चतुर्थोऽङ्कः ' असें नांव द्यावें. आनंदाची झुळुक यावयाला ह्या अंकांत एवढीही वाव नाहीं. तपोवन सोडून जावयाचें म्हणून विरह; दुष्यंताकरितां उत्कण्ठा; पांचव्या अंकांत घडणाऱ्या गोष्टींची ही पूर्वभूमिकाच होय. वेळ आली तर अंगठी दाखव हो ! असे शब्द ऐकल्याबरोबर आधींच दु:खी असलेल्या तिच्या अंत:करणाला कांपरें भरतें. राजासमोर जाव-याच्या वेळेला उजवा डोळा लवतो, छाती धडधडते, म्हणून ती छाती दाबते; ( हस्तमुरसि कृत्वा ). पुढें घडणाऱ्या गोष्टींची आधीं सावली पडते ती ही. एथें निर्धास्तपणा कोठेंही नाहीं.

एवढी मोठी—घोड्याएवढी किंवा हत्तीएवढी—चूक आपण केली, तेव्हां पदोपदीं लहान सहान चुका किती तरी घडत असतील असें दुष्यंताला वाटतें हें स्वाभा-विक आहे. पण तुझा कांहीं अपराध नाहीं असें जेव्हां मारीच म्हणतो तेव्हां तो समाधानाचा सुस्कारा टाकतो. हातचें सुख गेलें हें पाहून, न जाणों पूर्वीप्रमाणेंच आतांही आयुष्य फसगत होणार नाहीं कशावरून असें वाटून, सातव्या अंकांत दोघेंही कचरतात. दोघेंही दैवाला भितात. आपल्या हातून अपराध घडला, चूक झाली, असें दोघांपैकीं कोणालाही वाटत नाहीं.

डॉ. टागोरप्रमाणे डॉ० बेलवलकरही उत्तम इंग्रजीनें वाहवून गेले आहेत. त्यांना-ही 'An ultimate Providential dispensation of things, that disguised benefactor of humanity, the blow that reduces her in the eyes of the broad world—(Oh the pity of it!) in the eyes of her own Kinsmen to a mere fallen woman of the street was the most unkindest.'
अशी भाषा वापरण्याचा अनावर मोह होतो! त्यांनीं क्षुल्लक गोष्टींना महत्त्व दिलें आहे; हेतुळ गोष्टींना दुय्यम किंवा अगदीं कैंसा प्रतीचें स्थान दिलें आहे. आपण जेथें शाप व उश्शाप यांच्यावर ठाम श्रद्धा आहे अशा आर्य, भूमींत आहोत, हें ते विसरले. शाकुंतल हें सामाजिक नाटक आहे असें त्यांस वाटलें म्हणून ते नीतीचा धडा शाकुंतल नाटकात हुडकूं लागले. पण मी त्यांना पुन्हां सांगतों कीं, दैवदुर्विलसिताखेरीज ह्या नाटकांत दुसरें कांहीं नाहीं (तेजोद्वयस्य युगपद् व्यसनोदयाभ्याम् । लोको नियम्यत इवात्मदशान्तरेषु). जर सूर्यचंद्रांसारख्यांना निरनिराळ्या अवस्थांतून जावें लागतें तर मनुष्यालाही अशाच अवस्थांतून गेलें पाहिजे. सुखदुःखें हीं चक्रनेमिक्रमानें मनुष्यमात्रानें भोगलींच पाहिजेत, हा धडा कालिदासाला या नाटकांत शिकवावयाचा होता. डॉ०बेलवलकर यांनीं Higher Criticism हा शब्द बरेच वेळां वापरला आहे. मला वाटतें ह्या सूक्ष्म निरीक्षणानेंच ते घसरले आहेत. दुष्यंत व शकुंतला ह्यांचा त्यांनीं अपमान केला आहे. ज्यांना डोळे आहेत त्यांच्या नजरेस हें सहज येईल—पण दुर्दैवानें बहुतेक टीकाकारांस किंवा निरीक्षणकारांस डोळेच नसतात—असें ते क्वचित् म्हणतात. त्यांना आमची सूचना आहे कीं त्यांनीं असे शब्द वापरूं नयेत त्यांनीं आपलीं मतें बेलाशक लोकांपुढें मांडावींत; पण लोकांना टोंचूं नये आणि कोणत्याही प्रकारचा अहंकार दाखवूं नये.

सूक्ष्म निरीक्षणानें एखादवेळेस भलताच अर्थ होतो ह्याचें मजजवळ एक ठळक उदाहरण आहे. तें डॉक्टर टागोरच्या शाकुंतलनिबंधांत मला आढळलें.

'अभिनवमधुलोलुप०' ह्या गाण्याचा अर्थ त्यांनीं खालीलप्रमाणें केला आहे. 'O honey-bee! having sucked the mango-blossom in your search for new honey you have forgotten the

recent loving welcome by the lotus.' ( हे मधुकरा ! नवीन मधाच्या शोधांत आम्रमंजरीचें रसपान करून कमलानें जें तुझें तुकतेंच प्रेमानें स्वागत केलें तें तूं विसरलास. ) ' अभिनवमधुलोलुपस्त्वं तथा परिचुम्ब्य चूतमञ्जरीम् । कमलवसतिमात्रनिर्वृतो मधुकर विस्मृतोऽस्येनां कथम् ॥ ' ह्याचा अर्थ असा होत नाहीं. दोन बंगाली प्रती पाहिल्या त्यांत असा अर्थ देणारीं पाठांतरें सांपडलीं नाहींत व कोणच्याही टीकाकारानें असा अर्थ केला नसावा. डॉ० टागोर हंसपदिकेला कमल व वसुमती राणीला चूतमंजरी समजतात. पण ही त्यांची चूक आहे. खरी गोष्ट उलट आहे. वसुमती वगैरे राण्या कुचकामाच्या झालेल्या ! विलासाला अगदीं अयोग्य ! म्हणून राजा नवयुवतींकडे जातो. पण भीतीनें त्याला ह्या राण्यांकडे परत जावें लागतें. अरे कुठें आमचें तें यौवन, आमच्याशीं केलेला विलास आणि कुठें जुन्या पुराण्या अरसिक त्या राण्या ! तरी तूं आम्हांला विसरतोस ! भ्रमर कमलाकडे गेला तर तेथें तो तुरुंगांतल्या सारखा आडकून पडतो. पण आम्रमंजरीकडे गेल्यास त्याचें घ्राणेंद्रिय, रसनेंद्रिय तृप्त होतें. तर मग कमलाकडे तो पुन्हां कां जातो ? भीतीनें किंवा सानुमती म्हणते त्याप्रमाणें ' मन जरी दुसरीवर बसलें आहे तरी प्रथम ज्यांना मान दिला त्यांना तो विसरत नाहीं. '

• 'सकृत्कृतप्रणयोऽयं जनः । तदहं देवीं हंसवतीमन्तरेण उपालम्भनमागतोऽस्मि' याचें We desert our loves after a short spell of love-making and I have deserved this strong rebuke from Queen Hansapadika, असें भाषान्तर केलें आहे. त्याचा अर्थ असा—

' थोडा वेळ प्रेम करून आम्ही प्रेमपात्रांना टाकून देतों, म्हणूनच राणी हंसपदिकेनें मला जसा पाहिजे तसा टोमणा मारला आहे. ' हाही अर्थ चुकला आहे. हंसपदिकेवर एकवेळ मी प्रेम करीत होतों ; पण तिला टाकून राणी हंसवती किंवा वसुमती हिला पुन्हां प्रेम दाखवूं लागलों म्हणून हंसपदिका मला दोष देत आहे; असा खरा अर्थ आहे हंसपदिका ही राणी नसून अंतःपुरांतली एक नवयुवति होती. राजाला राण्या अशा चार असतात; बाकीच्या केवळ स्त्रिया.

कोणच्या बंगाली प्रतीवरून डॉ० टागोर ह्यांनीं वरील भाषांतरें केलीं हें माहीत नाहीं. मूळ निबंध बंगालींत लिहिला होता; त्याचा प्रो. जदुनाथ सरकार ह्यांनीं इंग्रजींत तरजुमा केला. तेव्हां चूक कोणाची हें कांहींच ठरवितां येत नाहीं.

पुणें, ता १० अक्टोबर १९२६ वै० का० राजवाडे.

# कित्येक विद्वानांचें अभिप्राय.

**दक्षिणाविद्यापीठस्थसंस्कृताध्यापकानां वेदान्तवागीशानां पंडितकुलावतंसानां तत्रभवतां पाठकोपाह्वानां श्रीधरशास्त्रिणां '. मराठी शाकुन्तल '-मन्तरेणायमभिप्रायः—**

ॐ श्रीशिवः शरणम् ।

प्रमोमोर्दीति स्वान्तं प्रो० लक्ष्मणशास्त्रिभिरनूदितमभिज्ञानशाकुन्तलं महाराष्ट्रभाषायां पठितवतो मे । यतोऽत्रत्यानि पद्यानि बहुशः पठितानि तत्तानि पद्यानि क्षणे क्षणे नवतामुपेतानि रमणीयताल्लक्षणमन्वर्थयन्ति । किञ्चैकस्यैव पद्यस्य द्विधा त्रिधा वानुवादः संपादितः स च पण्डितवरेण्यानामेषां प्रतिभानल्पत्व सहृदयत्वं च द्योतयति । अनुवादोऽयमिति तैरेवोच्यते तेन कल्पनाः कालिदासस्य । परन्तु दृढं विश्वसिमि यदनुवादका ईदृक्कल्पनासु स्वयमपि प्रभविष्णव इति ब्रुवन्नहं नाल्पेनाप्यंशेनात्मानमयुक्तिभाजनं करोमि । अन्या अपि कविवरकृतयो यदि शास्त्रिमहाभागैरनूदिता भवेयुस्तर्हि स्यात् पण्डितो महाराष्ट्रसंसार इति मन्ये इति शम् .

**विद्वद्वशंवदः पाठकोपाह्वः श्रीधरशर्मा.**

**प्रो. लक्ष्मणशास्त्री** लेले यांचें '**मराठी शाकुंतल**' या नांवाचे अभिज्ञानशाकुंतलाचें मराठी गद्यपद्यात्मक भाषांतर मीं वाचून पाहिलें. प्रो. लेले यांनीं काव्यविनोदाची हौस हें आपल्या भाषांतराचें बलिष्ठ कारण सांगितलें आहे. पण काव्यविनोदाच्या हौसेकरितां त्यांच्यासारखा भाषाकोविद बिद्वान् लेखक व प्रतिभासंपन्न कवि केवळ भाषांतरांचे खेळ खेळत बसेल असें वाटत नाहीं. तेव्हां या काव्यविनोदाच्या हौसेबरोबरच आपल्या काव्यविनोदजन्य आनंदाचा वांटा सामान्य जनास देण्याची प्रबल इच्छा त्यांच्या मनांत वागत असावी, व हें शेवटलें एकटें कारण सुद्धां त्यांच्या कृतीचें समर्थन करण्यास प्रस्तुत प्रसंगीं पुरें आहे. 'मराठी शाकुंतल' ही कृति रसिकांच्या प्रशंसेस पात्र होईल यांत शंका नाहीं. शास्त्रीबोवांची इतर काव्यरचना ज्यांच्या अवलोकनांत

आली असेल त्यांना या भाषांतरांतील विशेष गुणांची सहज कल्पना करतां येईल. ' मराठी शाकुंतल '--पुस्तकाची भाषा अगदीं साधी, सरळ व मनोहर आहे. पद्यरचनेंत प्रसाद व स्वाभाविकपणा हे गुण विशेषें-करून दृष्टीस पडतात. तसेंच मूळ श्लोकांतील भावना व रस हीं यथा-योग्य प्रकट झालीं आहेत. गद्य घ्या कीं पद्य घ्या, आपण भाषांतर वाचीत आहों असें केव्हांही वाटत नाहीं. समश्लोकी रचना सर्वत्रच योजिलेली नाहीं तथापि कांहीं ठिकाणीं ती पहावयास सांपडते; व तिच्या-वरून कवीला समश्लोकीचें बंधन अवजड झालें असतें असें म्हणतां येत नाहीं. पद्य भाषांतराचे अनेक उत्कृष्ट उतारे देतां येण्यासारखे आहेत. पण स्थलाभावामुळें या ठिकाणीं फक्त कांहींचा उल्लेख मात्र करतों. वाचकांनीं अंक पहिला, पद्यें ४, ७, १०; अंक चवथा पद्यें ६, १४; अंक पांचवा पद्यें २, १५; अंक ६ वा पद्यें १३, १७; अंक सातवा पद्य १९ वगैरे वाचून पहावीं. अशीं आणखी किती तरी पद्यें देतां येण्यासारखीं आहेत. सहाव्या व सातव्या अंकांतील साक्या इतक्या सुंदर वठल्या आहेत, कीं, त्या कृष्णशास्त्री चिपळुणकरांच्या साकीची आठवण करून देतात ! पद्याप्रमाणें गद्यही फार चांगलें साधलें आहे. त्यांत अस्वाभाविक रचना व बोजडपणा कोठेंही आलेला नाहीं. संभा-षणें अगदीं आपल्या रोजच्या बोलण्यासारखीं मनोरंजक वाटतात. त्यांत मूळांतील रस पूर्णपणें उतरला आहे. एकंदर भाषांतर पाहिलें म्हणजे प्रो. लेले शास्त्री यांचें भाषाप्रभुत्व चांगलें प्रत्ययास येतें. 'मानवी कृति निर्दोष असूं शकत नाहीं; या नियमानुसार अगदीं क्वचित् प्रसंगीं एक अर्धा दोष दिसून येतो; पण त्यांतही रुचिवैचित्र्य व मतवैचित्र्य यांना वाव आहे. एकंदरीनें ' मराठी शाकुंतल ' पुस्तकानें मराठी वाङ्मयांत चांगली भर टाकिली आहे. याबद्दल प्रो. लेलेशास्त्री यांचें अभिनंदन करणें अवश्य आहे.

गोपाळ विष्णु तुळपुळे.
( प्रो. फर्ग्युसन कॉलेज, पुणें. )

' **मराठी शाकुंतल** ' ही कृति प्रो. **लक्ष्मणशास्त्री लेले** यांच्या विद्व-त्तेस व लौकिकास साजेल अशीच आहे. प्रो. लेलेशास्त्री यांची भाषा नेहमींच रसाळ व प्रासादिक अशी असते व त्यामुळें त्यांचे ग्रंथ वाचकवर्ग आवडीनें वाचतो. ' मराठी शाकुंतल '-ग्रंथानें मराठी वाङ्मयांत चांगलीच भर पडली आहे.

**रघुनाथ दामोदर करमरकर.**
( प्रोफेसर, न्यू पूना कॉलेज )

आजपर्यंत झालेल्या शाकुंतलाच्या सर्व भाषांतरांत ' **मराठी शाकुंतल** ' सरस व श्रेष्ठ ठरेल यांत संशय नाहीं. भाषांतरकर्त्याला लागणारे जे दोन मुख्य गुण-दोन्ही भाषावर प्रभुत्व व मुळाशीं तन्मय होण्याचें सामर्थ्य-ते प्रो. **लक्ष्मण-शास्त्री लेले** यांच्या ठिकाणीं असल्यामुळें त्यांना आपल्या कामांत पूर्ण यश मिळावें हें क्रमप्राप्तच होतें. ' मराठी शाकुंतला 'तील गद्य तर जवळजवळ निर्दोषच आहे पद्याच्या बाबतीत भाषांतरकारांनी ठेविलेलें धोरण-मराठी निर्दोष व रमणीय असावें, समश्लोकत्व कांहीं ठिकाणीं साधलें नाहीं तरी चालेल-हें मला संमत आहे. तथापि कांहीं ठिकाणीं पानाच्या खालीं दिलेले श्लोक वर दिले असते व कांहीं ठिकाणीं योजिलें आहे त्या वृत्ताच्या ऐवजीं दुसऱ्या वृत्ताची योजना केली असती तर बरें झालें असतें असें मला वाटतें. मराठी वाङ्मयांत या ग्रंथानें टाकलेली भर भाषांतरकारांच्या कीर्तीस साजेशी आहे याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों.

**राजाराम परशुराम सबनीस.**
( प्रोफेसर, न्यू पूना कॉलेज. )

प्रो. **लक्ष्मणशास्त्री लेले** यांनीं केलेलें ' **मराठी शाकुंतल** ' या नांवाचें अभिज्ञान शाकुंतलाचें मराठी भाषांतर उत्कृष्ट झालें आहे. ' मराठी शाकुंतल ' वाचीत असतांना मूळ संस्कृताची ओळख नसलेल्या वाचकाला हें पुस्तक म्हणजे भाषांतर आहे अशी कल्पनासुद्धां येणार नाहीं. आणि खरें पाहिलें असतां भाषांतर करणाऱ्याला हेंच दिव्य करावें लागतें. प्रो. लक्ष्मणशास्त्री लेले या दिव्यां-तून पार पडले आहेत; तेव्हां त्यांच्या या मराठी शाकुंतलाची शोभा अग्निशुद्ध सुवर्णाप्रमाणें रसिक जनाच्या आदरास पात्र होईल यांत शंकाच नाहीं.

आधींच कालिदासाचें शाकुंतल म्हणजे आंग्ल कवि कीट्स यानें म्हटल्या-प्रमाणें ' अक्षय निधि हा आनन्दाचा लावण्याची वस्तु असे '—A thing of

beauty is a joy for ever '—अशी एक अलौकिक चीज आहे. एखाद्या अष्टपैलू हिऱ्याप्रमाणें निरनिराळ्या दृष्टीनें त्याच्याकडे पाहिले तरी त्याची कांहीं अनुपमेय शोभा दिसते. आजपर्यंत शाकुंतलाचीं जीं इतकीं भाषांतरें झालीं त्याचें तरी कारण हेंच. आपापल्यापरीनें हीं सर्व भाषांतरें चांगलीं आहेत. प्रो. लेलेशास्त्री यांच्या लेखनशैलीचा मुख्य गुण प्रसाद होय. ' मराठी शाकुंतला '-तील त्यांचें गद्यपद्य वाचीत असतां भाषा आणि अर्थ या दोहोंत अंतर दिसून येणार नाहीं. दरएक प्रसंगीं जणूं काय अर्थाचा आविष्कार करून भाषा अन्तर्धान पावली आहे असेंच आपल्याला वाटेल. ठिकठिकाणीं मूर्तिमंत अर्थच आपल्या पुढें उभा आहे असा वाचकाला भास होतो. दुसरा एक प्रो. लेलेशास्त्री यांच्या भाषेचा गुण म्हणजे तिचा अस्खलित प्रवाह हा होय. यांची वाग्वधू कोठें ठेंचाळली आहे, कोठें धडपडली आहे, असें आढळून येणार नाहीं. आकाशांत लीलेनें सहज संचार करणाऱ्या विहंगमाप्रमाणें तिची गति आहे. शाकुंतलाचीं अनेक भाषांतरें झालीं आहेत, आणखीही कितीतरी होतील. कारण मूळच्या संस्कृत नाटकाचें माधुर्य अवीट आहे. बिल्हण कवीनें म्हटलें आहे, ' रत्नेषु लुप्तेषु बहुष्वमर्त्यैरद्यापि रत्नाकर एव सिन्धुः ' त्याप्रमाणें कालिदासाचें शाकुंतल हा एक ललितकलांच्या सृष्टींतील रत्नाकर होय. कालिदासाची ही वाक्सुधा मराठींत आणून प्रो. लेलेशास्त्री यांनीं वाचकांना निरंतर उपकृत करून ठेविलें आहे.

रामचंद्र कृष्ण लागू.
( प्रोफेसर, न्यू पूना कॉलेज. )

प्रो. लक्ष्मणशास्त्री लेले यांनीं केलेलें ' मराठी शाकुंतल ' मीं वाचून पाहिलें. हें संस्कृत शाकुंतल नाटकाचें भाषांतर सुगम आणि मनोवेधक झालेलें आहे. कालिदासाच्या मूळ संस्कृत शाकुंतल नाटकाचीं आतांपर्यंत अनेक भाषांतरें मराठीमध्यें झालेलीं आहेत; तरी पण, असें असूनही, प्रो. लक्ष्मणशास्त्री लेले यांच्या भाषांतरामध्यें आणि भाषाशैलीमध्यें असा एक विशेष आहे कीं, त्यायोगानें या त्यांच्या प्रस्तुतच्या प्रतिकृतीवर पुनरुक्तत्वाचा दोष येऊं शकत नाहीं. मूळ संस्कृत नाटक समजून घेऊं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांला या भाषांतराचा उपयोग होईलच; परंतु केवळ करमणुकीसाठीं म्हणून जे मराठी वाचक हें पुस्तक वाचण्याला उद्युक्त होतील, त्यांचीही या पुस्तकाच्या वाचनानें करमणूक झाल्या-

वाचून राहणार नाहीं. प्रो. लक्ष्मणशास्त्री लेले यांचा संस्कृत आणि मराठी या दोन्हीही भाषांमधील व्यासंग फार मोठा आहे. आणि त्यामुळें मूळ संस्कृतांतील अर्थ त्यांनीं ज्याप्रमाणें मराठीमध्यें निर्दोष रीतीनें आणिलेला आहे, त्याचप्रमाणें त्यांची मराठींतील ग्रंथरचनाही मनोहर आणि माधुर्ययुक्त झालेली आहे. प्रो. लेले हे मराठींतील एक नांवाजलेले कवि आहेत; व त्यांचीं अनेक काव्यें महाराष्ट्रवाचकांना प्रिय झालेलीं आहेत. अशा कवीच्या हातून रचिली गेलेली या नाटकांतील कविता हृदयंगम झालेली आहे, हें सांगण्याची आवश्यकताच उरत नाहीं. आधीं मूळचीच कालिदासाची कविता उत्तम; आणि त्यांत प्रो. लेलेशास्त्री यांच्यासारखे मराठी भाषांतरकार त्या कवितेला लाभलेले; त्यामुळे प्रस्तुत पुस्तकांतील कवितेमध्यें सुगमता आणि सुंदरता हे दोन्हीही गुण सहजगणें साहचर्यानें नांदत आहेत, हें पाहून कोणाही वाचकाचें मन आनंदानें उल्लसित झाल्यावाचून राहणार नाहीं.

**शिवराम महादेव परांजपे.**

' **मराठी शाकुंतल** ' वाचण्यास हातीं घेतलें व संपेपर्यंत सारखा उत्सुकतेनें वाचीतच राहिलों ! ग्रंथ फार गोड वाटला. हा रसिक समाजावर मोठा अनुग्रहच आहे. शाकुंतलासारख्या दिव्य रत्नाचें यथार्थ गौरव करण्याला प्रो. लक्ष्मण शास्त्री लेले यांच्या सारखेच सरस्वतीचे प्रासादिक भक्त लागतात शाकुंतलाच्छाया--सेवनानें अपरिमित सौख्यानंद लाभला. प्रस्तुत कृतींत प्रौढ, सुकोमल, व ललित पदरचना, तशीच अर्थगौरपुष्ट उचित गद्यरचना, या दोन्ही अशा उतरल्या आहेत कीं त्या शास्त्रीबोवांच्या कीर्तीत निःसंशय अभिनंदनीय भर टाकतील. शाकुंतलासारख्या अप्रतिम ग्रंथाचें भाषांतर केवळ असाध्यच. तथापि येथेंही मूळ व छाया यांच्यांत संदेहोत्पादक संमोह उत्पन्न करणारा मात्र खरोखरच धन्य होय ! तसा अभिमान आंगीं मिरवूं शकावा असें असाधारण कौशल शास्त्रीबोवांनीं या कृतींत दर्शवून आम्हांसारख्यांस चकित केलें आहे ! मराठी शाकुंतल--च्छायेंत अखिल महाराष्ट्रीय रसिक जनता विश्रांति पावो ! आणि महाकवीच्या त्या रम्य रत्नप्रासादाच्या दर्शनसुखानें धन्य होवो !

**दत्तो वामन पोतदार.**

( प्रो. न्यू. पूना कॉलेज. )

# उपोद्घात.

इंग्रजी न जाणणाऱ्या व संस्कृताशीं अपरिचित असलेल्या मराठी वाचकां-करितां हा लहानसा उपोद्घात लिहिला आहे. यांत कालिदास व शाकुंतल यांच्या संबंधाच्या कांहीं गोष्टींचा थोडासा विचार केला आहे.

## कालिदासाचा काल.

आर्यांच्या ललित व विदग्ध वाङ्मयाच्या इतिहासाच्या कालांत व्यास व वाल्मीकि या कविपुंगवांनंतर कविसार्वभौमत्वाचा मान एकमतानें कालिदासालाच मिळाला आहे. या दिगंतकीर्ति कवीच्या कालाचा निर्णय अद्यापि झालेला नाहीं. याच्या मालविकाग्निमित्र–नाटकांतील नायक अग्निमित्र राजा हा इ० स० पूर्वी १४८ वर्षांच्या सुमारास होऊन गेला. त्यावरून हा कवि त्या कालाच्या पूर्वी असूं शकत नाहीं. तसेंच इ० सनाच्या सातव्या शतकांतील बाणकवीच्या हर्षचरितांत व आयहोले येथील जैन देवालयांतील शिलालेखांत कालिदासाचा उल्लेख आहे; त्याप्रमाणेंच त्याच शतकांतील दण्डी कवि आपल्या काव्यादर्शनामक साहित्य-ग्रंथांत शाकुंतलस्थ ‘ सरसिजमनुविद्धम् ’ इत्यादि पद्यांतील ‘ लक्ष्म लक्ष्मीं तनोति ’ असें अवतरण देतो; यावरूनही त्या शतकाच्या अलीकडे कालिदास येऊं शकत नाहीं. तेव्हां इ० सनाच्या पूर्वींचीं दोन व नंतरचीं पहिलीं सहा, अशा आठ शतकांत केव्हां तरी कालिदास होऊन गेला ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु या कालावधींतलें त्याचें नक्की स्थान निर्णीत झालेलें नाहीं. कित्येक विद्वान् संशोधकांनीं या बाबतींत विचार व शोध चालविले आहेत. अशा संशोधकांत दोन मुख्य पक्ष आहेत. एकाच्या मतें कालिदास इ० सनापूर्वी पहिल्या शतकांत झाला. दुसऱ्या पक्षानें कालिदासाला इ० सनाच्या सहाव्या शतकांत नेऊन बसविलें आहे. प्रत्येक पक्षाचीं स्वमतसमर्थनाचीं कारणें आहेत. एकाचीं कारणें संक्षेपानें अशीं आहेत:—( १ ) इ० सनाच्या ७८ व्या सालांतल्या अश्वघोष नांवाच्या बुद्धकवीच्या बुद्धचरित-नांवाच्या काव्यांत कालिदासीय कल्पना व वाक्प्रचार सांपडतात; ( २ ) इ० सनाच्या ७८ व्या वर्षाच्या सुमारास

हालराजाच्या सप्तशती नांवाच्या प्राकृत ग्रंथांत विक्रमादित्य या नांवाचा उल्लेख आहे. इ० स० पूर्व ५७ चा संवत स्थापन करणारा विक्रम तो हाच व याच्याच दरबारच्या नवरत्नांपैकीं कालिदास हा एक होता; ( ३ ) इ० स० ४७२--७३ च्या मंदोसरच्या शिलालेखांत कालिदासाच्या कल्पना आढळतात; ( ४ ) कालिदासाच्या काळीं प्रचलित असलेला हिंदु वारसासंबंधाचा कायदा, त्याच्या वेळीं चोरीच्या गुन्ह्याला मिळणारी देहान्तशिक्षा, न्यायदर्शनाच्या परिचयाचा त्याच्या काव्यांत दिसून येणारा अभाव, कवीची वर्णन करण्याची वैदर्भी रीति; इत्यादि गोष्टी त्याचें प्राचीनत्व सिद्ध करतात. दुसऱ्या पक्षाचीं मुख्य कारणें अशीं आहेत; ( १ ) इ० सनापूर्वीच्या ५७ व्या सालीं कोणी विक्रम किंवा विक्रमादित्य झालाच नाहीं; व त्या सालीं स्थापित झालेल्या संवताशीं प्रसिद्ध विक्रमादित्याचा कांहीं संबंध नाहीं; ( २ ) शकशत्रु उज्जयिनीपति विक्रमादित्य यानें इ० स० ५३०--५८० पर्यंत राज्य केलें. त्यालाच विक्रमांक, चंद्रगुप्त ( दुसरा ), व स्कन्दगुप्त अशीं नांवें होतीं. त्याच्या पदरच्या नवरत्नांपैकीं कालिदास एक होता; ( ३ ) रघुवंशाच्या चवथ्या सर्गांतील ६६-६८ पद्यांत रघुराजानें वंक्षु नांवाच्या नदीवर हूणांचा पराभव केल्याचा उल्लेख आहे. ही वंक्षुनदी म्हणजे ऑक्सस नदी. इ० सनाच्या पांचव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास या नदीच्या प्रदेशांत हूणांची सत्ता प्रचलित असल्याचा दाखला सांपडतो. अशीं उभयपक्षांचीं आत्म-मतसमर्थक कारणें आहेत.

परंतु महाभारत ग्रंथांतही हूणांचा उल्लेख आहे. रघुराजानें ज्या हूणांना जिंकिलें असें रघुवंशांत वर्णिलें आहे ते हे हूण असण्याचा फार संभव आहे. कालिदासानें श्रीरामचंद्राच्या पणज्याला इ० सनाच्या सहाव्या शतकांतील हूणांवर स्वारी करावयास लाविलें ही कल्पना सहृदय व समंजस विवेचकांस फारशी मानवणार नाहीं. शिवाय ' वंक्षु ' नांवाबद्दल ' सिंधु ' हाच पाठ विशेष प्रचलित आहे. या गोष्टी-कडे दुसऱ्या पक्षाच्या संशोधकांनीं लक्ष्य पुरविलें पाहिजे.

## कालिदासाचें स्थल, चरित्र व स्वभाव.

कालिदासाच्या कालाप्रमाणें त्याच्या स्थलाचाही निर्णय होत नाहीं. उज्जयिनीच्या विक्रमादित्य राजाच्या दरबारीं तो होता अशी फार जुनी दन्तकथा प्रचलित आहे. कवि आपल्या तिन्हीं नाटकांत स्वतांच्या नांवापलीकडे आपणाविषयीं कांहींच

सांगत नाहीं ! त्याच्या काव्यांतील कित्येक उल्लेखांवरून मात्र त्याच्या विषयींचीं कांहीं अनुमानें काढतां येतात. मेघदूत-काव्यांत यक्षानें मेघाला रामगिरीपासून तो अलकेपर्यंतचा मार्ग सांगितला आहे. त्यांत उज्जयिनी, निर्विन्ध्या, अवन्ती, सिप्रा, महाकाल, गंभीरा, देवगिरी, चर्मण्वती, ब्रह्मावर्त, सरस्वती, कुरुक्षेत्र, जाह्नवी, हिमाद्रि, पशुपति, कैलास, मानस आणि अलका यांचे देखावे त्यानें आपल्या शब्द-चित्रानें वाचकांच्या डोळ्यांपुढें उभे केले आहेत. कुमारसंभवांतील त्याचें हिम गिरीचें वर्णन उदात्त, भव्य, गंभीर व वस्तुस्थितिदर्शक आहे. राजे, दरबारीलोक, त्यांचीं कारस्थानें, अंतःपुरांतील भानगडी, मृगया इत्यादिकांचीं वर्णनें तो हुबेहुब करतो. काश्मीर-देश हिंदुस्थानचें नंदनवन आहे. यांतील पाटल, शिरीष, कुंकुम इत्यादि विशिष्ट फुलांचा तो मोठा चहाता आहे. निसर्गाचीं अत्यंत सुंदर चित्रें तो काढतो. या सर्व गोष्टींवरून उज्जयिनी किंवा काश्मीर येथें कवीची वसति असावी व सर्व उत्तर हिंदुस्थानांत त्यानें प्रवास करून तेथली माहिती मिळविली असावी याविषयीं संशय राहात नाहीं. त्याच्या काव्यांवरून तो शृंगारप्रवण असून कामिजनांच्या मनोवृत्तींचें त्यास सूक्ष्म व मार्मिक ज्ञान असलें पाहिजे हें सहज दिसून येतें. अरुंधती, इंदुमती, सुदक्षिणा, यक्षस्त्री, शकुंतला, सीता, इत्यादि थोर स्त्रियांचीं त्यानें रेखाटलेलीं चित्रें उदार व रमणीय आहेत. त्यांवरून त्याचें स्त्रीदाक्षिण्य सूचित होतें. तिन्ही नाटकांतील नांदीपद्यें, शाकुंतलांतील भरतवाक्य, रघुवंशाचें मंगलाचरण, तसेंच मेघदूत व कुमारसंभव यांतील कित्येक उल्लेख, यांवरून कालिदासाची शिवभक्ति स्पष्ट होते. त्याच्या काव्यांतील उपमा, उत्प्रेक्षा, दृष्टान्त व विविध वर्णनें यांवरून वेद, बहुतेक दर्शनें, उपनिषदें, भारत, रामायण, अनेक पुराणें, धर्म, ज्योतिष, व्याकरण, मीमांसा, वैद्यक, मानसशास्त्र, मनुष्यस्वभाव इत्यादिकांचें त्याचें ज्ञान उत्कृष्ट होतें हें समजतें. त्याच्या काव्यांत निराशेचें किंवा विषण्णतेचे उद्गार कोठेंही नाहींत, यावरून तो सुखाच्या स्थितींत असावा असें अनुमान होतें. त्याच्या शृंगाररसप्रियतेवरून तो स्वभावाचा रंगेल असावा व त्याच्या नाटकांच्या प्रास्ताविक भागांवरून त्याची कीर्ति त्याच्या हयातींत पसरली असावी असा तर्क धावतो. त्याचें अवलोकन सूक्ष्म, ज्ञान व्यापक व विशद, कल्पना तरल, प्रतिभा उज्ज्वल, हृदय सानुकम्प, मन उदार, प्रवृत्ति विलास-प्रवण, व दृष्टि सौंदर्यसंशोधिनी होती हें त्याचीं काव्यें वाचून सहज लक्ष्यांत येतें. त्याची उपमांविषयीं ख्याति आहे. परंतु त्याच्या उपमा बहुधा रामायणादि

प्राचीन ग्रंथांतल्याच आहेत; तथापि त्यांत सफाई मात्र विशेष आहे असें दिसून येतें. त्याचे अर्थान्तरन्यास मात्र अपूर्व व अत्यंत शोभादायक आहेत यांत शंका नाहीं. प्रसन्नता व रसमयता हे दोन गुण त्याच्या काव्यांत सर्वत्र उत्कर्षानें वसत आहेत, आणि म्हणूनच अखिल रसिक समाज त्यावर स्तुतिकुसुमांची नुसती वृष्टि करीत राहिला आहे !

## कालिदासाचा काव्यप्रपंच व त्याची प्रतिष्ठा.

ऋतुसंहार आणि मेघदूत हीं दोन खंडकाव्यें; कुमारसंभव व रघुवंश हीं दोन महाकाव्यें; व मालविकाग्निमित्र, विक्रमोर्वशीय व शाकुंतल हीं तीन नाटकें असे सात काव्यग्रंथ कालिदासानें केले याविषयीं विद्वानांत एकमत आहे. हे सर्व रमणीय व रसिकवंद्य आहेत. सर्व प्रकारच्या काव्यरचनेंत नैपुण्य दाखविणारा हा कवि आहे. ही गोष्ट विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. वरील ग्रंथ कवीनें कोणत्या क्रमानें रचिले असावे याविषयीं निर्णायक असा बाह्य पुरावा उपलब्ध नाहीं. तथापि थोड्याशा अंतर्गत पुराव्याच्या आधारानें कवीच्या ग्रंथांचा रचनाक्रम बराच ठरवितां येणें शक्य आहे. मालविकाग्निमित्राच्या प्रस्तावनेवरून कवि नुकताच प्रसिद्धीस येत असल्याचा तर्क होतो. विक्रमोर्वशीयाच्या प्रस्तावनेवरून तो विद्वानांत मोडत असल्याचें दिसतें. शाकुंतलांतील प्रास्ताविक उल्लेखावरून तो लब्धकीर्ति व रसिक विद्वानांस वंद्य झालला वाटत आहे. यावरून त्याच्या नाटकांचा रचनाक्रम वर निर्दिष्ट केलेल्या नामक्रमाप्रमाणेंच असला पाहिजे. या नाटकाच्या नांदीपद्यांवरूनहीं हाच क्रम असावा असें वाटतें. मालविकाग्निमित्राच्या नांदीपद्यांत विरोधाभास नांवाच्या अलंकाराची तरुणपणाची हौस, विक्रमोर्वशीयाच्या नांदींत त्यापेक्षां वरच्या पायरीची, भक्ति व योग यांच्या साहाय्यानें भगवत्प्राप्तीची इच्छा, व शाकुंतलाच्या नांदींत विश्वव्यापक अष्टमूर्ति परमेश्वररूपाशीं तादात्म्य असें उत्तरोत्तर चढत्या प्रमाणांत आढळणाऱ्या परमेश्वरविषयक रतीच्या विचारांची प्रगल्भता दिसून येते. शिवाय संविधानकचातुर्य, कल्पनासौष्ठव, प्रतिभाविलास, रसपरिपोष, वर्णनकौशल्य इत्यादिकांवरूनसुद्धां वरील क्रमच उपपन्न ठरतो, व विद्वान् रसिक पंडितांनींही तोच मान्य केला आहे. ऋतुसंहारांत अर्थांतरन्यास नाहींत. वर्णनें ठरीव पद्धतीचीं आहेत. विचारांची व भाषेची प्रगल्भता मध्यम प्रकारची आहे.

कुमारसंभव, रघुवंश व मेघदूत यांत कवींचे सर्व गुण परिणतावस्थेस पोंचले आहेत. यावरून ऋतुसंहार प्रथम निर्माण होऊन त्यानंतर कुमारसंभवादि काव्यें तयार झालीं असावीं.

प्राचीन पौरस्त्य पंडितांत शास्त्रांचा इतका काव्यांना मान नसे. व्याकरण, न्याय, मीमांसा, वेदांत इत्यादिकांच्या पंक्तीला अलंकारशास्त्र बसूं शकत नसे. ' रण्डागीतानि काव्यानि ' असा दण्डक पडून गेला होता. तथापि, बाण गोवर्धनाचार्य, जयदेव अशांसारख्या सहृदयधुरीणकविवर्यांनीं असला दण्डक मोडून कविसार्वभौमाचें परोपरींनीं कौतुकच केलें! मल्लिनाथ, राघवभट्ट यांच्यासारख्या पंडितांपासून तों आधुनिक विद्यावाचस्पति सेतुमाधवाचार्य गजेंद्र-गडकर यांच्या पर्यंत अनेक विद्वानांनीं कवीश्वराच्या महनीय काव्यांस आपल्या टीकाग्रंथांनीं अलंकृत केलें. कालिदासाची महाकवि म्हणून सर्वत्र कीर्ति असली तरी शाकुंतलाचा कर्ता या नात्यानें तो पाश्चात्य विद्वान् रसिकांच्या आदरास विशेष पात्र झाला. सुमारें १५० वर्षांपूर्वी सर वुइलियम जोन्स नांवाचा इंग्रज गृहस्थ बंगाल्यांत न्यायाधीश होता. तो मोठा विद्याव्यासंगी होता. तो काशीच्या एका पंडिताजवळ संस्कृत भाषा शिकला. त्याच्या वाचनांत शाकुंतलनाटक आलें तेव्हां तो त्यानें अतिशय मोहून गेला. त्यानें सदर नाटकाचें इंग्रेजींत भाषांतर केलें. या भाषांतरामुळें कालिदास यूरोपीय देशांत प्रसिद्धि पावला. वरील इंग्रेजी भाषांतरानंतर शाकुंतलाचीं सर्व यूरोपीय भाषांत भाषांतरें झालीं व त्यायोगानें कालिदासाची कीर्ति दिगंताला जाऊन स्थिर झाली. जर्मनींतील कविमुकुटमणि गटे, विख्यात तत्ववेत्ता व प्रवासी हंबोल्ड, पंडितशिरोमणि श्लेजेल, तसेंच अलीकडील कित्येक पाश्चात्य रसिक वेबर, कॅपेलर, मॉनियर वुइलियम्स, वुइलसन्, लॉरेन्स इत्यादिकांनीं कालिदासाला हिंदुस्थानचा शेक्सपीअर, ठरविलें! कालिदासाची खरी योग्यता आपल्या निदर्शनाला येण्याला वरील पाश्चात्य पंडितांचे परिश्रमच कारणीभूत झाले आहेत. अलीकडील उच्चशिक्षणक्रमांत कालिदासाच्या काव्यांचा चिकित्सक पद्धतीनें अभ्यास सुरू आहे, तसेंच कित्येक महाराष्ट्रिय व बंगीय पंडित त्याच्या ग्रंथावर टीकात्मक विचार प्रदर्शित करीत आहेत याचेंही श्रेय उपर्युक्त पाश्चात्य विद्वानांस देणें आवश्यक आहे.

## शाकुंतलरचना.

महाभारतांतील आदिपर्वांत दुष्यन्तशकुंतलाख्यान आहे. त्याचा सारांश दुसरी-कडे दिला आहे. सदर आख्यानावरून कालिदासानें शाकुंतल नाटक रचिलें. प्रस्तुतचें भाषांतर व मूळ कथेचा सारांश वाचकांनीं वाचला म्हणजे त्यांना मूळ गोष्टींत कालिदासानें कोणते फेरफार करून व रम्य आणि अद्भुत सृष्टि कशी निर्माण केली आहे याची कल्पना सहज होईल. तथापि कांहीं फेरफारांविषयीं येथें थोडें लिहितों. मूळांतला दुष्यंत कालिदासाला पटला नाहीं असें दिसतें. त्याच्यावर शकुंतलेसंबं-धानें कपटीपणाचा आरोप न यावा एवढ्याकरितां कालिदासानें दुर्वासाच्या शापाची नवी कल्पना करून दुष्यन्ताची शकुंतलेविषयींची स्मृति नष्ट करून टाकली; व अशा प्रकारें 'शकुंतलेचें जीवित व अब्रू या दोहोंसही ईश्वराच्या हवा-ल्यावर टाकणाऱ्या' भारतीय दुष्यन्ताचें स्वरूप पार बदलून टाकलें! उश्शापा-करितां अंगठीची योजना केली. अंगठीमुळें कोळी व कोळ्यामुळें कोतवाल--प्रवेश ओघानेंच आले. दुष्यंत व शकुंतला यांची दृष्टादृष्ट होऊन तीं प्रणयानुकूल अवस्थेंत आणण्याकरितां स्थल, काल व परिस्थिति याची उचित सृष्टि निर्माण करावी लागली. पहिल्या तीन अंकांतील राजा व शकुंतला यांचा अनुराग व त्याची गांधर्वविवाहांत परिणति हीं मोठ्या रसिकतेनें कवीनें दर्शविलीं आहेत. कामिज-नांचीं हृद्गतें या प्रसंगीं कवीनें मोठ्या बहारीनें रेखाटलीं आहेत. त्यांत अस्वाभा-विक, ग्राम्य किंवा नीतिविरुद्ध कांहींच नाहीं. तरुणजनस्वभावोचित शृंगारचेष्टा यांत सुंदर रीतीनें चित्रित केल्या आहेत. अनसूया व प्रियंवदा अशा एकाहून एक सरस व रमणीय कल्पित पात्रांनीं या प्रकरणाचा उठाव अत्यंत मनोहर साधला आहे. दुष्यंताचा मनोरथ सहज सिद्धीस जावा या हेतूनें कवीनें काश्यपमुनींस लांब-च्या प्रवासावर पाठविलें आहे. चवथ्या अंकांतील व मूळांतील कथाभाग एकच आहे; पण तो नाटकांत अत्यंत काव्यमय आहे. यांत कविराजानें आपलें बुद्धि-सर्वस्व खर्ची घातलें आहे. प्रेक्षकास यांतील प्रत्येक गोष्ट पटते व तो शकुंतला, व कण्व यांशीं अगदीं समरस होऊन जातो. अद्भुत गोष्टी करुणरसास विघा-तक असतात. तथापि त्या अनेकवार घडलेल्या दर्शविल्यानें त्यांचें अद्भुतत्व नाहींसें होतें. आकाशवाणी, वनस्पतींनीं शकुंतलेला वस्त्राभरणें देणें इत्यादि गोष्टी चवथ्यांतील करुणरसास, वरील कारणांमुळें, अपकर्षक न होतां उपकारकच झाल्या आहेत. 'अश्रुप्रवाहो नाम चतुर्थोऽङ्कः' असें या अंकाला म्हटलें तर साजण्या-

सारखें आहे असें प्रिन्सिपाल राजवाडे यांनीं त्यांच्या दुसरीकडे छापलेल्या निबंधांत म्हटलें आहे तें अगदीं यथार्थ आहे. पांचव्या अंकांत दुष्यंत व शकुंतला हीं दोघेंही सत्यच बोलत आहेत. शकुंतलेला पूर्ववृत्त आठवतें म्हणून ती खरी, व राजाला त्याची विस्मृति पडली म्हणून तो खरा! असा चमत्कारिक व कुतूहलास्पद देखावा आहे! तथापि प्रेक्षकांच्या अनुकंपेचा कांटा हळूहळू शकुंतलेच्या बाजूस ढळूं लागतो. शेवटीं तर प्रेक्षक त्या दुर्दैवी निरपराध मुनिकन्येविषयीं सकरुण होऊन चिंतामग्न होतो! या अंकांत राजानें शकुंतलेला घालवून दिली व मेनकेनें तिला उचलून नेलें असें दर्शविलें आहे. येथें नाटक, मूळकथेप्रमाणें, संपावें. परंतु कवीला नायक व नायिका यांचा संगम घडवून आणावयाचा असल्यानें सहावा व सातवा अंक यांची उभारणी करावी लागली. संविधानकाचा ओघ पहिल्या तीन अंकांत अस्खलित चालला आहे. तो प्रसन्न व शांत आहे. चवथ्या अंकांत दुर्वासाच्या शापाची प्रचंड शिला त्यांत अकस्मात् येऊन पडते. पांचव्यांत दुष्यंतानें केलेल्या शकुंतलेच्या धिक्कारानें तर तो प्रचंड प्रवाह दुभंगून जातो. सहाव्यांत अंगुलि-दर्शनानें राजाची स्मृति पूर्वस्थितीवर येते त्यामुळें प्रवाहाचे झालेले दोन ओघ पुन्हां एके ठिकाणीं मिळूं पाहतात व सातव्यांत मारीच व अदिति यांच्या आशीर्वादानें कृतार्थ होणाऱ्या नायक व नायिका यांच्या भेटींत त्या दोन ओघांचा रमणीय संगम होतो! शाकुंतल हा सातमजली, भव्य, रम्य व वैचित्र्य-पूर्ण राजवाडा आहे. याच्या प्रत्येक मजल्यांत अमोल चिजा भरल्या आहेत. वसंतसेनेच्या सातचौकी वाड्याप्रमाणें याची शोभा केवळ अवर्णनीय आहे.

## स्थल, काल व कृति यांचें ऐक्य अथवा रसपरिपोष.

ग्रीक नाट्यशास्त्रांत स्थल, काल व कृति यांच्या ऐक्याचे नियम घालून दिले आहेत. युरोपीय नाट्यवाङ्मयांत त्यांची बरीच प्रतिष्ठा आहे. इंग्रजी वाङ्मयांत तयार झालेले पंडित या ऐक्याची कसोटी पौरस्त्य नाट्यवाङ्मयाला लावीत असतात. शाकुंतल नाटक त्या कसोटीला पूर्णपणें उतरतें. पहिल्या चार अंकांत कण्वाश्रम व त्याचे परिसर, पांचव्या व सहाव्या अंकांत हस्तिनापुरांतील राजवाडा व प्रमदोद्यान, व सातव्यांत मारीचाश्रम, अशी या नाटकांत स्थलासंबंधानें योजना आहे. पहिल्या पांच अंकांत सुमारें पांच महिन्यांचा काल जातो.

सहाव्या व सातव्या अंकांत सहा वर्षांचें अंतर पडतें. स्थल व काल यांच्यांत वरील खिंडी पडल्या आहेत. पण कथानकाच्या सुश्लिष्टपणामुळें व रमणीयतेमुळें सहृदय प्रेक्षकांचें त्यांकडे लक्ष्य देखील जात नाहीं! मग त्यांतला विसंगतपणा प्रत्ययाला येणें तर दूरच! प्रस्तावनेंत ग्रीष्मऋतूचें वर्णन आहे. कथाभागालाही त्याच ऋतूंत आरंभ झाला आहे. हा समकालसंयोग पुढील कथेला इतका अनुकूल आहे कीं, सहृदय प्रेक्षक त्यामुळें फार प्रसन्न होतो. दुष्यन्त व शकुंतला या मुख्य पात्रांच्या हातून जी कृति कवीनें घडवून आणली आहे, ती सर्व सुसंगत व रम्यच आहे. पौरस्त्य नाट्यशास्त्रनियमांप्रमाणें तर शाकुंतल निर्दोष आहे. ही गोष्ट राघव--भट्टांनीं आपल्या टीकेंत विशद केली आहे. वस्तुतः रसोत्कर्ष हाच नाटकाचा एकच व खरा निकष आहे. विभाव, अनुभाव इत्यादिकांच्या औचित्यानें स्थायिभाव परिपुष्ट होऊन रसोत्पत्ति होते. स्थल, काल व कृति यांचा पूर्ण संवाद अथवा ऐक्य म्हणजेच विभावादिकांचें ऐक्य होय. एखाद्या नाटकांत रसोत्कर्ष उत्कृष्ट रीतीनें झाला आहे एवढें म्हटलें म्हणजे पाश्चात्य व पौरस्त्य नाट्यशास्त्रांच्या कसोटीला तें उतरलें म्हणून समजावयाला हरकत नाहीं. शाकुंतलांत शृंगार, करुण व शांत हे उत्कटतेनें प्रतीत होतात. भयानक, वत्सल, हास्य, अद्भुत व वीर हेही मधून मधून चमकतात. हे रस आलटून पालटून योग्य क्रमानें आल्यामुळें उठावदार दिसतात. पहिल्या अंकाच्या आरंभीं शिकारीच्या देखाव्यांत वीररसाची छटा दिसते. नंतर हरिणाच्या प्राणत्राणार्थ चाललेल्या पलायनांत भयानकाची लकेर मारते. राजानें बाण भात्यांत परत टाकल्यापासून तों त्याच्या आश्रम-प्रवेशापर्यंत शांताचा अम्मल बसूं पाहतो. पण पुढें राजाच्या दृष्टीस मुनिकन्या पडल्यापासून हळूं हळूं शृंगाराचा उत्कर्ष होत जातो. अंकाच्या शेवटीं मत्त हत्ती तपोवनांत उधळल्याची बातमी पसरते व भयानकाची छाया दिसूं लागते. तथापि पहिल्या अंकांत शृंगारच सर्वातिशायी आहे. दुसऱ्या अंकांत हास्यरसानें सुरुवात होते, व तो रस शृंगाराला पूर्ण साहाय्य करितो. तिसऱ्या अंकांत तर शृंगाराला अभिषेकच झालेला आहे. चवथ्या अंकांतील शकुंतलेची सासरीं पाठवण म्हणजे करुणरसाचें हृदयंगम विहारस्थल होय. यांतील कांहीं अद्भुत गोष्टींनीं करुणाचा अपकर्ष कां होत नाहीं हें मागें सांगितलें आहे. पांचव्यांत आरंभीं थोडा शांत, पुढें धर्मवीर आणि रौद्र व शेवटीं अद्भुत. सहाव्यांत हास्य, अद्भुत व करुण व सातव्यांत अद्भुत, वत्सल, करुण व शांत प्रकट झाले आहेत.

## दुष्यन्त.

कण्वाश्रमांत प्रविष्ट होण्यापूर्वी व पुढें पांचव्या, सहाव्या व सातव्या अंकांत, दुष्यंताचें धीरोदात्तत्व बरेंच प्रत्ययाला येतें. शौर्य, धैर्य, गांभीर्य, प्रजावत्सलता, न्यायीपणा, ऋषिजनाविषयीं आदरबुद्धि, पत्नीप्रेम, पुत्रप्रीति इत्यादि त्याचे गुण यांत प्रकट झाले आहेत. शकुंतलेला पाहिल्या पासून तो दुर्वासाच्या शापानें शकुंतलेचें विस्मरण पडेपर्यंत तो भ्रमरवृत्ति कामुक दिसतो. दुष्यंताविषयीं बोलावयाचें म्हणजे त्याच्या वेळचीं धर्माचीं व नीतीचीं बंधनें पाहूनच बोलणें योग्य आहे दुष्यंतानें शकुंतलेशीं गांधर्वविवाह केला ही गोष्ट धर्मशास्त्रसंमतच होती व नीतिविरुद्धही नव्हती. परंतु दुष्यंतानें शकुंतलेशीं अधीरपणानें गांधर्वविवाह उरकण्याची आवश्यकता होती किंवा कसें हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. मृगयेला निघालेल्या दुष्यंताचें वय पराकाष्ठा तीस पस्तीस वर्षांचें असावें. त्याच्या राण्या अर्थात् वीस पंचविशीच्या आंतल्या असल्या पाहिजेत. संततीविषयीं निराश होण्याचें दुष्यंताला कारण नव्हतें. वैखानसानें दिलेला चक्रवर्ति पुत्र होण्याचा आशीर्वाद शकुंतलेच्याच ठिकाणीं फलित व्हावा असें नव्हतें. शकुंतलेची भेट केवळ यदृच्छेनें घडून आलेली. शकुंतलेचा पिता दूरवर प्रवासाला गेलेला. शकुंतला विवाहाच्या बाबतींत परतंत्र असलेली. अशा स्थितींत दुष्यंताच्या अनिवार्य मदनोद्रेकाशिवाय दुसरी कोणती गोष्ट त्याच्या उतावळ्या कृतीचें समर्थन करूं शकणार ? शकुंतलेच्या लोकोत्तर सौंदर्यास याबद्दल जबाबदार धरणें म्हणजे दुष्यन्ताचें मनोदौर्बल्य व उतावीळपणा कबूल करण्यासारखेंच आहे. दुष्यंताच्या धीरोदात्तत्वाला हा प्रकार फारसा शोभण्यासारखा नाहीं. प्रस्तावनेंतील नटीकृत ग्रीष्मवर्णनांतला भ्रमर, पहिल्या अंकांतील शकुंतलेला पीडा देणारा भ्रमर व पांचव्या अंकांतील हंसपदिकेनें गाइलेल्या गीतांतला भ्रमर, हें भ्रमरत्रय, दुष्यन्ताची भ्रमरवृत्ति ध्वनित करतें असें डॉ. बेलवलकर म्हणतात त्यांत अर्थ आहे. तथापि हंसपदिकेच्या गीतावरून, प्रिन्सिपाल राजवाडे दुसरीकडे म्हणतात त्याप्रमाणें, राजाच्या मनाची ' अनिर्वचनीय हुरहुर ' देखील व्यंजित होत नाहीं असें नाहीं. कालिदासाच्या तिन्ही नाटकांतील नायक जवळ जवळ एकाच वृत्तीचे म्हणजे शृंगारप्रवण आहेत. परंतु त्यांतल्या त्यांत दोन राण्या जिवंत असतां बंदींत असलेल्या दुर्दैवी राजकन्येवर डोळा ठेवणारा अग्निमित्र, तसेंच पहिली राणी विद्यमान असतां अमरांच्या साधारणस्त्रीवर (वेश्येवर) आसक्त होणारा व पुन्हां तिच्याच समक्ष तिसरीचा अभिलाष धरून तिची वंचना करूं पाहणारा

पुरूरव यांच्यापेक्षां व शृंगारतरंगिणींत डुंबत राहणाऱ्या रघुवंशीय अग्निवर्ण राजापेक्षां दुष्यंत निःसंशय चांगला आहे. दुष्यंतकालच्या धर्मशास्त्रांचा व नीतितत्त्वांचा फायदा श्रीरामचंद्राला घेतां येण्यासारखा होता. तथापि तो तसा घेऊन अनेकपत्नीकत्व स्वीकारण्याचा मोह त्यास झाला नाहीं ! एवढेंच नव्हे तर सीतादेवीचा विरह झाल्यावर सुद्धां, दुसरा विवाह न करतां, तिची सुवर्णप्रतिमा जवळ ठेवून त्यानें अश्वमेघ सिद्धीस नेला ! असल्या उदारचरित रामापुढें दुष्यन्त फिका पडतो एवढेंच आमचें म्हणणें आहे. दुष्यंताची भ्रमरवृत्ति गृहीत झाली म्हणजे पहिल्या तीन अंकांतील शृंगार सर्वथैव उपपन्नच आहे.

## शकुंतला, अनसूया व प्रियंवदा.

शकुंतलेंत विश्वामित्राचा तेजस्वीपणा व मेनकेचें लोकोत्तर सौंदर्य उतरलें होतें. दुष्यंतासारखा राजा तिला पाहतांच वेडा होतो व तिच्या सौंदर्याचीं स्तोत्रें गाऊं लागतो! शकुंतला शमप्रधान व कष्टदायक तपोवनांत वाढली तरी तिचे मूळचे गुण कायमच होते. ती वल्कलानेंही रम्यच दिसत होती. शकुंतलेचें वय १८-२० वर्षांचें असावें. कवीनें जवळ जवळ तिच्याच वयाच्या दोन मुनिकन्या-अनसूया व प्रियंवदा-आपल्या प्रतिभेनें निर्माण करून नाट्यकथेला अपूर्व रंग आणला आहे ! शकुंतला तिघींत वयानें व गुणांनीं श्रेष्ठ तशीच आपल्या सख्यांशीं व पित्याशीं अतिप्रेमळपणानें वागणारी आहे. अनसूया प्रियंवदेपेक्षां थोडी मोठी व स्वभावानें गंभीर, सात्त्विक व व्यवहारज्ञ दिसते. प्रियंवदा नांवाप्रमाणेंच गोड बोलणारी, तडफदार, विनोदी, आनंदी, हजरजबाबी, चाणाक्ष व धीट आहे. ही आपल्या रंगेलपणानें दुसऱ्या दोघींसही मागें टाकते. हें पात्र फारच गोड आहे. या सर्व मुली परस्परांवर अकृत्रिम प्रेम करणाऱ्या, आश्रमधर्मांत निपुण असणाऱ्या, लेखनवाचनांत, गायनकलेंत, चित्रें काढण्यांत व काव्यें रचण्यांत पटाईत होत्या. प्राचीन पुराणेतिहास त्यांस पूर्ण अवगत होते. संसाराचा साक्षात् अनुभव त्यांस नव्हता. तरी कामदेवाचा प्रताप त्यांस ऐकून ठाऊक होता. शकुंतलेच्या विवाहाच्या गोष्टी घरांत निघत. त्या त्यांनीं ऐकिल्या होत्या. तारुण्याच्या भरांत असल्यामुळें एकमेकींची थट्टा करण्याची त्यांची साहजिक प्रवृत्ति होती. प्रेमळ, पवित्र व तपस्वी पित्याच्या शांत व दांत आश्रमांत वास्तव्य असल्यामुळें तपोवनविरोधी विकार त्यांच्या मनांत जागृत होणें फारसें शक्य नव्हतें. त्या सर्वांचें आच-

रण साधें, सरळ, शुद्ध, नम्रपणाचें व प्रेमळ असे. अतिथिसत्कारासारखीं जबाबदारीचीं कामें करण्याची त्यांस पात्रता आलेली होती. शकुंतलेला आई नसल्यामुळें कण्वमुनींचें तिच्यावर असीम प्रेम होतें. अशा सुंदर वातावरणांत वाढलेल्या त्या मुली होत्या. त्यांना कोणतीही चिंता, भय किंवा संकोच नव्हता. यामुळें त्यांची वाढ उत्कृष्ट झालेली होती. आश्रमांतील लता, वृक्ष, मृग, पक्षी इत्यादिकांवर त्यांचें बंधुप्रेम होतें. याची कल्पना शहरांतील कृत्रिम राहणींतल्या लोकांना येणें कठिण आहे. खेडेगांवांतल्या शेतकऱ्यांना मात्र ती थोडीशी येण्याचा संभव आहे. दारूच्या भोतावर ठिणगी पडण्याचा अवकाश कीं, स्फोट किंवा भडका ठेवलेलाच. त्याप्रमाणें यौवनानें मुसमुसलेल्या अशा त्या मुनिकन्यांची स्थिति होती. संधि मिळण्याचा उशीर कीं पंचायुधप्रभावाचा चमत्कार दृष्टीस पडावयाचाच. तोच प्रकार दुष्यंताच्या दर्शनानें शकुंतलेचा झाला. तथापि दुष्यंताशीं तिचें वर्तन मर्यादेचें, धिमेपणाचें व कुलीन आर्यस्त्रीला शोभण्यासारखें आहे. राजा सलगी करूं लागला तेव्हां ती ' रक्ष विनयम् ' ( मर्यादा राख ) असें त्याला म्हणते. गांधर्वविवाहाला गुरुजनाची अनुमति पाहिजे, आपण त्या बाबतींत स्वतंत्र नाहीं असें ती दुष्यंताला बजावते. परंतु गांधर्वविवाहाला गुरुजनांची अनुमति आवश्यक नाहीं; तिच्याशिवाय तो विवाह शास्त्रोक्त व धर्म्य आहे अशी दुष्यंत तिची खात्री पटविण्याचा यत्न करतो. शेवटीं निरुपायास्तव ती त्याला वश होते. पांचव्या अंकांत दुष्यंत तिला ओळखत नाहीं. तिच्याविषयीं आपल्याला काहीं एक आठवत नाहीं असें तो म्हणतो; व तिचा स्वीकार करण्याचें नाकारतो. आपली फसगत झाली असें वाटून शकुंतलेचें मन कचरतें. तथापि न रागावतां खुणेची वस्तु दाखवून ओळख पटवून देण्याचा ती यत्न करते. पण तो दुर्दैवानें फसतो ! त्यामुळें दुष्यंताला अधिक जोर येतो; व तो कठोर भाषण करूं लागतो. शकुंतलेच्या आईबापांची निंदा ध्वनित करतील असे शब्द ( स्त्रीणामशिक्षितपटुत्वमित्यादि ) त्याच्या तोंडांतून बाहेर पडतात. तेव्हां शकुंतला फारच रागावते. स्त्रियांना मरण देखील पत्करतें. पण पतीनें केलेली आईबापांची निंदा सहन करवत नाहीं. हा त्यांचा स्वभाव या ठिकाणीं कवीनें फार मार्मिकपणें दर्शविला आहे. शकुंतला रागानें लाल होते. यावेळीं तिचें क्षात्रतेज विद्युल्लतेसारखें चमकूं लागतें. ती त्या तेजानें राजाला दग्ध करील कीं काय असें वाटूं लागतें. रागाच्या भरांत ती दुष्यंताचा कडक शब्दांनीं समाचार घेते. परंतु लागलीच पूर्वीच्या आर्यवृत्तविरु

असे. ती आपल्या नशीबाला बोल लावूं लागते व 'आई वसुंधरे! मला तुझ्या पोटांत ठाव दे' अशी दीनवाणीनें करुणा भाकते! इतक्यांत तिची आई मेनका तिला उचलून घेऊन मारीच मुनींच्या आश्रमांत नेऊन ठेवते. तेथें शकुंतला यथाकाल प्रसूत होते. तिला चक्रवर्ती पुत्र होतो. त्याचें पालन व पतीचें चिंतन करीत ती यतीचे कडक नियमधर्म आचरिते व पतिव्रताधर्मानें तपश्चर्या करीत दिवस कंठिते. दुष्यंताची भेट होईपर्यंत तिचें विरहव्रत अखंड चालतें. ती त्या व्रतानें अत्यंत क्षीण होऊन जाते. दुष्यंताची गांठ पडल्यावरही ती त्याला दोष देत नाहीं. आर्य पतिव्रतेला साजेल असें हें शकुंतलेचें वर्तन आहे. कालिदासाच्या नाटकांतील सर्व नायिकांत शकुंतला श्रेष्ठ आहे. ती दुष्यंताला आपल्या चारित्र्यानें दिपविते. 'वीरप्रसविनी भव' हा आशीर्वाद तिला चहूंकडे मिळतो. यावरून तिची प्रभावशालिता व भाग्यसंपत्ति सूचित होते. अग्निमित्राच्या दिमाखदार व मानिनी राण्यांपुढें बिचारी मालविका अगदीं हतप्रभ झालेली आहे! सर्वातिशायिनी शकुंतले पुढें तर ती कःपदार्थ आहे! ऊर्वशी सौंदर्यानें शकुंतलेची बरोबरी करणारी आहे. परंतु नायिकेच्या दृष्टीनें त्या देवपण्यांगनेविषयीं आदर उत्पन्न होत नाहीं. शिवाय असूयावती प्रतिस्पर्धिनी राणी तिच्याबरोबर रंगभूमीवर दाखविली गेल्यामुळें ती प्रेक्षकांच्या डोळ्यांत भरत नाहीं. दुष्यंताच्या राण्या रंगभूमीवर येत नाहींत. त्यांचा उपसर्ग शकुंतलेस पोंचत नाहीं. यामुळें विजयिनी सार्वभौमिनीसारखी ती एकटीच प्रेक्षकांच्या हृदयसिंहासनावर अधिष्ठित होते, व आपल्या अपूर्व प्रभावानें चमकत राहते.

## दुर्वास, काश्यप व मारीच.

हे तीन मुनि निरनिराळ्या अवस्थांचे सूचक आहेत. ब्रह्मचर्याचें तेज, शीघ्रकोपित्व, अकरुणत्व व दुर्दान्तत्व हे धर्म दुर्वासांत प्रकट झाले आहेत. काश्यप सिद्धिसंपन्न आहे. आरण्यक असून गृहस्थाश्रमांतील कौटुंबिक सुखदुःखांचा अनुभव घेणारा असा प्रेमळ व उदार भावनांचा हा लौकिकज्ञ पुरुष आहे. मारीच पत्नीसह हेमकूटावर अहेतुक तपश्चर्या करणारा, भूमि व स्वर्ग यांविषयीं उदासीन असणारा, लोकहितैकतत्पर पण मोक्षप्रवण असा मुनि आहे. दुष्यंत व शकुंतला याच्याच आशीर्वादानें कृतार्थ झाले आहेत.

## मुनिशिष्य.

वैखानस पंधरा सोळा वर्षांचा मुनिकुमार आहे. पण राजाला आशीर्वाद देण्याइतकी व राजानें दांडगाई केली तर त्याला शापून शासन करण्याइतकी त्याची तपश्चर्या झालेली दिसते! शार्ङ्गरव व शारद्वत ही जोडी गुरुनिष्ठ व तपः-संपन्न आहे. तिच्यांतील पहिला तापट व सडेतोड व दुसरा सात्त्विक व विवेकी आहे. मारीच मुनि दुष्यंतविषयक संदेश देऊन गालव नांवाच्या मुनिकुमाराला कण्वमुनीकडे आकाशमार्गानें पाठवितो. त्या लहान मुलाचें आकाशांतून जाण्याचें सामर्थ्य पाहून आपणांस आश्चर्य वाटतें.

## गौतमी.

शकुंतलेला आई नव्हती. तिची उणीव गौतमीनें कांहीं अंशीं भरून काढिली आहे. ही बाई मोठी व्यवहारज्ञ व प्रेमळ होती. शकुंतलेला सासरीं जातांना कण्वांनीं उपदेश केला त्यासंबंधांत त्यांनीं गौतमीला अभिप्राय विचारिला. दुष्यंताच्या दरबारांत दुर्दैवी शकुंतलेला एकट्या गौतमीचाच आधार होता!

## विदूषक.

इतर संस्कृत नाटकांतल्याप्रमाणें हें ठरीव विनोदी पात्र नाहीं. दुसऱ्या, पांचव्या व सहाव्या अंकांत अप्रत्यक्षपणें याची संविधानकाला मदत झाली आहे; व ती त्याच्या रंगभूमीवरील आगमनानें झाली नसून निर्गमनानें झाली आहे! याचा विनोद सभ्यपणाचा व रसपरिपोषक आहे. नायिकेशीं हा लघळपणा करीत नाहीं एवढेंच नाहीं तर कवीनें नायिका याच्या दृष्टीस देखील पाडिली नाहीं!

## आंगठी.

पहिल्या व तिसऱ्या अंकांत हिचें प्रयोजन लक्ष्यांत येत नाहीं. चवथ्यांत तें दिसून येतें. पांचव्यांत आंगठीचा घातकीपणा प्रत्ययाला येतो. सहाव्यांत ती राजाला पुन्हां मिळते. सातव्यांत ती शकुंतलेच्या दृष्टी पडते. शकुंतला तिला फसवी म्हणते. पण शेवटीं दुष्यंताप्रमाणें तीहि निरपराध ठरते व राजहस्तांगुलीवर विलासानें आरूढ होते! हें आंपठीचें उपकथानक मुख्य संविधानकाला अत्यंत उपकारक झालें आहे. या निर्जीव आंगठीनें सजीव पात्रांपेक्षांही मोठा पराक्रम

गाजविला आहे ! त्यावरून या नाटकाला सर वुइलियम जोन्स यानें ‘ The Fatal Ring ’ असें यथार्थ नांव दिलें आहे.

## विक्रमोर्वशीय आणि शाकुंतल.

विक्रमोर्वशीयांतील दोष काढून टाकून दुसरें अधिक चांगलें नाटक तयार करण्याच्या हेतूनें कालिदासानें शाकुंतल निर्माण केलें असें वाटतें. कारण, पुष्कळ साम्य असलेलीं दोन नाटकें कवी कशाला लिहील ? दोहोंतील साम्यप्रसंग पुढीलप्रमाणें आहेत. दोन्हींचें मूळ पुराणांत. दोहोंचे नायक पुरुकुलोत्पन्न. दोन्ही नायिका एका वर्गातल्या. दोन्ही कृतींचा विषय प्रेम. दोन्हींत शृंगाररस प्रधान. दोन्हींत नायक व नायिका यांची गांठ आकस्मिक; व पहिल्याच दर्शनानें त्यांचें प्रेमार्पण. एकांत दैत्याच्या कचाटींतून नायिकेची सोडवणूक तर दुसऱ्यांत मधुकराच्या तावडींतून नायिकेची सुटका. दोहोंत नायिकांना शाप व उश्शाप. दोहोंत नायक व नायिका यांचा विरह व शेवटीं आकस्मिक संगम. दोहोंत पराक्रमी मुलगे. दोहोंत पितापुत्रांची अकल्पित भेट. एकाच्या पहिल्या अंकांत राजाचें रथांत बसून अंतरिक्षांत गमन तर दुसऱ्याच्या शेवटच्या अंकांत राजाचें रथांत बसून स्वर्गातून हेमकूटावर अवतरण. दोहोंत रथवेगाचें वर्णन. एकांत नारदाचा प्रसादयुक्त संदेश तर दुसऱ्यांत मारीचाचा आशीर्वाद. यांतील प्रत्येक प्रसंग शाकुंतलांत अधिक सरसतेनें व निर्दोषपणें उतरला आहे.

## शाकुंतलाचा हेतु व त्यापासून बोध.

शाकुंतल रचण्यांत कवीचा काय हेतु आहे व त्यापासून बोध काय घ्यावयाचा हा महत्त्वाचा प्रश्न आहे. वाङ्मयाचें काव्य हें उत्तमांग होय. काव्याचा प्रधान हेतु मनोरंजन असतो. यामुळें त्यांत कलाविलासाची मोठी प्रतिष्ठा असते. काव्यांतही दृश्य काव्य अथवा नाटक त्रिगुणोद्भव नानारसात्मक लोकचरित असून तें भिन्न भिन्न रुचीच्या लोकांचें करमणुकीचें एकच उत्कृष्ट साधन आहे असें कविराज स्वतांच मालविकाग्निमित्रांत सांगतो. ‘ कलाविलासाच्या मागें हेतुसंशोधनाचा गुप्त पोलीस लावून दिला तर अनर्थकारक परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं. ’ असें एक रसिक टीकाकार म्हणतात. हेतुसंशोधनाचा गुप्त पोलीस कालिदासाच्या नाटकांच्या मागें लावण्याचें कारणच पडत नाहीं. त्यांतील बोध तर

संविधानकावरून अभिव्यक्त होतो. शाकुंतलांत एका भाग्यशाली दंपतीच्या दुर्दैवाचा करुण इतिहास आहे, त्यावरून सुखदु:खें कोणासही सुटत नाहींत, तीं चक्रनेमिक्रमानें मनुष्यमात्रानें भोगलींच पाहिजेत, असा धडा कवीच्या मनांत शिकवावयाचा आहे, असें प्रिन्सिपाल राजवाडे यांच्याप्रमाणें, आम्हांसही वाटतें. त्या करुण कथेंत लौकिक व अलौकिक यांचें अत्यंत मधुर मेलन झालें आहे व त्यामुळें तें सामान्य जनतेच्या तसेंच रसिक पंडितांच्याही अत्यादरास पात्र झालें आहे. या संबंधांत आमचे मित्र प्रो. लागू म्हणतात:—

"कालिदासाच्या शाकुंतलाकडे मुख्यत: काव्यदृष्टीनेंच पाहिलें पाहिजे. शाकुंतल हें नाटक आहे, आणि नाटकाचें मुख्य कार्य म्हणजे जनतेचें रंजन करणें हें होय. The theatre is a function of the crowd. अशी जी एका विख्यात रसिकानें नाटकाची व्याख्या केली आहे तिचें शाकुंतल हें उत्कृष्ट निदर्शन आहे. कालिदासास ही व्याख्या संमत आहे ही गोष्ट त्याच्या मालविकाग्निमित्र नाटकांतील 'नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम्' या वचनावरून सिद्ध होत आहे. शाकुंतलानें शतकानुशतकें जी लोकप्रियता संपादन केली आहे, पौरस्त्य आणि पाश्चात्य स्त्रीपुरुषांना त्यानें जी भुरळ पाडली आहे, त्यांतील बीज हेंच नव्हे का कीं कालिदासाच्या या नाटकांत आपल्याला मनुष्यस्वभावाचें व मनुजसृष्टीचें हुबेहूब चित्र रेखाटलेलें आढळतें? मनुजसृष्टीचें अनुकरण (Imitation of life) हें सर्वच काव्यांचें ध्येय. नाटकासंबंधानें तर तें सर्वस्वी खरें आहे. अलौकिक गोष्टी शाकुंतलांत पुष्कळ सापडतील. इंद्र आहे, मातली आहे, स्वर्ग आहे, तरुलता शकुंतलेला आभरणें देतात, कोकिल तिला निरोप देतात, तिचा मुलगा सिंहाच्या छाव्याला कवटाळून धरून त्याचे हालहाल करतो. तरी पण त्या अलौकिकाच्या पडद्यावर (canvas of romance) कवीनें लौकिक अनुभवांचींच (Reality) चित्रें रेखाटलीं आहेत. कालिदासाच्या शाकुंतलांत अलौकिक (Romance) व लौकिक (Reality) यांचा मनोहर संगम झालेला आहे. पितापुत्रांचें परस्पर प्रेम, मुग्ध बालिकांचा मधुर विनोद, अपत्यस्नेह, कोतवालाची लबाडी व कोळ्याचें धैर्य इत्यादि, ज्या गोष्टी आपण नित्यश: पाहतों व अनुभवितों, त्यांचेंच प्रतिबिंब आपल्याला

शाकुंतलांत पहावयाला सांपडतें. शेक्सपीअरची थोरवी त्यांतच आहे. He holds the mirror up to life, असें जें त्याच्या संबंधानें म्हणतात तें कालिदाससंबंधानें म्हणतां येईल. याशिवाय शाकुंतलांत स्वभाववैचित्र्य किती आहे ! प्रियंवदा व अनसूया मैत्रिणी खऱ्या पण त्यांच्या स्वभावांत पुष्कळ अंतर आहे. कालिदासाच्या नाटकांतील पात्रें कळसूत्री बाहुलीं नव्हेत. प्रत्यक्ष सृष्टींत वावरणाऱ्या आपल्या प्रियजनांपेक्षांही तीं आपल्याला जास्त प्रिय आहेत. सारांश, ज्यानें आपल्या प्रतिभाबलानें कण्व, शकुंतला, प्रियंवदा इत्यादि सत्यसृष्टींत दिसणाऱ्या स्त्रीपुरुषांसारख्याच पण अमर्त्य अशा प्रकृति निर्माण केल्या आणि वाचकांना हरहमेश येणाऱ्या अनुभवांचें चित्र आपल्या नाटकांत रेखाटलें, त्या कालिदासाचें तत्त्वज्ञान कितीही असो त्यानें आपल्या नाट्यचतुर लेखणीनें वाचकांच्या मनाची करमणूक केली हें खास. ”

लक्ष्मणशास्त्री लेले.

श्री

# मराठी शाकुंतल

## अंक पहिला

( मंगलाचरण )

[ गीति ]

*जी आद्य सृष्टि विधिची; विधिहुत हवि जी सुरांसि पोंचविते;
उभ्या दोघी कालातें नियमिति; यजमानरूप जी वरिते;
जी शब्दगुण असोनी व्यापुनि विश्वासि राहिली साची;
जी मूलप्रकृति असें मानिति बुधवर पदार्थमालाची;
जी प्राण्यांचा प्राणचि; ऐशा प्रत्यक्ष आठ तनु धरुन
विलसे भुवनामाजीं; तो शिव तुमचें करो सदा अवन ! १

( मंगलाचरण झाल्यावर )

**सूत्रधार**-( पडद्याकडे पाहून ) प्रिये ! पात्रें सजविण्याचें वगैरे काम संपलें असल्यास इकडे येऊन जा पाहूं.

**नटी**-( प्रवेश करून) प्राणनाथ ! ही मी आलें.

**सूत्रधार**-प्रिये ! या सभेंत बहुतेक विद्वान् लोक आहेत; आणि आज तर

---

* या अर्थाचें दुसरें पद्य--

[ स्रग्धरा ]

जी आद्या धातृसृष्टी; मखविधि करि जी; जी हविर्भाग वाही;
उभ्या दो कल्पीति काला; श्रवणविषय जी व्यापुनी विश्व राही;
जीलागी सर्वबीजप्रकृति वदती; जी प्राणियां प्राण देते;
त्या आठां मूर्तिनीं जो प्रगट भुवनीं, तो ईश रक्षो तुम्हातें !

ज्याचें संविधानक कालिदास कवीनें रचिलें आहे त्या अभिज्ञानशाकुंतल नांवाच्या नव्या नाटकाचा प्रयोग करून दाखवून या सभेची सेवा करावयाची आहे. या करितां प्रत्येक पात्रानें आपलें काम उत्कृष्ट वठेल अशी काळजी घेतली पाहिजे.

**नटी**—प्रयोग बसविण्यांत तर इकडचा हातखंडा आहे. मग कांहीं उणें पडेल याची शंका मुळींच नको यायला.

**सूत्रधार**--प्रिये ! तुला यांतलें खरें मर्म सांगतों.

[ गीति ]

*पंडित तुष्ट न तोंवरि अपुरें गमतें प्रयोगविज्ञान;
जन बहु शिकला तरि त्या न आत्मविश्वास वाटतो, जाण. २

**नटी**—हं ! इकुडचें म्हणणें खरें आहे. पण आतां पुढें काय करावयाचें याची आज्ञा व्हावी.

**सूत्रधार**—सभासदांच्या कानांच्या करमणुकीशिवाय दुसरें काय असणार ? म्हणून विलासाचे उपभोग घेण्यास योग्य अशा या नुकत्याच सुरू झालेल्या ग्रीष्म ऋतुसंबंधानेंच गा. कारण, या कालांत

[ व. ति. ]

[1]आनंद दे जलविहार मना अमूप;
छायेंत दाट तरुच्या सहजींच झोंप;
रानांत पाटलसुगंधि वहाति वारे;
वाटे दिनांतसमयीं रमणीय सारें. ३

---

* याच अर्थाचें दुसरें पद्य.–

[ वंशस्थ ]

प्रसन्न विद्वज्जन जों न होय तों
प्रयोगविज्ञान पुरें न मानितों;
परिश्रमें शिक्षण लाभलें तरी
गमे अविश्वास जना निजान्तरीं.

1. याच अर्थाचें दुसरें पद्यः–

[ व. ति. ]

आनंददायक गमे सलिलीं विहार, रानांत पाटलसुगंधित वायु गार ;
छायेंत दाट तरुच्या सहजींच निद्रा, सायंतनीं समयिं सृष्टि सुरम्यमुद्रा.

**नटी**—सांगणें झालें तसेंच करितें. ( गाऊं लागते )

[ द्रु. वि. ]

अलि जयां प्रणयें हलुं चुंबिती, मृदुल केसर ज्यांत विराजती;
अशि शिरीषसुमें श्रवणावरी, सदय तो प्रमदाजन आदरी. ४

**सूत्रधार**—प्रिये, बहार केलीस ! अहाहा ! तुझ्या या रागदारीच्या गाण्यानें भारून जाऊन ही सगळी सभा कशी चित्रासारखी तटस्थ झाली आहे ! तेव्हां आतां कोणत्या नाटकाचा प्रयोग करून दाखवून हिचें रंजन करावें बरें ?

**नटी**-हें काय बाई ! प्रारंभींच नाहीं का इकडून सांगण्यांत आलें कीं, अभिज्ञानशाकुंतल या नव्या नाटकाचा प्रयोग करून दाखवायचा आहे म्हणून !

**सूत्रधार**-हो ! बरी आठवण केलीस ! इतक्यांत पहा कसें विसरलों तें ! कारण,

[ गीति ]

हरिलें मनासि माझ्या या तुझिया मधुर गीतरागानें,
या दुष्यंतनृपाळा जेवि महावेगवान् कुरंगानें. ५

( दोघे जातात. प्रस्तावना संपते. नंतर पुढल्या बाजूला हरिण व त्याच्या मागें रथांत धनुष्यबाण घेऊन बसलेला राजा व सारथी असा प्रवेश. )

**सूत**-( राजाकडे आणि हरिणाकडे पाहून राजास )

[ व. ति. ]

हा कृष्णवर्ण पुढतीं मृग धांवताहे,
हातीं तुझ्या धनु सुसज्ज विराजताहे.
पाहोनियां उभयतांस मृगानुगामी
पाहीं गमे खचित मूर्त पिनाकिला मी ! ६

**राजा**-सूता ! या हरिणानें आपल्याला बरेंच लांब आणिलें ! आणखी अजून सुद्धां

[ शा. वि. ]

मागें स्यंदन धावतो मुरडुनी त्याच्याकडे पाहतो
वारंवार कुरंग हा, किति तरी चित्तासि आकर्षितो !
बाणाचें बहु वाटतें भय तया, तेणें तनू आवरी,
पाठीमागील अंग घेउनि घुसे हा पूर्वभागांतरीं !

*याचें आनन, धावनश्रम घडे, तेणें विकासे अती,
त्यांतोनी कुश अर्धचर्वित पथामाजी गळों लागती.
याच्या उंचचि उंच पाहुनि उड्या वाटे मला अंतरीं
आकाशीं बहुतेक धावत असे, अत्यल्प भूमीवरी ! ७

( आश्चर्यानें ) अरे ! मी एकसारखा पाठलाग करीत असताही किती लांब निघून गेला हा ! नजर बारीक केली तरच हा दिसत आहे.

**सूत**–महाराज ! जमीन उंचसखल पडल्यामुळें घोड्याचे दोर आंखडून मीं रथाचा वेग थोडा मंद केला होता. त्यामुळेंच हा हरिण इतका लांब निघून गेला. आतां सपाट जमीन लागली आहे, तेव्हां त्याला गांठणें कठीण नाहीं.

**राजा**–तर मग दोर सैल सोड पाहूं.

**सूत**–जी सरकार. ( रथाला वेग दिल्यासारखें दाखवून ) महाराज !

[ गीति ]

× रश्मी होतांचि शिथिल हय धावति पुढति काढुनि छाती,
हाले न तुरा लवही, कर्ण स्थिर होउनी उभे दिसती;
धूलि स्वयें उधळिली त्यांना टाकूं शकेचि ना मागें,
जाणों न साहुनीया मृगजव हे धावताति अतिवेगें ! ८

**राजा**—आज यांनीं इंद्राच्या व सूर्याच्या घोड्यांनाहि मागें टाकलें म्हणावयाचें ! कारण,

---

* या श्लोकार्धाबद्दल–

यानें तोंड अतिश्रमें पसरलें, त्यांतोनियां खालती
अर्धे चर्वित दर्भ-घास गळुनी मार्गासि आच्छादिती.

× याच अर्थाचें दुसरें पद्य—

[ व. ति. ]

दोरे सढैल पडतां हय धांव घेती,
हाले तुरा नच, उभे स्थिर कर्ण होती.
धूळि स्वयें उधळिलीहि शिवे न अंगा
कीं धांवती न सहुनीच कुरंगवेगा !

[व. ति.]

जें सूक्ष्म तें दिसतसे विपुल क्षणांत,
जें वाकडें सरळ तें गमतें पळांत;
विच्छिन्न वस्तु जुळल्या दिसताति साऱ्या,
कांहीं न दूरि, जवळीहि, जवें रथाच्या ! ९

सूता ! हा मारलाच पहा ! ( शरसंधान केलेसें दाखवितो )

पडद्यांत )

राजा ! हा आश्रमांतला हरिण आहे. याची हत्या करूं नको ! याची हत्या करूं नको !

**सूत**--( कान देऊन व पाहून ) महाराज ! आपल्या बाणाच्या वाटेंत त्या हरिणाच्या आड कोणी तपस्वी आलेले दिसतात !

**राजा**--( गडबडून ) तर मग घोडे आखडून धर झटकन् !

**सूत**—जी सरकार. ( रथ उभा करतो. नंतर कण्वशिष्य वैखानस, दुसऱ्या दोन शिष्यांसह, प्रवेश करतो. )

**वैखानस**--( हात वर करून ) राजा ! हा आश्रमांतला हरिण आहे. याची शिकार करणें योग्य नव्हे. मारूं नको ! बाबा याला मारूं नको !

[ साकी ]

* नको नको या मृदु मृगपृष्ठीं सोडुं नृपाळा ! बाण;
कुसुमराशिवरि अंगारासम, उचित न हें तुज जाण.

---

* याच अर्थाचीं पुढील दोन पद्यें—

[ मालिनी ]

न करिं न करिं ऐशा बाणपाता, नृपा जी !
मृदुल हरिणपृष्ठीं, अग्निसा पुष्पपुंजीं;
लघुबल हरिणांचा वा कुठें क्षुद्र जीव !
तव शर खर कोठें वज्रतुल्यप्रभाव ?

अथवा [ शा. वि. ]

हां हां ! सोडुं नको नको नृपवरा ! हा बाण तूं कोमल
सारंगावरि या, जसा ज्वलन कीं त्या पुष्पराशीवर.
कोठें हीं गतिहीन दीन हरणें, ज्यांची तनू कोमल !
कोठें बाण तुझे कठोर, बहु ज्यां वज्राप्रमाणें बल !

कुठें बिचाऱ्या मृगबाळांचें चंचळ जीवित, पाहीं,
कुठें तुझे शर तीक्ष्ण, जयांना वज्राचें बल राही ! १०

[ गीति ]

यास्तव घे काढुनि हा बाण तुझा, जाय कधिं न तो वाया,
तुमचीं शस्त्रें आर्तत्राणार्थ, न निरपराध माराया. ११

**राजा**—हा घेतलाच काढून ! ( तसें करतो )

**वैखानस**—पुरुवंशाचा प्रदीपच तूं ! तुला हें योग्य आहे

[ गीति ]

पुरुवंशीं जन्म जया त्या तुजला फार होय हें उचित
होवो एवंगुणयुत पुत्र तुला चक्रवर्तिपदखचित. १२

**दुसरे दोघे**—( हात वर करून ) खरोखरच, चक्रवर्ती पुत्रच होवो !

**राजा**—( प्रणाम करून ) तथास्तु[1] मुनिराज !

**वैखानस**—राजा, समिधा आणण्याकरितां आम्ही बाहेर पडलों आहों. हा पहा, मालिनी नदीच्या तीराला लागून कुलपति कण्वमुनींचा आश्रम दिसत आहे. अन्य कार्याला विलंब होत नसेल तर तेथें जाऊन पाहुणचार घ्यावा. दुसरें असें आहे, तेथें गेलास म्हणजे तूं—

( नरजन्मामधिं--या चालीवर )

तपोधनांच्या परम मनोहर तेथिल धर्मक्रिया
विघ्नें नचि येतां चालल्या,
तयां पाहुनी जाणशील, निज मौर्वीगुणमंडित
भुज कसा प्रजावनीं पंडित. १३

**राजा**—कुलपति आश्रमांत आहेत काय ?

**वैखानस**—आश्रमांत कोणी अतिथि आला तर त्याचा सत्कार करण्याचें काम, आपली दुहिता शकुंतला हिच्यावर सोंपवून, तिच्या अनिष्ट ग्रहांची शांति करण्याकरितां, इतक्यांतच ते सोमतीर्थावर गेले आहेत.

**राजा**—ठीक आहे. तिचीच गांठ घेतों. मा दर्शनाकरितां येऊन गेलों ही गोष्ट ती महर्षींना कळवील.

**वैखानस**—आम्ही येतों तर मग. ( बरोबरच्या शिष्यांसह निघून जातो. )

---

१ 'ब्राह्मणांच्या आशीर्वादाचा स्वीकार करितों'. असें पाठान्तर.

**राजा**—सूता ! चालूं दे घोडे. पवित्र आश्रमाचें दर्शन घेऊन आपणांस पावन करून घेऊं या.

**सूत**—जी सरकार. ( पुन्हां रथाला वेग दिल्यासारखें करतो )

**राजा**—( सभोंवतीं नजर टाकून ) सूता ! हा तपोवनांतला आश्रमाकडचा भाग आहे असें न सांगताही लक्षांत येत आहे !

**सूत**—तें कसें महाराज ?

**राजा**—काय ? तुझ्या नाहीं लक्षांत येत ? पहा, या प्रदेशांत

[ शा. वि. ]

ज्यांमध्यें वसतात पोपट, अशा खोप्यांतुनी खालतीं
वृक्षांच्या तळिं हीं गळोनि पडलीं नीवारधान्यें किती !
× गोटे हे दिसती कुठें, तुकतुकी ज्यांलागि तेलामुळें,
यांनीं तापस फोडितात गमतें तीं इंगुदीचीं फळें.
विश्वासा धरुनी सुखें मृगकुळें येथें कुठें हिंडती,
शब्दा सोशिति आपुल्या, न लवही भीती मनीं मानिती;
कोठें वल्कशिखांतुनी मुनिचिया धारा गळों लागती,
तेणें पुष्करिणीपथांत दिसती रेखा तयांच्या किती ! १४

[ मालिनी ]

पवनचपल वाहे वारि पाटांमधोनी,
सहजचि तरुमूलें टाकितीं तीं धुओनी.
तरुकिसलयकांती जातसे पालटोनी
गगनिं हवनधूमश्रेणि जातां चढोनी.

[ दिंडी ]

पहा सूता ! आपुल्या अग्रभागीं
इथें दर्भांकुर तोडियल्या जागीं,
रम्य उपवनिं या बालहरिणवृंद
भीति सोडुनि संचरे मंदमंद. १५

**सूत**—महाराज ! आपण म्हणतां तें सर्व आहे खरें तसेंच.

---

×" कोठें प्रस्तरखंड हे, " असें पाठान्तर.

राजा—( थोडें पुढें जाऊन ) तपोवनांत राहणाऱ्या मुनिजनाला उपद्रव होतां कामा नये. तर इथेंच रथ उभा कर, म्हणजे मीं खालीं उतरतों.

सूत—सरकार ! लगाम ओढून धरले आहेत. महाराजांनीं उतरावें खालीं.

राजा—( उतरून ) सूता ! तपोवनात नम्र वेषानें जावें असें सांगतात. तर मग हें सांभाळ. ( अलंकार व धनुष्य सारथ्यापाशीं देऊन ) सूता, मी आश्रमांतील तपस्वयांना भेटून येतों तोंपर्यंत घोडयांना, पाठीवर पाणी शिंपडून, थापटून थोपटून, ताजेतवाने कर.

सूत—जी सरकार ! ( निघून जातो. )

राजा—( इकडून तिकडे फिरून व पाहून ) हें पहा आश्रमाचें द्वार. आंत शिरावेंच तर मग. ( आंत जाऊन व शकुन झाल्यासारखें दाखवून )

[ प्रहर्षिणी ]

*आहे आश्रमपद हें नितांत शांत,
मद्बाहु स्फुरण करी तथापि, त्यांत
कैचें तत्फल ? अथवा कशास त्याचें ?
होणें तें खचित कुठेंहि व्हावयाचें. १६

( पडद्यांत )

( इकडे, इकडे या सख्यानों ! इकडे, इकडे या सख्यानों ! )

राजा—(कान देऊन) अरे ! या वृक्षवाटिकेच्या उजव्या बाजूला कोणीं तरी बोलल्यासारखें ऐकूं येत आहे. तर तिकडेसच जावें. ( इकडे तिकडे फिरून व पाहून ) अरे ! या तपस्व्यांच्या मुली आपापल्या बेताच्या कळशा हातांत घेऊन लहान लहान झाडांना पाणी घालण्याकरितां इकडेसच येत आहेत! ( निरखून पाहून ) अहाहा ! या किती तरी गोड दिसतात पहा !

---

* याच अर्थाचीं पद्यें—

[ अंजनीगीत ]

आश्रमपद हें शांत असे जरि, बाहु स्फुरतो मम दक्षिण तरि,
काय लाभ त्या होय खरोखरि, न कळे मजलागीं.
अथवा पुढतीं जें होणार, तें केव्हांही नच टळणार,
खचितचि कोठें तरि घडणार, यांत नसे शंका.

[ गीति ]

अंतःपुरींहि दुर्लभ दाविर्यले रूप वन्य वनितांनीं,
बागेंतिल वेलींना लाज.विलें आज रानवेलींनीं ! १७

बरें तर; आपण या सावलीच्या आसऱ्यास जाऊन पहात उभें राहावें. ( बघत उभा राहतो )

( नंतर पूर्वोक्त कार्यांत गुंतलेली शकुंतला दोन सख्यांसह प्रवेश करते. )

**शकुंतला**—सख्यानों ! इकडे, इकडे या अशा !

**अनसूया**—गडे शकुंतले, हे आश्रमांतले बालतरू काश्यपबाबांना तुझ्या पेक्षां अधिक प्रिय आहेत असें वाटतें. कारण, तूं मोगरीच्या फुलासारखी नाजूक असूनसुद्धां, त्यांना पाणी घालण्याचें काम त्यांनीं तुला सांगितलें आहे !

**शकुंतला**—हें काम बाबांच्या सांगण्यावरूनच मीं करतें आहें असें नाहीं. तर या झाडांवर माझें सख्ख्या भांवडाप्रमाणें प्रेमही आहे. ( झाडांना पाणी घालते असें दाखविते. )

**दुष्यंत**—काय ! ही का ती कण्वमुनींची कन्या ! मुनि थोर खरेच; पण त्यांना तारतम्य सुमाराचेंच आहेसें दिसतें ! एरव्हीं आश्रमांतले असें कष्टाचें काम त्यांनीं हिला सांगितलें नसतें.

[ साकी ]

निसर्गसुंदर तनु ही कोठें ! तप खडतर तें कोठें ?
त्या कामीं घटवावी हिजला असें जयाला वाटे,
शिव शिव ! मुनिवर तो निःसंशय हृदयशून्य गमताहे,
नीलकमलदलधारेनें तो शर्मीसि तोडूं पाहे ! १८

असो. झाडाच्या आड उभें राहूनच हिची मौज पहावी, म्हणजे मोकळ्या मनानें ही कसें बोलते चालते तें पहावयाला मिळेल. ( तसा उभा राहून पाहतो. )

**शकुंतला**—गडे अनसूये ! प्रियंवदेनें माझें हें वल्कल इतकें घट्ट बांधिलें आहे कीं, मला बाई अगदीं जखडल्यासारखें होऊन गेलें आहे ! हें थोडें सैल कर पाहूं.

**अनसूया**—करितें हो. ( असें म्हणून तसें करते. )

**प्रियंवदा**—( हंसून ) शकुंतले, मला ग बाई कां दोष देतेस याचा ? आपल्या अंगांत मुसमुसणाऱ्या तारुण्याला बोल लाव कीं !

**दुष्यंत**--बरोबर बोलली ही.

[ दिंडी ]

ग्रंथि बारिक बांधिल्या स्कंधिं ज्याला,
जयें वक्षोजप्रांत झांकियेला.
वपु न शोभे नव अशा वल्कलानें,
कुसुम वेष्टियलें जेवि पक्व पर्णे. . १९

अथवा असें नव्हे. हिच्या अंगावर वल्कल अगदीं शोभत नाहीं हें तर खरेंच. तरी पण तें अलंकारांनीं येणारी शोभा देत नाहीं असें नाहीं. कारण,

[ दिंडी ]

* शेवलेंही वेढिलें कमल कांत,
अंकलांछितही रम्य रजनिकांत;
वल्कलेंही, रमणीय देहि बाला,
काय साजेना प्रकृतिसुंदराला ? २०

**शकुंतला**—( समोर पाहून ) या बकुलवृक्षाचे पल्लव वाऱ्यानें हालत आहेत. मला वाटतें तो आपल्या अंगुलींनीं मला त्वरेनें येण्याची सूचना देत आहे ! तेव्हां अगोदर त्याच्याकडे जातें. ( तिकडे जाते )

**प्रियंवदा**-गडे शकुंतल ! क्षणभर तिथेंच उभी राहा पाहूं.

**शकुंतला**-कशाला ग ?

**प्रियंवदा**- अग तूं या बकुळाजवळ उभी राहिलीस किनई म्हणजे हा वेलीची जोड मिळाल्यासारखा दिसतो !

**शकुंतला**-तुला प्रियंवदा म्हणतात तें अगदीं बरोबर बाई !

---

* या अर्थाचा दुसरा श्लोक—

[ शा. वि. ]

शैवालें परिवेष्टिलें कमलही सौंदर्यशाली असे,
आहे इंदु जरी कलंकित तरी लक्ष्मी तदंगीं वसे;
तन्वंगी रमणीय हेहि दिसते, नेसे जरी वल्कल,
साजे काय न आकृतीस, असती ज्या जातिनें सुंदर ?

**राजा**–प्रियंवदा शकुंतलेला प्रिय बोलली एवढेंच नाहीं तर खरेंही बोलली. कारण, हें

[ व. ति. ]

अधरिं पल्लवरंग पहा धरी,
भुज हिचे मृदु त्या विटपांपरी;
कुसुमकाम्य असें नव यौवन
मुसमुसे सकलावयवांतुन. २१

**अनसूया**—गडे शकुंतले ! ही पहा मोगरीची वेल. तूं हिचें नांव वनज्योत्स्ना असें ठेवलें आहेस. हिनें आपण स्वतां आम्रवृक्षाला वरलें आहे. हिला विसरलीस वाटतें ?

**शकुंतला**—वा: ! मग मी स्वतांलाच विसरलें म्हणावयाची ! ( लतेजवळ जाऊन व तिच्याकडे पाहून ) गडे, या आंब्याची आणि या वेलीची या रमणीय कालामध्यें काय नामी जोडी जमली आहे ! कशी ह्मणशील तर पहा, नवकुसुम-तारुण्याचा भर वनज्योत्स्नेवर दिसत आहे; व कोमल पालवी फुटल्यामुळें हा आम्रवृक्षही उपभोगाला समर्थ झाला आहे ! ( पहात उभी राहते )

**प्रियंवदा**—अग अनसूये ! शकुंतला वनज्योत्स्नेकडे इतका वेळ सारखी पाहात आहे याचें कारण आलें का तुझ्या लक्ष्यांत ?

**अनसूया**—नाहीं बाई ! तूंच सांग पाहूं काय तें.

**प्रियंवदा**—‘ जशी वनज्योत्स्नेची योग्य वृक्षाशीं गांठ पडली तशी योग्य पतीशीं आपली गांठ पडेल काय ? ’ हें मनांत येऊन; दुसरें काय ?

**शकुंतला**--खरोखर तुझ्याच मनांतला हा विचार दिसतो आहे ! ( असें म्हणून कळशी रिकामी करते )

**राजा**- बरें पण, कुलपतीला ही कन्या अन्य वर्णाच्या स्त्रीपासून झाली असेल काय ? किंवा शंका नकोच.

[ साकी ]

आर्य आमुचें मन ज्याअर्थी मुनिकन्येवरि गेलें,
त्याअर्थी ही योग्य वराया क्षत्रिय, निश्चित झालें.
होतां संशय उपस्थित कधीं एकाद्या विषयांत
सुमनाच्याचि प्रवृत्ति समजति थोर प्रमाणभूत. २२

तरी पण शोध करून पाहूं या खरा प्रकार काय आहे तो.

**शाकुंतला**—( गडबडीनें ) अग्ग बाई ! पाण्याचे शितोडे अंगावर पडल्यामुळें बिचकून एकदम नवमालिकेवरून उडून माझ्या तोंडावर हा भुंगा येत आहे ! ( भ्रमरपीडा दाखविते. )

**राजा**—( असूयेनें भ्रमरास )

( शा. वि. )

दृष्टी कंपित चंचला बहु हिची कित्येकदा स्पर्शसी,
कर्णासंनिध मंजु गुंजसि जणों स्वीया गुंजा सांगसी !
हातांनीं झिडकारि ती परि पिशी शृंगारसाराधरा.
आम्ही शोधित सत्य पूर्ण फसलों ! तूं धन्य भृंगा खरा ! २३

**शाकुंतला**—नाहीं हा द्वाड थांबत ! दुसरीकडे जातें तर मग. ( फिरून ) काय ! इकडेही हा आलाच मेला ! सख्यानों ! सोडवा हो मला या धटिंगणाच्या हातून ! कोण उपद्रव दिला आहे यानें !

**दोघी**—( हंसून ) आम्ही ग कोण सोडवणार तुला ? त्या दुष्यंताला हाक मार. तपोवनाचें रक्षण राजाकडे असतें असें म्हणतात.

**राजा**—ही मला पुढें जावयाला चांगली संधि आहे. 'हां ! भिऊं नका ! भिऊं नका !' ( इतकें अर्धे बोलूनच आपणाशीं ) पण मी राजा आहें ही गोष्ट यांना कळेल ना ? तर मग असें सांगावें.

**शाकुंतला**—( थोडी दूर उभी राहून व पाहून ) काय ? इकडेही मेला हा माझा पिच्छा पुरवीत आहे !

**राजा**—( झटकन् पुढें जाऊन )

[ गीति ]

दुर्वृत्तांचा शास्ता पुरुवंशज पाळितां वसुमतीशी,
कवण धटिंगण चेष्टा करितो भोळ्या तपस्विकन्यांशीं ? २४

( सगळ्याजणी राजाला पाहून थोड्या गोंधळल्यासारख्या होतात. )

**अनसूया**—आर्या ! कांहीं मोठेसें संकट नाहीं. या आमच्या सखीला भुंग्यानें बेजार केलें आहे; त्यामुळें ही भ्याली. दुसरें कांहीं नाहीं. ( असें म्हणून शकुंतलेकडे बोट दाखविते ).

**राजा**–(शकुंतलेसमोर उभा राहून ) काय ! तप ठीक चाललें आहे ना ?

( शकुंतला भीतीमुळें कांहीं उत्तर न देतां तशीच उभी राहते. )

**अनसूया**–आपल्यासारख्या थोर पाहुण्याचे पाय आतां आश्रमाला लागले असतां कां नाहीं चालणार ? गडे शकुंतले ! पर्णकुटिकेंतून फळें आणि दुसरें अतिथिसत्काराचें साहित्य घेऊन ये तर. हें पाणी होईल पाय धुवायला.

**राजा**—आपल्या गोड शब्दांनींच माझें आतिथ्य झालें आहे.

**प्रियंवदा**–असें म्हणतां ? तर मग दाट सावलीमुळें थंड अशा या सातवणी-च्या पारावर क्षणभर बसून आपण विश्रांति घ्यावी म्हणत्यें.

**राजा**—खरोखर तुम्ही देखील या कामानें थकल्या आहां.

**अनसूया**— अग शकुंतले, अतिथीची सर्व व्यवस्था पाहणें आपलें काम आहे. ये, इथें बसूं आपण. ( सगळे बसतात ).

**शकुंतला**—( स्वतांशीं ) खरोखर यांना पाहून तपोवनांत येऊं नयेत असले विकार माझ्या मनांत कां बरें यऊं लागले आहेत ?

**राजा**—( सगळ्याजणींकडे न्याहाळून पाहून ) तुम्ही सगळ्या वयानें व रूपानें सारख्या असल्यामुळें तुमची प्रेमपूर्ण मैत्री किती गोड दिसत आहे !

**प्रियंवदा**–( एकीकडे अनसूयेस ) गडे अनसूये ! दिसण्यांत चतुर आणि गंभीर, तसाच मधुर व प्रिय बोलणारा, एकाद्या प्रभावशाली पुरुषासारखा, हा कोण बरें असावा ?

**अनसूया**–सखे, मलाही तें जाणण्याची इच्छा आहे. विचारतेंच तर मग यांना. ( उघड ) महाराज, आपल्या गोड भाषणानें मनाला धीर वाटतो; आणि म्हणूनच मी आपणाला विचारतें कीं, आपण कोणत्या राजर्षींचा वंश अलंकृत केला आहे, तसेंच कोणत्या देशाला विरहामुळें आपण दुःखांत टाकलें आहे, आणि या कोमल देहाला तपोवनांत येण्याची तसदी आपण कोणत्या हेतूनें दिली आहे ?

**शकुंतला**–( स्वगत ) मना ! उतावळें होऊं नकोस. ही अनसूया तुला हवें तेंच विचारते आहे.

**राजा**–( स्वतांशीं ) आतां नांव सांगावें तरी कसें व लपवावें तरी कसें ? असो. तर मग हिला असें सांगावें. ( उघड ) पौरव राजानें मला धर्मखात्यावर

मुख्य अधिकारी नेमलें आहे. म्हणून मी धर्मकार्यें निर्विघ्नपणें चाललीं आहेत किंवा कसें हें पाहण्याकरितां या तपोवनांत आलों आहें.

**अनसूया**—धर्मानें चालणारांना आतां वालीच मिळाला म्हणायचा !

( शकुंतला शृंगारलज्जा दर्शविते. )

**सख्या**–( उभयतांच्या मुद्रेवरून त्यांचें इंगित जाणून शकुंतलेस एकीकडे ) गडे शकुंतले ! आज कश्यपबाबा आश्रमांत असते किनई तर–

**शकुंतला**—तर काय केलें असतें त्यांनीं ?

**सख्या**—त्यांनीं आपल्याला जीव कीं प्राण असलेली वस्तु देऊन त्याला धन्य केलें असतें; दुसरें काय ?

**शकुंतला**—इश्श मेलें ! जा कशा येथून तुम्ही ! कांहीं तरी मनांत आणून बडबडतां आहां निव्वळ ! तुमचें बोलणें मी मुळींच ऐकत नाहीं जा !

**राजा**—तुमच्या सखीविषयीं आम्हीही आतां थोडें विचारूं का ?

**सख्या**—आर्या ! हा कुतूहलपूर्वक केलेला प्रश्न आम्ही अनुग्रहच समजतों.

**राजा**--भगवान् काश्यप मुनि आजन्म कडकडीत ब्रह्मचारी आहेत हें चहूंकडे प्रसिद्ध आहे; आणि तुमची ही सखी तर त्यांची मुलगी; हें कसें काय ?

**अनसूया**--ऐकावें महाराज. कौशिक या कुलनांवानें प्रसिद्ध असा महाप्रतापी राजर्षि आहे.

**राजा**--होय; ऐकून ठाऊक आहे.

**अनसूया**—तो आमच्या प्रियसखीचा जन्मदाता, समजलें ? त्यानें हिला टाकून दिल्यावर काश्यपबाबांनीं हिला लहानाची मोठी केली. म्हणून ते हिला पित्याचे ठिकाणीं आहेत.

**राजा**--' टाकून दिल्यावर ' या शब्दांनीं, हें आहे तरी काय ? हें जाणण्याची अधिकच इच्छा उत्पन्न झाली. म्हणून पहिल्यापासूनच हकीकत ऐकावी म्हणतों.

**अनसूया**–बरें आहे. ऐकावें आपण. असें म्हणतात कीं, मागें एके काळीं गोदावरीनदीच्या तीरावर तो राजर्षि घोर तपश्चर्या करीत असतां देवांना मोठी धास्ती पडली; म्हणून त्यांनीं त्याच्या तपाला विघ्न करणारी मेनका नांवाची अप्सरा त्याच्याकडे पाठवून दिली.

**राजा**–दुसऱ्यांच्या तपाची देवांना अशी भीति वाटत असते खरी.

**अनसूया**--पुढें वसंताच्या पहिल्या भरांत वेड लावून सोडणारें तिचें रूप पाहून--( एवढें अर्धेंच बोलून लज्जेने थांबते. )

**राजा**--पुढचें आलें लक्ष्यांत ! एकून अप्सरेपासूनच उत्पत्ति हिची ?

**अनसूया**--होय.

**राजा**--बरोबर आहे.

[ गीति ]

नोहे तरि, मनुजस्त्री ऐसें प्रसवेल रूप कोठोनी ?
दिव्य ज्योति न वरती येइ कधींही महीतलामधुनी. २५

( शकुंतला खाली मान घालून उभी राहते )

**राजा**--( स्वगत ) आतां आशेला जागा झाली ! परंतु हिच्या सख्यांनीं वर-याचनेसंबंधानें हिची थट्टा केली, म्हणून माझें मन द्विधा होऊन कचरतें आहे.

**प्रियंवदा**--( स्मितपूर्वक शकुंतलेकडे पाहून व राजासमोर होऊन ) महा-राजांच्या मनांत आणखी कांहीं बोलायचें आहे असें वाटतें ?

( शकुंतला तिला बोटानें दाबते. )

**राजा**--अगदीं बरोबर ताडलें ! थोरांच्या गोष्टी ऐकण्याची आम्हांला फार आवड. म्हणूनच आणखीही थोडेंसें विचारावेंसें वाटतें.

**प्रियंवदा**--मग विचार कसला ? तपस्विजनाला विचारावयाला संकोच बाळ-गण्याचें कांहींच कारण नाहीं.

**राजा**--मला तुमच्या सखीविषयीं असें विचारावयाचें आहे,

[ गीति ]

×पाळायाचें लग्नापर्यंत व्रत हिनें असें काय ?
मदनव्यापार जयामाझारिं निरुद्ध होउनी जाय.

---

× या अर्थाचें दुसरें पद्य--

विवाह होई तंव काय हें व्रत
हिचें; न ज्यामाजि अनंगचेष्टित ?
इथेंचि वा राहिल या मृगीगणीं
निजाक्षितुल्यें प्रिय ही सदा गणी.

अथवा निजाक्षिसाम्यें परमप्रिय होति, त्या मृगींमाजी
शेवटपर्यंतचि ही तपोवनीं राहणार? सांगा जी ! २६

**प्रियंवदा**—महाराज धर्माचरणाच्या बाबतींत देखील ही स्वतांची मुखत्यार नाहीं. हिच्या वडिलांचा संकल्प तर असा आहे कीं, हिला योग्य वराला देऊन टाकावें.

**राजा**—( स्वगत ) आपला मनोरथ कांहीं दुःसाध्य नाहीं एवढें खरें.

[ गीति. ]

फिटली शंका हृदया ! आतां अभिलाष धरिं खुशाल बरें !
भ्यालेसि अग्नि समजुनि तें सुखदस्पर्श रत्न कीं ठरलें ! २७

**शकुंतला**—( रागावल्यासारखें करून ) अनसूये ! ही मी चालली होतें इथून कशी !

**अनसूया**—कां ग ?

**शकुंतला**—ही प्रियंवदा कसें भलभलतें बोलते आहे हें गौतमीआत्याला सांगायला.

**अनसूया**—थोर पाहुणा घरीं आला असतां त्याचा सत्कार न करतां मनाला मानेल तिकडे निघून जाणें हें गडे शोभत नाहीं तुझ्या सारखीला. ( शकुंतला उत्तर न देतां जायला निघालीच. )

**राजा**—( धरावयाला उत्सुक पण मनाला आवरून स्वगत ) कामिजनाची मनोवृत्ति व त्याची कृति यांत केवढें तरी साम्य असतें !

[ गीति ]

जावें मुनिकन्येच्या मागुनि म्हणुनी पुढें सरूं बघतों,
तों अवचित विनय पुढें येउनि कुंठित मदीय गति करितो.
स्वस्थाना सोडुनियां इकडे तिकडे न लेशही हललों,
तरि वाटे जाउनियां, जणों पुन्हां परत येथ मी आलों. २८

**प्रियंवदा**—( शकुंतलेला आडवून ) गडे ! निघून जाणें शोभत नाहीं तुला.

**शकुंतला**—( भुवई चढवून ) कां बरें ?

**प्रियंवदा**—तुझ्याकरतां झाडांना दोनदां मीं पाणी घातलें. चल ये. तें देणें अगोदर फेड. मग आपाची गोष्ट बोल, समजलीस ?

( असें म्हणून बळानें तिला परतविते. )

**राजा**—बाई ! झाडांला पाणी घालूनच ही थकलेली दिसते. कारण,

[ शा. वि. ]

पाण्याच्या कळशा करीं उचलितां बाहू बहू भागले,
हस्ताचे अति लाल होति तळवे, खांदे गळों लागले,
लागे फार हिला दम श्रमुनियां वृक्षांचिया सिचनीं,
तेणें कंप दिसे अजोनिहि हिच्या वक्षःस्थलालागुनी;
राही सुंदर आननावरि उभें घर्मांबुचें जालक,
कर्णीं ठेवियल्या शिरीषकुसुमा तें होय संरोधक;
वेणी जाहलिसे अशा गडबडीमध्यें हिची मोकळी,
स्कंधीं कुंतल लोळती, जरि तयां एक्या करें आवळी. २९

तर मग मी हिला ऋणांतून मुक्त करतों. ( असें म्हणून आंगठी देऊं पाहतों. दोघी तिच्यावरील नांव वाचून एकमेकींकडे पाहतात )

**राजा**—माझ्याविषयीं भलती शंका घेऊं नका. ही राजाची देणगी आहे, अर्थात् मी राजपुरुष आहें असें समजा.

**प्रियंवदा**—तर मग या आंगठीला आपल्या अंगुलीचा वियोग होणें उचित नव्हे. आपल्या शब्दांनींच ही ऋणमुक्त झाली आहे. (थोडें हंसून) गडे शकुंतले ! या थोर गृहस्थांनीं—महाराजांनीं म्हण हवें तर—दया येऊन तुला मोकळें केलें आहे हो ! आतां खुशाल जा !

**शकुंतला**—( स्वगत ) माझ्यावर माझी सत्ता असेल तर ना ! ( उघड ) जा किंवा जाऊं नकोस म्हणून मला तूं ग कोण सांगणार ?

**राजा**—( शकुंतलेकडे पाहून स्वगत ) माझें जसें हिच्यावर मन आहे तसेंच हिचेंही माझ्यावर असेल काय ? अथवा माझ्या आशेला जागा आहेच; कारण,

[ शा. वि. ]

मी बोलें तरि सुंदरी न मजला कांहींच दे उत्तर,
माझें भाषण चालतां हलुचि ती ऐके परी सादर.
दृष्टी देउनि पूर्ण ती मजकडे नाहीं उभी राहत,
माझ्यावांचुनि फारसें परि दुजें नाहींच कीं पाहत. ३०

( पडद्यांत )

अहो तपस्विजनांनो ! तपोवनांतील प्राण्यांच्या रक्षणाकरितां तपोवनाच्या जवळ असा. दुष्यंतराजा मृगया करीत करीत आश्रमासमीप आल्याची वार्ता आली आहे हो ! पहा !

[ साकी ]

×तुरगखुरांनीं धूळ उडविली संध्यारुणरंगाची,
पडे तरूवरि, यदुपरि वाळति वसनें आर्द्र मुनींचीं;
चमत्कार हा पाहुनि नयनीं वाटे किंचित मनाला,
आश्रमावरी अवचित आला जणुं टोळांचा घाला ! ३१

तसेंच,

[ साकी ]

*धर्मारण्यामध्यें आपुल्या प्रविष्ट वनगज झाला,
सार्वभौमनृप दुष्यंताचा रथ पाहोनि बुजाला !
समोर आल्या तरुलागोनी धावुनि धडकी मारी,
एक्या सुळक्यामध्यें त्याची गुंतुनि जाय डहाळी.
धांवत असतां अतिवेगानें ओढुनि नेइ लतांस,
त्यांची गुंतागुंत होऊनी पायां पडला फास !

---

×या अर्थाचें दुसरें पद्य–

[ शा. वि. ]

अश्वाचे खुर लागुनी उधळली दाही दिशाभ्यंतरीं,
अस्ताला रवि जाय त्या समयिंची आरक्त कांती धरी.
ऐसी धूलि जमे द्रुमीं; यदुपरी हीं वल्कलें वाळतीं.
वांटे येऊनि टोळधाड पडली कीं आश्रमीं संप्रति !

*या अर्थाचें दुसरें पद्य–

[ स्रग्धरा. ]

मारी वेगें तरूला भयकर धडकी, स्कंध तद्दंतिं गुंते,
सैरावैरा मृगांचे कळप भडकती पाहुनीयां तयांतें.
वेलींचा पाश पायीं अडकुनि पळतो, विघ्न साक्षात् तपाला,
धर्मारण्यांत आला वनगज, बुजला पाहुनी स्यंदनाला.

हरिणांच्या कळपांची तेणें दाणादाण उडाली,
जणों तपाच्या विघ्नाची ही साक्षात् मूर्ति उदेली !　　　३२

[ सगळ्याजणी कान देऊन कांहींशा घाबरतात. ]

**राजा**–( स्वगत ) काय पहा हें ! माझा शोध करीत असतां तपोवनाला उपसर्ग देणाऱ्या या सैनिकांना काय म्हणावें बरें ? असो. परत जावें तर आतां.

**सख्या**–महाराज, ही वनगज उधळल्याची बातमी ऐकून आमच्या जीवाला थोडी काळजीच वाटूं लागली आहे. तेव्हां उटजाकडे आम्हांला जाऊं द्यावें म्हणतों.

**राजा**—( लगबगीनें ) चला आपण. आम्हीही तपोवनाला पीडा न होईल अशी तजवीज करतों.

( सगळे उठतात )

**सख्या**–महाराज, आपला सत्कार कांहींच झाला नाहीं, तेव्हां आपण पुन्हां येऊन दर्शन द्यावें अशी विनंती करावयाला थोडा संकोच वाटतो आम्हांला.

**राजा**—छे भलतेंच ! आपल्या सर्वांच्या दर्शनानेंच माझा सत्कार होऊन चुकला आहे.

**शकुंतला**—अगे अनसूये ! हा पहा माझ्या पायाला कोंवळ्या दर्भाचा अंकुर बोंचला आहे, आणि कोरांटीच्या फांदीला पदरही आडकला आहे. तो सोडवीपर्यंत थोडी थांब तरी माझ्यासाठीं ! ( अशी बतावणी करून रेंगाळत राजाकडे पहात पहात सख्यांसह जाऊं लागते. )

**राजा**—राजधानीला परत जाण्याविषयीं मला आतां फारशी उत्सुकता राहिली नाहीं. तर आतां बरोबर आलेल्या सैनिकांकडे जाऊन तपोवनाच्या जवळच तळ देवीवतों. शकुंतलेचा ध्यास मनांतून काढून टाकण्याला मी मुळींच समर्थ नाहीं.

[ **गीति** ]

जातो मम देह पुढें, मागें धावे परंतु खिन्न मन,
पवनासमोर नेतां ध्वज त्याचें जेविं चीन मृदु वसन.　　　३३

( सर्व निघून जातात. )

( पहिला अंक समाप्त. )

# अंक दुसरा

( नंतर खिन्न दिसणारा विदूषक प्रवेश करितो. )

**विदूषक**—( सुस्कारा टाकून ) फुटक्या नशीबा ! शिकारीचा शोक बाळगणाऱ्या या राजाच्या संगतीनें मी अगदीं जेरीस आलों बुवा ! या रानांतून त्या रानांत, भर दुपारच्या वेळीं देखील, उन्हाळ्याच्या कडाक्यानें झाडाखालीं सावलीसुद्धां मिळावयाची पंचाईत अशा स्थितींत, रानावनांतून, हा इकडे हरिण ! हा इकडे रानडुक्कर ! हा इकडे वाघ! अशा आरोळ्या ठोकीत, भटकावें लागतें ! अनेक प्रकारच्या झाडांच्या पाल्याचें मिश्रण आंत पडून तें कढून कडवट व तुरट झालेलें डोंगरांतल्या ओढयाचें पाणीं प्यावें लागतें ! वेळीं अवेळीं, लोखंडाच्या सळईवर भाजलेल्या मांसावरच बहुतेक गुजराण करावी लागते ! मित्राच्या घोडयामागून धांवतां धांवतां अंगाचे सांधे खिळखिळे झाले तरी, रात्रीं देखील पुरेशी झोंप मिळण्याची मारामार ! पुढें डोळा लागतो न लागतो तोंच मोठ्या पहांटेस बटकीचे फासेपारधी रान वेढण्याच्या गोंगाटानें मला जागें करितात ! पण एवढयानें तरी पीडा संपली आहे कोठें ? आतां तर गळवावर आणखी उठाणूं उठल्याची गत झाली आहे ! कारण काल आम्ही मागें पडलों, आणि महाराज हरिणाच्या पाठीस लागून तपोवनांत शिरले. तेथें माझ्या दुर्दैवानें शकुंतला नांवाच्या एका मुनिकन्येशीं त्यांची गांठ घालून दिली ! आतां नगराला परत जाण्याची गोष्ट स्वारीच्या मनांत देखील येत नाहीं ! आज तरी रात्रभर तिचे चिंतन करतां करतांच स्वारीला उजाडलें आहे ! याला उपाय काय ? स्नानादि विधि आटोपून बसलेल्या मित्रालाच आतां भेटावें हें बरें. ( इकडे तिकडे फिरून व पाहून ) रानफुलांच्या माळा धारण करणाऱ्या व हातांत धनुष्य घेतलेल्या यवनींचा परिवार असलेला हा माझा प्रियमित्र इकडेसच येत आहे. ठीक आहे. अंगाचा इळापिळा झाल्यासारखा मी आतां उभा राहतों. अशानें तरी विसांवा मिळाल्यास पहावें. ( काठीवर भार टाकून उभा राहतो. नंतर वर सांगितलेल्या लवाजम्यासह राजा प्रवेश करतो. )

[ गीति ]

**राजा**—नाहीं प्रिया सुलभ तरि, मन तद्भावा बघोनि धरि धीर;
न मनोरथ पूर्ण तरी, परस्परौत्सुक्य फार मोदकर. १

( गालांत हंसून ) ज्याच्यावर आपलें प्रेम आहे त्या माणसाची मनोवृत्ति आपल्या मनोवृत्तीप्रमाणेंच असली पाहिजे असें समजणाऱ्या माणसाची अशीच फजीती होते !

[ शा. वि. ]

पाही ती दुसरीकडे, तरि गमे, प्रेमें मला पाहते;
चाले मंद नितंब थोर म्हणुनी, वाटे विलासेंचि तें.
जाऊं देइ सखी न, तैं तिस वदे रागावुनी वांकडें;
+मानीं सर्व मदर्थ; लावि सगळें कामीं स्वतांच्याकडे ! २

**विदूषक**—( तसाच उभा राहून ) मित्रा ! माझे हातपाय आंखडून गेले आहेत बाबा ! ते सरळ होत नाहींत. म्हणून तोंडानेंच तुझा जयजयकार करितों.

**राजा**—माढव्या ! तुझ्या शरीराची अशी दशा कशानें झाली ?

**विदूषक**—आपणच डोळ्याला इजा करून पुन्हां विचारतोस डोळ्याला पाणी कशानें आलें म्हणून !

**राजा** –तुझें म्हणणें खरोखर माझ्या लक्षांत येत नाहीं बोवा !

**विदूषक**—मित्रा ! हें बघ, नदींतले वेत कुबड्यासारखे वांकतात ते आपल्या स्वतांच्या गुणानें, का नदीच्या प्रवाहाच्या वेगानें ?

**राजा**—त्याला कारण नदीचा वेगच.

**विदूषक**—तसेंच माझ्याही या अवस्थेचें कारण तूंच.

**राजा** - तें कसें ?

**विदूषक**—हे बघ, गृहस्था ! न्यायमनसुब्याचीं कामें करावयाचीं सोडून तूं या असल्या भयंकर जंगलांत वनचरासारखें भटकत राहतोस याला म्हणावें तरी काय ? मला खरें पुसशील तर, रोजच्या रोज उठून सावजांच्या पाठीमागें धांवतां धांवतां माझ्या हातापायांचा सांधा न् सांधा खिळखिळा होऊन गेला

---

+ याला ' मी ' हा कर्ता आणि ( हें ) ' सर्व ' कर्म.

आहे. त्यामुळें माझे हातपाय माझ्या स्वाधीन राहिले नाहींत बुवा ! म्हणून एक दिवस तरी विसांवा देण्याकरितां माझी सुटका कर, एवढी तुला हात जोडून विनंति आहे मित्रा !

**राजा**—( स्वगत ) हाही असें म्हणतो; आणि माझें मनही कश्यपकन्येचा ध्यास लागल्यामुळें मृगयेवरून उडालें आहे. कारण,

[ व. ति. ]

मित्रा ! धनुष्य मम सज्य करांत राहे;
ओढावया मृगिं परंतु न हात वाहे.
यांनीं वनीं बसुनियां जवळीं, प्रियेला
वाटे जणों पढविली स्वकटाक्षलीला ! ३

**विदूषक**—( राजाच्या तोंडाकडे पाहून ) काय ? मनामध्यें कांहीं तरी आणून पुटपुटतो आहेस वाटतें ? मग माझें सगळें बोलणें अरण्यरुदितच झालें म्हणावयाचें !

**राजा**—( किंचित् हसून ) दुसरा विचार तो कसला ? मित्राचा शब्द मोडतां येत नाहीं म्हणून गप्प बसलों !

**विदूषक**—मित्रा ! दीर्घायु हो बाबा ! ( असें म्हणून जाऊं पहातो )

**राजा**—गड्या थोडा थांब. माझें भाषण संपलें नाहीं अजून !

**विदूषक**—बोल मित्रा !

**राजा**—विसांवा घेऊन ताजातवाना झालास म्हणजे एका बिनदगदगीच्या कामांत तुझी मदत हवी आहे मला.

**विदूषक**—लाडू झोडावयाच्या कामांत कीं काय ? तर मग हें आतांच आमंत्रण पतकरलें समज !

**राजा**—कोणत्या कामांत तें सांगतों. अरे, कोण आहे रे तिकडे ?

**दौवारिक**—( पुढें येऊन व वंदन करून ) आज्ञा व्हावी महाराज !

**राजा**—रैवतका ! सेनापतीसाहेबांना बोलाव पाहूं.

**दौवारिक**—आज्ञा सरकार. ( जातो आणि सेनापतीसह प्रवेश करून त्याला म्हणतो ). हे पहा आमचे महाराज आज्ञा करण्याच्या उत्कंठेनें इकडेसच दृष्टी लावून बसले आहेत ! पुढें व्हावें आपण.

**सेनापति**--( स्वगत ) मृगयेला लोक दोष देतात खरे. पण आमच्या महाराजांच्या तो पथ्यावरच पडलेली दिसते ! कशी ती पहा;

[ शिखरिणी ]

*' धनुर्ज्या'-संघर्षे सतत पुढचा भाग कठिण,
न घर्माचा देहीं लवहि, सहतो सूर्यकिरण;
तनु व्यायामानें दृढ, कृशपणा अल्प न दिसे,
'बलोत्कर्षी राजा गिरिवरकरीसा धरितसे ! ४

( जवळ जाऊन ) महाराजांचा विजय असो ! मृगयेकरितां रान वेढिलें आहे. मग ती सोडून सरकारस्वारीचा इकडे कशासाठीं मुक्काम ?

**राजा**--शिकारीला नांवें ठेवून या माढव्यानें माझा उत्साह कमी केला आहे.

**सेनापति**--( एकीकडे माढव्यास ) मित्रा ! मृगयेची निंदाच करीत रहा. मी मात्र अंमळसा महाराजांच्या मर्जीप्रमाणें बोलतों. ( उघड ) हा मूर्ख वाटेल तितकी बडबड करीना ? मृगयेच्या गुणांचें प्रत्यक्ष महाराजच स्पष्ट उदाहरण आहेत.

[ शा. वि. ]

[1]जाई मेद, तयें कृशत्व उदरा, चापल्य देहासि ये,
प्राण्यांचेहि मनोविकार कळती, संक्षुब्ध कोपें भयें.
वीरांना चललक्ष्यभेद करितां वाटे प्रतिष्ठा अशी
मिथ्या निंदि शिकारिला जन, अशी क्रीडा दुजी कोणती ? ५

**विदूषक**--( सेनापतीस ) चल निघ ! मोठा आला अवसान भरायला शिकारीचें ! महाराज आतां पूर्ववृत्तीवर आले आहेत बरें का ? तूं वाटेल तर जा रानोरान भटकत, आणि पड माणसाच्या नाकाला चटावलेल्या एखाद्या बुड्ढ्या आस्वलाच्या तोंडांत !

**राजा**--सेनापतिसाहेब ! आम्ही आश्रमाच्या अगदीं जवळ उतरलों आहों. म्हणून तुमचें ह्मणणें मान्य करवत नाहीं.

[ गीति ]

डुंबोत [2]सरःसलिलीं, शृंगीं ताडित पुनः पुन्हां, महिष,
रोमंथ करो मृगकुल जमुनी एकत्र वृक्षसावलिस.

---

* राजपक्षीं धनुष्याची दोरी. हस्तिपक्षीं प्रियालद्रुमभूमि. १ ' भंगे ' असा पाठ. २ ' निपानजलीं ' असा पाठ.

मुस्तां वराहनायक उकरोत स्वस्थ पल्वलामाजी,
हें आमुचें धनुष्यहि घेवो विश्रांति, शिथिलगुण आजी. * ६

**सेनापति**—महाराजांची आज्ञा प्रमाण.

**राजा**—तर मग, रान वेढायला जे पुढें गेले असतील त्यांना परत बोलवा; आणि सैनिकांना बजावून सांगा कीं, तपोवनाला तुमच्यापासून कोणत्याही प्रकारें उपद्रव होतां कामा नये. पहा,

[ व. ति. ]

आहे तपस्विजन शांतिगुणप्रधान,
त्याच्यांत राहि, परि, दाहक तेज जाण.
आहे सुशीतलपणा जरि सूर्यकांतां
तेजा परी प्रकटिती परतप्त होतां. ७

**सेनापति**—जशी सरकारची आज्ञा.

**विदूषक**—( सेनापतीस ) का ! शिकारीच्या अवसानाची तुझी मसलत कशी दिली धुडकावून ?

( सेनापति जातो. )

**राजा**—( सेवकजनाकडे पाहून ) तुमचा शिकारीचा वेष उतरून ठेवा आतां. रैवतका ! तूंही आपल्या कामाला लाग.

**सेवक**—आज्ञा महाराज. ( निघून जातात )

**विदूषक**—मित्रा ! येथें तूं चिट्पाखरूं सुद्धां राहूं दिलें नाहींस ! [आतां झाडांच्या सावलींत, लतांच्या चांदव्याखालीं, या दगडाच्या चौथऱ्यावर बैस; म्हणजे मीही अंमळसा आरामशीर पडेन.

**राजा**—बरें आहे; हो पुढें.

---

* या पद्याबद्दल पुढील पाठ:—

आज तर,

[ स्रग्धरा ]

शृंगांनीं ताडिलेल्या जलिं, महिषतती स्वेच्छ डुंबो तडागीं,
बैसोनीयां रवंथा मृगकुलहि करो पादपच्छायभागीं;
मुस्तांलागी वराहव्रज उकरु, करो पल्वलामाजि चूर्ण
दुष्यंताचें तसें हें शिथिलगुण धनू घेउं विश्रांति पूर्ण !

**विदूषक**-यावें महाराज ! ( दोघेही थोडें फिरून खालीं बसतात )

**राजा**-माढव्या ! तुझ्या डोळ्यांचें साफल्य झालें नाहीं अजून ! कारण, एक पाहण्यासारखी उत्तम वस्तु अद्यापि कुठें दृष्टीस पडली आहे तुझ्या !

**विदूषक**--अरे ! प्रत्यक्ष तूं तर माझ्या पुढें आहेस ना ?

**राजा**--कोणालाही आपलें माणूस सुंदरच दिसतें. पण, मी या आश्रमाचा अलंकार असणाऱ्या शकुंतलेला उद्देशून बोलत आहें.

**विदूषक**--( स्वगत ) हा विषय वाढविण्याची याला सवड देऊं नये. (उघड) कायरे मित्रा ! एकूण तापसकन्येवर तुझें लक्ष्य गेलेलें दिसतें आहे ! खाशी गोष्ट !

**राजा**--मित्रा ! पुरुवंशांतील राजांचें मन भलत्या वस्तूवर जात नाहीं, समजलास ?

[ गीति. ]

जन वदती कीं आहे त्या सुंदरिची सुरांगना जननी,
मातृत्यक्ता लाभलि मुनिला, तदपत्य समजती म्हणुनी.
देठापासूनि सुटुनी पडलें जणुं अर्कतरूवरी सुमन
नवमालिकालतेचें, ऐशी करि कल्पना मदीय मन. ८

**विदूषक**--( हंसून ) खजूराची मिठी बसल्यामुळें एखाद्याला जशी चिंच हवीशी वाटावी, तशी, राणीमहालांतील उत्तम स्त्रियांचा वीट आल्यामुळें, तुला तपस्व्याची मुलगी हवीशी वाटूं लागली, असें दिसतें.

**राजा**--अरे, तिला पाहिलीच नाहींस म्हणून तूं असें म्हणतोस.

**विदूषक**--जें पाहून तुला देखील मोहनी पडली तें माणूस खरोखरी तसेंच मोहक असलें पाहिजे.

**राजा**--मित्रा ! फार काय सांगूं ?

[ शा. वि. ]

आधीं काढुनि चित्र, जीव मग त्यामध्यें विधाता भरी,
किंवा रूपसमुच्चयेंचि [illegible] ती मानसें निर्मिली.
चिंतोनी विधिचें प्रभुत्व, तनुही त्या सुंदरीची मनीं
वाटे ती सगळी अपूर्व दुसरी स्त्रीरत्नसृष्टी जनीं. ९

**विदूषक**--असें असेल तर मग तिनें जगांतील सर्व रूपवती स्त्रियांना लाजविलेंच म्हणावयाचें !

**राजा**--माझ्या मनाला तर असें वाटतें. तें रूप म्हणजे

[ साकी ]

* न हुंगिलेलें कुसुम, मधु नवें चाखियलें जें नाहीं,
न विंधिलेलें मौक्तिक, पल्लव ज्या खुडिलें न नखांहीं;
सत्कृत्यांचें अखंड फळ जणुं उणें न कोठें कांहीं,
कवण नेमिला भोक्ता विधिनें त्यासी, समजत नाहीं ! १०

**विदूषक**--तर मग तिला झटकन् हस्तगत कर कशी ! नाहीं तर इंगुदींच्या तेलानें डोकें चिक्कण झालेल्या एखाद्या जटाळ्याच्या पदरांत ती पडायची !

**राजा**--ती तर अगदींच पराधीन. त्यांतून कोणी वडील माणूसही जवळ नाहीं.

**विदूषक**--बरें पण मित्रा ! तिच्या पाहुण्यासवरण्यावरून तिचा तुझ्या संबंधाचा रागरंग कसा काय आहे ?

**राजा**--अरे ! तपस्व्याच्या मुली म्हणजे स्वभावतांच लाजाळू. तरी पण मला

[ द्रु. वि. ]

१ बघुनि संमुख दृष्टिस आवरी, करुनि अन्य मिषा हसिता वरी.
विनयशील म्हणोनि तिनें मला, स्मर न दावियला, नच झांकिला. ११

---

* या अर्थाचीं पुढील पद्यें--

[ वंशस्थ ]

न हुंगिलें पुष्प, न चाखिलें नव, मधु, नखांनीं खुडिला न पल्लव;
सुरम्य मुक्ताफळ जें न विंधिलें, अखंड ज्याचें फल पुण्य तें भलें;
जयामधें दोष न पाप वा वसे, असें महामोहन रूप तें असे.
कळे न माझ्या मतिला खरोखर, तयास भोक्ता विधि कोण निर्मिल !

१ या अर्थाचें पुढील पद्य--

[ शा. वि. ]

राहीं संमुख मी उभा, परतवी दृष्टी तरी सुंदरी,
माझें भाषण चालतां श्रवण ते अत्यादरानें करी;
आहे ती विनयान्विता म्हणुनिया वाहेचि लज्जाभर
नाहीं झाकियला न वा प्रकटिला त्या बालिकेनें स्मर.

**विदूषक**--तर मग काय तिनें तुला पाहिल्या बरोबर तुझ्या अंकावर बसायाला हवें होतें वाटतें ?

**राजा**--तसेंच, आम्हीं परस्परांचा निरोप घेतला तेव्हां माझ्याविषयींचा भाव तिनें मर्यादशीलपणानें, पण अगदीं स्पष्ट रीतीनें, दर्शविला. कारण,

[ शा. वि. ]

' हा दर्भांकुर, बाइ ! पायिं रुतला; काढा ययालागुनी. '
ऐसें बोलुनि सुंदरी थबकली कांहीं पदें जाउनी.
वृक्षा वल्कल गुंतलें नसुनिही, तें सोडवाया बळें
मागें तोंड करोनियां मुरडुनी माझ्याकडे पाहिलें ! १२.

**विदूषक**--तर मित्रा ! आतां शिधोरी बांधायला लाग; पहातोस काय ? मला वाटतें तूं तपोवनाचें उपवन बनविलेंस बाबा !

**राजा**—मित्रा ! कांहीं तपस्व्यांनीं मला ओळखलें आहे. तेव्हां कोणत्या निमित्तानें बरें मीं पुन्हां आश्रमांत जावें ? कांहीं युक्ति सुचते का बघ.

**विदूषक**—अरे, दुसरें तिसरें निमित्त हवें कशाला तुम्हां राजेलोकांना ? नीवारधान्याचा सहाव्वा हिस्सा आमचा कर म्हणून द्या, एवढें म्हटलें म्हणजे संपलें !

**राजा**—तुझ्या अकलेची धन्य आहे ! अरे ! रत्नांच्या राशींनांही लाजविणारा असा दुसराच करभार हे तपस्वी देत असतात ! पहा,

( गीति. )

तें न टिके, जें मिळतें वर्णांपासोनि भूमिपाळाला,
मुनिजन देति तपाचा षष्ठांश, क्षय न ठाउका त्याला. १३.

( पडद्यांत )

अहाहा ! आम्ही कृतार्थ झालों !

**राजा**—( कान देऊन ) अरे ! गंभीर आणि शांत स्वराचे कोणी तपस्वी असावे असें वाटतें. ( प्रवेश करून )

**दौवारिक**—महाराजांचा विजय असो ! दोन ऋषिकुमार द्वारावर आले आहेत महाराज !

**राजा**—तर मग त्यांना विलंब न करतां इकडे प्रविष्ट कर.

**दौवारिक**—हा आलोंच घेऊन त्यांना. ( निघून जातो व ऋषिकुमारांसह प्रवेश करून त्यांस ) असें इकडून यावयाचें. ( दोघे राजाकडे निरखून पाहतात )

**पहिला**—या राजाचा देह किती तरी तेजस्वी आहे ! तरी पण त्याच्याकडे पाहून मनाला भय न वाटतां उलटा विश्वासच वाटतो. अथवा या राजाच्या ठिकाणीं हें योग्यच आहे. याच्यांत व ऋषींत *म्हणण्यासारखा भेद आहे कोठें ? कारण;

[ गीति ]

सर्वोपभोग्य आश्रम त्यामाजी हा नृपाल राहतसे;
पाळोनियां प्रजांना प्रतिदिन पुण्यांश हाहि गांठितसे.
याही जितेंद्रियाचा चारणयुगगीत पुण्यशब्द ' मुनी '
स्वर्गा स्पर्शी दरचेवरि, केवळ 'राज'-पूर्व होवोनी ! * १४

**दुसरा**—गौतमा, बलदैत्याला मारणारा इंद्राचा मित्र दुष्यंत म्हणतात तो हाच काय ?

**पहिला**—होय, हाच.

[ स्रग्धरा ]

**दुसरा**—नोहे आश्चर्य कांहीं नगरपरिघसे दीर्घ बाहू जयाला
तो रक्षी एकटाची अवनि, जलनिधिश्याम सीमा जयेला;
दैत्यांशीं झुंजतांना समरिं भरंवसा ठेविती देव याच्या
सामर्थ्यप्रौढिशाली सगुण धनुवरी, वज्रिंही वासवाच्या. १५

**दोघे**—( जवळ जाऊन ) राजा, तुझा विजय असो !

**राजा**—( आसनावरून उठून ) आपणां उभयतांस वंदन करितों.

**दोघे**—तुझें कल्याण असो. ( फळें पुढें करितात ).

**राजा**—( वंदन करून फळें घेतो ) आज्ञा व्हावी अशी इच्छा आहे.

---

* पाठ दुसरा—

[ शा. वि. ]

सर्वांना उपभोग्य आश्रम, तिथें हा भूपतीही वसे,
हाही पाळुनियां प्रजा प्रतिदिनीं पुण्यांश गांठीतसे,
स्वर्गी या वशिचाहि पुण्य ' मुनि ' हा शब्द प्रतिष्ठा वरी;
लागे चारणगीत ' राज ' पद हें पूर्वी तयाच्या परी.

**दोघे**--आश्रमवासी जनांना आपण येथें असल्याची वार्ता समजली आहे, ह्मणून त्यांची आपणांस अशी विनंती आहे कीं,

**राजा**—काय आज्ञा आहे ?

**दोघे**-भगवान् कण्वमहर्षि आश्रमांत नसल्यामुळें राक्षस यज्ञाला विघ्नें आणीत आहेत. तेव्हां कांहीं दिवसपर्यंत सारथ्यासुद्ध आपण या आश्रमांत राहून आमचें रक्षण करावें.

**राजा**—हा माझ्यावर अनुग्रहच आहे.

**विदूषक**--( एकीकडे ) ही विनंती तुझ्या पथ्यावरच पडली बाबा !

**राजा**—( हंसून ) रैवतका ! सारथ्याला सांग कीं धनुष्यासह रथ तयार करून घेऊन ये.

**दौवारिक**--जी सरकार. ( निघून जातो. )

**दोघे**--( आनंदानें )

[ गीति ]

पाळीसि पूर्वजांचें व्रत हें तुज होय फार अनुरूप.
* दीनाभययज्ञामधिं दीक्षित पुरुवंशिचे सदा भूप. १६

**राजा**-( नमस्कार करून ) आपण पुढें व्हावें. हा मी पाठोपाठ आलोंच.

**दोघे**-तुझा विजय असो ! ( जातात ).

**राजा**- माढव्या ! शकुंतला पाहण्याची आहे का उत्सुकता ?

**विदूषक**--आधीं भरपूर होती; पण आतां राक्षसांचें वर्तमान ऐकल्याबरोबर तिचा एक थेंब देखील शिल्लक राहिला नाहीं बाबा !

**राजा**—अरे भिऊ नको. तूं खचित अगदीं माझ्याजवळ असणार.

**विदूषक**—मग राक्षसांच्यापासून बचावलोंच म्हणा !

( प्रवेश करून )

**दौवारिक**—महाराज ! विजयप्रस्थानार्थ रथ सिद्ध आहे; पण आईमहाराजांची आज्ञा आपणांस कळविण्याकरितां हा करभक दूत नगराहून येथें आला आहे.

---

* या अर्धाबद्दल पाठान्तर—

'दीनाभयदानाचें कंकण करिं धरिति पूरुकुलभूप.'

**राजा**—( आदरपूर्वक ) काय आईसाहेबांनीं त्याला पाठविलें आहे ?

**दौवारिक**—होय सरकार.

**राजा**—तर मग त्याला आंत घेऊन ये.

**दौवारिक**—जी सरकार. ( बाहेर जातो व करभकाला घेऊन प्रवेश करतो. ) हे पहा महाराज. हो पुढें.

**करभक**—विजयोऽस्तु महाराज ! आईमहाराजांची आपणांस आज्ञा आहे कीं आजपासून चवथ्या दिवशीं माझ्या उपवासाचें पारणें आहे तेव्हां चिरंजीवांनीं त्या प्रसंगीं इकडे अवश्य यावें.

**राजा**—एकीकडे तपस्व्याचें काम, व दुसरीकडे पूज्य वडील माणसाची आज्ञा. दोन्हीही मोडतां येत नाहींत. या पेंचांतून बाहेर पडण्याला काय युक्ति करावी बरें ?

**विदूषक**—त्रिशंकूसारखें मध्येंच लोंबत राहावें ! दुसरें काय ?

**राजा**—गड्या ! खरोखरच मी मोठ्या घोटाळ्यांत पडलों आहें !

[ स्रग्विणी ]

दोन कार्यें पहा दोन भिन्न स्थलीं
प्राप्त; तेणें द्विधा मन्मती जाहली.
शैल येतां पुढें आडवा काननीं
सिंधुधारा द्विधा हो जशी भंगुनी. १७

( विचार करून ) मित्रा ! आईसाहेब तुला पुत्राप्रमाणेंच लेखतात. म्हणून तूंच इथून परत जाऊन, तपस्विकार्यांत मी गुंतलों आहें असें सांगून, आईसाहेबां-संबंधाचें पुत्रकृत्य उरकून टाक.

**विदूषक**—मी राक्षसांना भितों असें मात्र समजूं नकोस अं !

**राजा**—( हंसून ) तुला आणि राक्षसांची भीति ! असें कधीं तरी होईल काय !

**विदूषक**—तर मग राजाचा धाकटा भाऊ ज्या थाटानें जाईल त्या थाटानें आम्ही जाणार !

**राजा** – तपोवनाला उपद्रव होऊं नये म्हणून मी तर स्वारींतल्या सगळ्याच माणसांना तुझ्या बरोबर देऊन परत पाठविणार !

**विदूषक**—( गर्वानें ) मग काय आम्ही युवराजच बनलों !

**राजा** –( स्वगत ) ही स्वारी जरा फाजील शहाणी आहे ! कदाचित् आमचा इकडचा शकुंतलेचा नाद पटकन् जनानखान्यांतील स्त्रियांच्या कानावर घालील ! तर मग याला असें सांगावें. ( उघड, विदूषकाचा हात धरून ) मित्रा ! ऋषींच्या शब्दाला मान देण्याकरितां मी आश्रमांत जातों आहें. तपस्विकन्येवर माझं मन बसलें आहे ही गोष्ट अगदीं खोटी आहे. पहा,

( व. ति. )

*आम्ही कुठें ? जन कुठें वनिं जन्मलेला,
कामानभिज्ञ, मृगबालकिं वाढलेला ?
मी बोललों सकल तें सखया विनोदें;
त्यामाजि सत्य न मुळीं, मनिं हें असों दे. १८

**विदूषक**—ठीक आहे. ( सर्व निघून जातात )

( दुसरा अंक समाप्त. )

---

*याबद्दल दुसरा श्लोक—

[ स्रग्धरा ]

कोठें आम्ही विलासी रसिकवर महाभाग्यसंपत्तिशाली ?
कोठें ती मुग्ध कन्या, अविदितमदना, पाडसीं वाढलेली ?
मित्रा जें बोललों यांविषयिं, समज तें सर्व कांहीं विनोदें.
त्यामाजी सत्य नाहीं कवहि, वचन हें मात्र चित्तीं असो दे.

# अंक तिसरा

( नंतर हातांत दर्भ घेतलेला यजमानशिष्य प्रवेश करितो. )

**शिष्य**–अहो ! केवढा पराक्रमी तरी दुष्यन्तराजा ! त्यानें आश्रमांत प्रवेश केल्याबरोबर आमचीं धर्मकृत्यें अगदीं निर्विघ्नपणें चालूं लागलीं !

[ गीति ]

मौर्वीरवेंचि, जाणों धनुहुंकारेंचि ! नृपति विघ्न हरी;
शरसंधान तयाचें अमोघ मग काय विक्रमा न करी ? १

तर मग आतां यज्ञवेदीवर पसरण्याकरितां हे दर्भ ऋत्विजांना नेऊन देतों. ( इकडे तिकडे फिरून आकाशाकडे पहात ) प्रियंवदे ! ही वाळयाची उटी आणि हीं देठांसह कमळवेलींचीं पानें कुणाकरितां ग चालविलीं आहेत ? ( कान देऊन ) काय म्हणतेस ? उन्हाच्या झळाळीनें शकुंतलेच्या अंगाची फार तलखी होत आहे; म्हणून तिचा दाह शांत करण्याकरितां होय ? तर मग काळजीपूर्वक उपचार चालूं दे. कुलपति भगवान् कण्वमुनींचा शकुंतला खचित जीव कीं प्राण आहे. मीही इतक्यांत यज्ञाचें तीर्थ तिच्याकरितां गौतमीच्या हातीं पाठवून देतों. ( जातो. विष्कंभक संपतो. नंतर मदनपीडित राजा प्रवेश करितो. )

**राजा**–( विचारमग्न स्थितींत सुस्कारा टाकून )

[ व. ति. ]

[1]माझ्या मनासि कळतोचि तपःप्रभाव,
तैसा तिचाहि पुरता परतंत्रभाव;
मागें तथापि लवही फिरवावयाला
नाहीं समर्थ तिजपासुनियां मनाला २

---

१. या बद्दल दुसरा श्लोक—

[ अनुष्टुभ् ]

तपाचें बल मी जाणें, तसें ती न स्वतंत्र हें;
तिच्यापासुनि ओढाया मागें मन न मी सहें.

( मदनपीडा दर्शवीत ) भगवंता कुसुमायुधा ! आम्हां कामिजनांचा तुझ्यावर आणि चंद्रावर पूर्ण विश्वास. असें असून तुम्हीं दोघांनींही आमची फसवणूक मांडली आहे ! कशी ती पहा,

[ पृथ्वी ]

*स्मरा ! कुसुमबाण तूं, विधुहि शीतरश्मी तसा,
परी न मजसारख्यां अनुभवा तसे चेतसा;
करीसि शर तूं तुझे अतिकठोर वज्रापरी,
स्फुलिंग विखरीतसे विधु तुषारगर्भी करीं. ३

हे भगवन्ता कामदेवा ! तुला माझी दया येत नाहीं काय ? तुझें आयुध जर फुलांचें आहे तर त्यांच्यांत हा कठोरपणा कसा ? (विचार करीत) हां ! समजलों !

[ गीति ]

सागरिं वडवानलसा हरकोपाग्नि प्रदीप्त तुजमाजी,
भस्मावशिष्ट ना तरि तनु तव मजसारिख्यांस कां भाजी ? ४

अथवा कांहीं चिंता नाहीं.

[ गीति ]

सतताचि मदन मम मना पीडी तरि तो मला प्रियाचि आहे;
उद्देशुनि मदिराक्षीप्रियेस जरि तो प्रहार करिताहे. ५

अरे ! फुकटाचि परिपोषियलें तुज मदना ! मीं मनोरथशतांनीं
आकर्ण ओढुनी धनु वृष्टि करिसि मजवरीच बाणांनीं ! ६

( खिन्नपणानें फिरत ) तपस्व्यांचें काम निर्विघ्नपणें पार पडलें म्हणून त्यांनीं मला निरोप दिला आहे. आतां या दगदगलेल्या जीवाची कुठें बरें करमणूक करावी ? ( उसासा टाकून ) प्रियेच्या दर्शनाशिवाय दुसरा कोणता उपाय बरें ! तर मग तिलाच शोधावें. ( सूर्याकडे पाहून ) ही भर उन्हाची वेळ, शकुंतला बहुतकरून

---

* या अर्थाचीं दुसरीं पद्यें—

[ साकी ]

कुसुमबाण तव मृदु मदना ! अतिशीत इंदुकर असती.
परि माझ्यासम विरहि तयां ते उलट अनुभवा येती !
कारण, करिसी निजशर खरतर वज्रापरि तूं मारी,
इंदु, अग्निचे विखरि कण करीं, हिमकण ज्या माझारीं.

आपल्या मैत्रिणींसह मालिनीच्या तीरावरील लतामंडपांत घालवीत असते. तर आतां तिकडेसच जावें. ( फिरत व पहात ) या लहान लहान झाडांच्या मधल्या वाटेनें सुंदरी नुकतीच गेली असा तर्क होतो. कारण,

[ गीति ]

खुडिलीं हिनें फुलें तरि अजुनी तद्वेष्टनें न मिटती हीं,
पल्लव तोडि, तयानें, देठांतुनि दुग्ध सारखें वाही ! ७

( स्पर्शसुख दर्शवून ) अहाहा ! या ठिकाणीं वारा किती तरी सुंदर वाहात आहे !

[ गीति ]

* कमलस्पर्शसुगंधी, घेउनि ये मालिनीतरंगकण,
उचितचि तप्तांगानीं दृढ आलिंगावयासि हा पवन. ८

( इकडे तिकडे फिरत व पाहात ) वेतांच्या वेलींनीं वेढलेल्या या लतामंडपांत प्रिया असावी. कारण, ( खालीं पाहून )

[ गीति ]

नव पदपंक्ति उमटली पांडुर सिकतेंत याचिया द्वारीं,
पुढतीं उन्नत, पश्चात् निम्न, श्रोणिभरें पहा झाली ! ९

तर मग झाडामागें उभें राहून त्याच्या खांद्यांतून पाहूं. ( तसें करीत हर्षानें ) अहाहा ! खरोखर डोळ्यांचें साफल्य झालें ! ही माझ्या मनोरथाची देवता दगडाच्या चौथऱ्यावर पुष्पशय्या करून तिजवर निजली आहे; आणि दोघी सख्या तिच्याजवळ बसल्या आहेत. ठीक आहे. आतां यांचीं मनमोकळेपणानें चालणारीं भाषणें ऐकावयाला सांपडतील. ( पहात उभा राहतो. नंतर राजानें वर्णिल्याप्रमाणें सख्यांसह शकुंतला प्रवेश करिते. )

---

* या अर्थाचीं दुसरीं पद्यें–

[ दिंडी ]

मालिनीच्या जलिं उठति बहु तरंग, तत्कणांचा घडतसे ज्यासि संग,
कमलरेणूंनीं होय मधुरगंध, पवन ऐसा अतिशीत मोदकंद;
किती मौजेनें वाहि या ठिकाणीं ! मला वाटे मेघेंचि कीं वघोनी
शांतवावीं हीं पूर्ण सकल अंगें, तापलीं जीं फार त्या अनंगें.

सख्या—( वारा घालून प्रेमानें ) गडे शकुंतले ! हा कमळांच्या पानांचा वारा बरा वाटतो का तुला ?

शकुंतला—काय, तुम्ही मला वारा का घालीत आहां ?

( गोरीमोरीं तोंडें करून एकमेकींकडे पाहतात )

राजा—शकुंतलेची प्रकृति फारच बिघडलेली दिसत आहे ! ( तर्क करून ) मग काय हा उन्हाळ्याच्या झळईचा प्रभाव किंवा माझ्या मनानें घेतलें आहे तसें कांहीं आहे ? ( उत्सुकतेनें निरखून पाहून ) किंवा शंका नकोच.

[ दिंडी ]

उटी वाळ्याची पयोधरप्रांतीं, कमलनालाचें वलय शिथिल हातीं;

जरी बाला ही मदनतप्त आहे, तरी नयनां आनंदवीत राहे;

पंचबाण ग्रीष्म हे उभयतांही, असति तापप्रद सारखेच पाहीं.

तरी युवतिस जो ग्रीष्म ताप देतो, मदनतापाइतुका न गोड हो तो. १०

प्रियंवदा—( एकीकडे ) गडे अनसूये ' तो राजर्षि प्रथम दृष्टीस पडला तेव्हांपासून शकुंतलेचें मन ठिकाणावर नसल्यासारखें दिसतें. तेव्हां त्याच्यामुळें तर हिची अशी दशा झाली नसेल ना ?

अनसूया—अग प्रियंवदे, माझ्या मनालाही अशीच शंका येते बाई ! बरें, आतां हिला विचारून पाहतें. ( मोठ्यानें ) गडे शकुंतले ! तुला विचारावयाचें आहे कांहीं. तुझ्या आंगाचा फारच दाह होतो आहे, नाहीं बरें ?

शकुंतला—( अर्धीच अंथरुणावर उठून ) सखे ! काय बोलावयाचें आहे बरें तुला ?

अनसूया—कामदेवासंबंधानें प्रत्यक्ष काय प्रकार होतात याचा आम्हांला मुळींच अनुभव नाहीं. पण इतिहास-ग्रंथांवरून मदनपीडितांची अवस्था कशी होते हें आम्हांस ठाऊक आहे. तसली तुझी स्थिति दिसते. सांग बरें तुला कशामुळें पीडा होत आहे ती. रोगाचें खरें कारण न समजलें तर उपाय तरी कसा करावयाचा ?

राजा—माझीच कल्पना अनसूयेच्या डोक्यांत आली ' तेव्हां मी केवळ आपल्या मनावरूनच कांहीं तरी तर्क करितों असें नाहीं.

शकुंतला—( आपणाशीं ) माझा विकार तर फार बळावला आहे ! तरी आतांही यांना तो एकदम सांगवत नाहीं बाई !

**प्रियंवदा**—गडे शकुंतले, ही अनसूया अगदीं योग्य बोलली. तुझ्या जीवाला पीडा होत आहे, तिची अशी हेळसांड कां बरें करतेस ? दिवसेंदिवस तुझ्या हातापायांच्या काडया होत चालल्या आहेत. केवळ लावण्याची छाया मात्र तुला सोडून गेली नाहीं, एवढेंच काय तें !

**राजा**—खरें बोलली प्रियंवदा. कारण,

[ शा. वि. ]

गेले गाल सुकोनि फारचि, कुचां शैथिल्य कीं पातले,
कांती पांडु, कटी दिसे कृशतर, स्कंध श्रमें भागले.
वाटे ही अनुकंप्य रम्यहि तशी कामामुळें पीडिली,
ती वासंतिक पर्णहारिपवनें जाई जशी शोषिली. ११

**शकुंतला**—तुह्मांला सोडून दुसऱ्या कोणाला बाई सांगावयाचें ! पण तसें करणें म्हणजे तुम्हांला व्यर्थ शिणविणें आहे.

**दोघी**—म्हणूनच तर आह्मी तुला आग्रह करतों सांगावयाचा. हें बघ, जिव्हाळ्याच्या माणसांना दुःखाचे वांटेकरी केलें म्हणजे तें दुःख थोडेसें हलकें होतें.

[ साकी ]

**राजा**—सुखदुःखांच्या वांटेकरणी सख्या हिच्या पुसतील
पीडाकारण, सांगेल न त्यां, ऐसें नचि होईल.
उत्कंठेनें पाहि मजकडे मुरडुनि वारंवार,
परी भितें मन, न कळे उत्तर काय किंणि पडणार ! १२

**शकुंतला**—गडे ! तपोवनाचें रक्षण करणारा तो राजर्षि दृष्टीस पडला तेव्हां पासून फिर-( असें अर्धेंच बोलून लाजेनें तशीच स्तब्ध राहते )

**दोघी**—गडे, अशी लाजतेस काय ? सांग सांग, पुढें काय तें.

**शकुंतला**—सख्यानों, तेव्हांपासून माझी अशी दशा झाली आहे.

**राजा**—( हर्ष ) [illegible]:, जें ऐकावयाला हवें होतें तेंच ऐकावयास मिळालें !

[ गीति ]

जो ताप देह [illegible] तोच मदन आजि शांतवि मनास !
ग्रीष्मान्तीं दिवस तस्याम जसा होय सुखद जीवांस. १३

**शकुंतला**—बायांनो ! सांगतेंच तुम्हांला आतां; पहा पसंत पडल्यास. माझें म्हणणें असें कीं, कांहीं तरी उपायांनीं तो राजर्षि मला पदरांत घेईल असें तुम्ही करा. नाहीं तर मला तिलांजली देण्याचीच तुमच्यावर पाळी येईल हें खचित समजा.

**राजा**—या भाषणानें तर संशय समूळ नाहींसा केला !

**प्रियंवदा**—( एकीकडे ) काय ग अनसूये ! हिची मदनबाधा तर भलत्याच थराला जाऊन पोंचली ! आतां यापुढें चालढकल करण्यासारखी हिची स्थिति दिसत नाहीं. जिच्यावर हिचें मन बसलें आहे तो पुरुकुलाचा अलंकार आहे. तेव्हां हिच्या विचाराला रुकार देणें योग्य आहे; नाहीं का ?

**अनसूया**— गडे ! तूं म्हणतेस तसेंच मला वाटतें.

**प्रियंवदा**— ( उघड ) गडे शकुंतले ! फार चांगलें झालें बाई ! तुझें प्रेम योग्य ठिकाणीं बसलें ही गोष्ट अभिनंदनीय आहे. बरोबरच आहे. महानदी सागराला सोडून का दुसऱ्या कोणाला जाऊन मिळणार ? या वसंतकालांत पालवी फुटलेली माधवी लता आम्रवृक्षाशिवाय दुसऱ्या कोणाला संभाळवेल ?

**राजा**—विशाखेच्या तारका चंद्रकलेच्या मागोमाग चालल्या तर त्यांत आश्चर्य तें कसलें ?

**अनसूया**—पण सखीचा हेतु सिद्धीस नेण्याला झटपटीचा पण बिनबोभाट असा कोणता उपाय योजावा बरें ?

**प्रियंवदा**—बिनबोभाट कसें जमेल याचा विचारच आहे ! पण झटपट होण्याला मात्र कांहींच अडचण नाहीं.

**अनसूया**—तें ग कसें ?

**प्रियंवदा**—अग त्या राजर्षीनें हिच्याकडे प्रणयपूर्वक पाहून हिच्या विषयींचा आपला अभिलाष व्यक्त केला आहे. आलीकडे हिच्या ध्यास लागून जागरणें झाल्यामुळें तो अंमळसा कृश झालेला दिसत नाहीं का ?

**राजा**—खरोखरच मी असा झालों आहे ! कारण,

[ **गीति** ]

प्रतिरात्र बाहुवरती टेकुनि शिरकमल मी पडें शयनीं,
अंतर्गत तापानें उष्णाश्रु प्रबल लोटती नयनीं;
त्यांच्या संपर्कानें ज्यांतिल मणिरंग पालटुनि गेला,
अतिशिथिल म्हणुनि धनुच्या स्पर्शं करीनाच जें गुणांकाला;

ये मणिबंधापासुनि जें सरकुनियां पुनः पुन्हां खालीं,
तें हें कनकवलय मी मागें वरचेवरी पुन्हां सारीं! १४

**प्रियंवदा**—( विचार करून ) गडे शकुंतले ! त्याच्या करितां एक प्रेम-पत्रिका तयार कर. फुलांत गुंडाळून, देवाच्या प्रसादाचें निमित्त करून, त्याच्या हातीं ती पडेल असें मी करीन.

**अनसूया**—किती नामी आणि नाजूक युक्ति काढलीस ही प्रियंवदे ! पण यावर शकुंतलेचें काय म्हणणें पडतें पाहूं.

**शकुंतला**—तुमच्या योजनेविषयीं मला कधीं तरी शंका येईल कां ?

**प्रियंवदा**—तर मग स्वतांविषयीं थोडी प्रस्तावना करून एक गोडसें गाणें रच पाहूं.

**शकुंतला**—सखे, मनांत जुळवून पाहतें. पण बाई ! त्यांच्याकडून त्याचा अव्हेर होईल किंवा काय या भीतीनें माझें मन कांपूं लागतें !

**राजा**—( आनंदानें )

[ व. ति. ]

अव्हेर जो करिल भीति तुझ्या मनाला
तो हा तुझ्यापुढतिं उत्सुक संगमाला;
श्री प्राप्त होइल न वा अभिवांछित्यास ,
होई तदिष्ट परि दुर्लभ केविं तीस ? १५

**सख्या**—अगे ! आपल्या अंगच्या गुणाचा असा अवमान कां करतेस ? शरीराचा दाह शांत करणाऱ्या शारदीय चंद्रिकेला कोणता रसिक, पडदा आड धरून, दूर करील बरें ?

**शकुंतला**—(हंसून) आतां तुमच्या म्हणण्याप्रमाणें गीत रचावयाला लागतें. ( गीत रचण्याच्या विचारांत मग्न होऊन बसते. )

**राजा**—प्रियेकडे पाहूं लागलें म्हणजे डोळ्यांच्या पापण्यासुद्धां हालचाल विसरतात ! हें योग्यच आहे. कारण,

( द्रु. वि. )

भुवइतें चढवी वरि सुंदरी, नव पदें जुळितां कवनांतलीं;
विपुल कंटक गालिं थरारती, सुचविती बहु मद्विषयीं रती. १६

**शाकुंतला**—सखे, गाण्याचा मजकूर मनांत योजला आहे; पण लिहिण्याचीं साधनें येथें नाहींत.

**प्रियंवदा**—हें पहा पोपटाच्या पोटासारखें कमळवेलीचें कोंवळें पान आहे. यावर नखांनीं कोरून अक्षरें लिही.

**शाकुंतला**—( लिहून ) ऐका सख्यांनो ! याचा अर्थ बरोबर जुळतो किंवा नाहीं पहा बरें.

**दोघी**—हं वाचं. आमचें लक्ष्य आहे.

**शाकुंतला**–( वाचते )

[ गीति ]

न कळे मजला तव, परि माझें बसलें तुझ्यावरीच मन;
अदया ! रात्रंदिन मम अंगां अतिताप देतसे मदन. १७

**राजा**—( एकदम पुढें होऊन )

[ गीति ]

तन्वंगि ! मदन तापवि तुज रात्रंदिन तथापि मज दाही.
दिनमणि इंदुसि करितो म्लान, तशी कुमुदिनीस नाचि पाही ! १८

**सख्या**—( पाहून व आनंदानें उठून ) विलंब न लावतां प्राप्त झालेल्या या मनोरथाचें स्वागत असो !

( शकुंतला उठूं पाहते. )

**राजा**—छे छे ! एवढी तसदी कशाला ?

[ दिंडी ]

कुसुमशयना चिकटलीं तुझीं अंगें; मधुर गंध तयां कमलनालभंगें;
तप्त झालीं किति ! शक्ति तयांलागी, आदराया मज नुरलि सुंदरांगि ! १९

**अनसूया**—येथें या शिळेवर एका बाजूला बसावें महाराज !

( राजा बसतो. शकुंतला लज्जेनें उभी राहते . )

**प्रियंवदा**—आपलें दोघांचेंहि एकमेकांवरील प्रेम उघड दिसत आहे. पण सखीवरील प्रेमामुळें मला पुन्हा बोलल्याशिवाय राहवत नाहीं.

**दुष्यन्त**—भद्रे, तें बोलून टाक तर मग; उगाच मनांत ठेवूं नकोस. बोलावयाचें तें वेळींच बोलून टाकलें नाहीं म्हणजे तें मागून तापाला मात्र कारण होतें.

**प्रियंवदा**—राज्यांतील पीडलेल्या प्रजेचें दुःख निवारण करणें हा आपणा राजेलोकांचा धर्म आहे नव्हे ?

**राजा**—होय. दुसरा कोणता असणार ?

**प्रियंवदा**—तुझ्याकरितां भगवान् कामदेवानें आमच्या सखीची अशी अवस्था करून टाकली आहे. तेव्हां हिचा स्वीकार करून हिचें रक्षण करावें, अशी आमची प्रार्थना आहे.

**राजा**—उभयपक्षींही अशीच इच्छा आहे. सर्वस्वी मजवर तुमचा उपकार आहे.

**शाकुंतला**—( प्रियंवदेकडे पाहून ) गडे ! अंतःपुरांतील राण्यांच्या विरहामुळें, त्यांना भेटण्याविषयीं राजर्षीचें मन उत्सुक झालें असेल; त्याला आडवून कशाला धरतेस उगीच ?

**राजा**—सुंदरि !

[ द्रु. वि. ]

मन तुझ्याचि वरी मम बैसलें, हृदयवासिनि ! मानिं असें खरें;
अनृत तें जरि मानिनि ! मानिसी, स्मरहतासि पुन्हां मज ताडिसी ! २०

**अनसूया**—महाराज ! राजे लोकांना अनेक बायका असतात असें ऐकतों. म्हणून या आमच्या सखीच्या आप्तांना दुःख होणार नाहीं अशी हिची व्यवस्था आपण ठेवली पाहिजे.

**राजा**—आर्ये ! फार काय सांगूं ?

[ वंशस्थ ]

अनेक पत्नी असती जरी मला, तरी प्रतिष्ठास्पद दोनची कुला;
समुद्रकांची क्षिति एक त्यांतली, दुजी सखी ही तुमची बहू भली. २१

**दोघी**—आतां आमचा जीव खालीं पडला बाई ?

**प्रियंवदा**—( पलीकडे नजर टाकून ) गडे अनसूये ! हे आपल्या हरणीचें पाडस पहा कसें चुकल्या चुकल्या सारखें इकडे पाहात आहे ! मला वाटतें तें आपल्या आईला शोधतें आहे. चल तर त्याला तिच्याकडेस पोंचवूं.

( दोघी जाऊं लागतात )

**शाकुंतला**-सख्यांनो ! मला आतां येथें आधार कोणाचा बाई ? दोघींतून कोणी तरी एक इथें राहा गडे !

**दोघी**—सगळ्या पृथ्वीचें रक्षण करणारा तुझ्या जवळच उभा आहे. (जातात)

**शाकुंतला**—काय! गेल्याच न या शेवटीं!

**राजा**—घाबरावयाचें कांहीं कारण नाहीं! हा सेवक तुझ्यापाशीं उभा आहेना?

[ साकी ]

*कमलदलांचा करुनी पंखा शिंपुनि त्यावरि वारी
घालूं काय मी तुजला वारा जो शीत श्रमहारी?
किंवा अंकीं चरण ठेवुनी पद्मताम्र अभिराम
चुरूं काय तव? कमललोचने! जेणें तुज आराम. २२

**शाकुंतला**—ज्यांचा मान राखणें योग्य त्यांचा अपमान मी करणार नाहीं. असली भलतीच सेवा का आपल्याकडून घ्यावयाची!

**राजा**—सुंदरी! उन्हाचा ताप अजून कमी झाला नाहीं, आणि तुझ्या शरीराची अवस्था तर अशी!

[ गीति ]

टाकोनि कुसुमशयना कमलदलांच्या तशा स्तनावरणा
जाशी उष्णांत कशी? मदन करी म्लान या तव्दगांना! २३

( तिला परतवूं लागतो. )

**शाकुंतला**—पौरवराज! मर्यादा राखा. माझें मन जरी मदनानें अस्वस्थ झालें आहे, तरी माझ्यावर माझी सत्ता नाहीं.

**राजा**—भित्री कोठली! अग वडील माणसांची भीति बाळगण्याचें कारण नाहीं. कुलपति भगवान् कण्वमुनि धर्मज्ञ आहेत. यांत तुला ते दोष देणार नाहींत. पहा,

---

* या अर्याचा दुसरा श्लोक—

( व. ति. )

पंखा करीं धरुनियां नलिनीदलांचा
घालूं सुशीत पवन श्रमहारि साचा?
अंकावरी मृदुकरीं चुरूं काय सांग
बाले तुझे चरण हे नवपद्मरंग?

[ दिंडी ]

पूर्वकालीं राजर्षिकन्यकांनीं
पती वरिले गांधर्वविधानांनीं,
पित्यानींही अभिनंदिलें तयांला;
असें ऐकुनियां टाऊकें अम्हांला ! २४

**शकुंतला**—मला अंमळ सोडा महाराज ! मी पुन्हां सख्यांचा विचार घेतें.

**राजा**—बरें आहे सोडतों.

**शकुंतला**-केव्हां पण ?

**राजा**--

[ द्रु. वि. ]

* अधर ओष्ठ अखंडित कोंवळा; रस हळू आधि पीइन त्यांतला;
भ्रमर जेविं तृषाकुल जाहला, रस पितो फुलल्या कुसुमांतला. २५

( तिचें मुख वरती करूं पाहतो. ती तें चुकविते. )

( पड्यांत )

चक्रवाकस्त्रिये ! सहचराचा निरोप घे; रात्र येऊन ठेपली.

**शकुंतला**—( ऐकून व गडबडून ) पौरवराज ! माझा समाचार घेण्याकरितां गौतमी आत्या इकडेसच येत आहे खचीत ! म्हणून म्हणतें आपण अंमळ झाडाच्या आड व्हा.

**राजा**—ठीक आहे. ( झाडाआड उभा राहतो. )

( नंतर हातांत पात्र घेतलेली गौतमी व दोघी सख्या प्रवेश करतात. )

**सख्या**—आर्ये गौतमि ! इकडे, असें इकडे.

**गौतमी**—( शकुंतलेजवळ जाऊन ) बाळे ! आतां तुझा दाह अंमळ कमी आहे का ?

---

* या अर्थाचा दुसरा श्लोक—

( हरिणी )

अधर तव हा बाळे ! आहे अखंडित कोमल,
रस हळुचि मी आधीं याचा पिईन तृषाकुल;
कुसुम फुललें ताजें तेवीं विमोहक दृष्टिला
भ्रमर रसिक प्राशी जेवीं मरंद तयांतला.

**शकुंतला**—होय आर्ये, थोडा कमी वाटतो आतां.

**गौतमी**—या यज्ञाच्या तीर्थानें तुझ्या शरीराची पीडा समूळ नाहींशी होईल बरें ! ( शकुंतलेच्या मस्तकावर दर्भोदक शिंपडून ) बाळे ! आतां दिवस मावळला- चल, पर्णकुटिकेकडेसच जाऊं तर. ( जातात )

**शकुंतला**—( स्वगत ) हृदया, प्रथम तुझा मनोरथ मूर्तिमंत अनायासें तुझ्या पुढें उभा राहिला असतां तूं भित्रेपणा सोडला नाहींस. मग आतां, त्याचा दुःखदायक वियोग प्राप्त झाला असतां, उगाच कां तुझी ही तळमळ ? ( कांहीं पावलें पुढें जाऊन उभी राहून उघड ) हे संताप दूर करण्याच्या लतामंडपा ! पुन्हां तुझा उपभोग घ्यावयाला येईन बरें ! आतां मी तुझा निरोप घेतें.

( इतरांसह जड पावलांनीं शकुंतला जाते )

**राजा**—( पहिल्या ठिकाणीं येऊन व सुस्कारा टाकून ) अरेरे ! इष्टहेतूच्या सिद्धीच्या मार्गांत किती तरी विघ्नें असतात ! पहा,

[ शा. वि. ]

स्वीया अंगुलिनें तिनें वरिवरी बिंबाधरा झाकिलें,
अर्धस्फुट नको नको म्हणुनियां माझ्या मना मोहिलें.
वारंवार मृगाक्षिनें फिरविलें स्कंधाकडे आनन,
तें केलें वरि मीं कमें तरि, परी तें राहिलें चुंबन ! २६

मी आतां जाऊं तरी कोठें? अथवा प्रियेनें उपभोगून निरोप दिलेल्या या लताकुंजांतच थोडा वेळ बसावें. ( चहूंकडे पाहून )

[ साकी ]

*शिलेवरी ही शय्या आहे कुसुमांचीं रचिलेली,
फुलें तियेचीं चुरगळुनीया गेलीं अंगाखालीं.
मदनलेख हा पडला आहे इकडे कोमेजोनी !
नलिनीपर्णावरी प्रियेनें कोरियला स्वनखांनीं.

---

*या अर्थाचा दुसरा श्लोक—

शय्या पुष्पमयी शिलेवरि तिची ही अंगसंगें लुळी,
ही म्लाना स्मरपत्रिका कमलिनी–पर्णी नखीं कोरिली;
हस्तभ्रष्ट मृणालकंकण तिचें हें ! दृष्टि येथें खिळे,
सोडाया सहसा न वेतसगृहा पाऊल माझें वळे !

कमलतंतुचें कंकण गळलें करांतूनि दिसतें हें,
दृष्टि येथल्या या वस्तूंवरि खिळोनि माझी राहे,
प्रियाशून्य हा वेतसमंडप जरि पाहीं नयनाहीं
तरी सोडुनी सहसा यातें मला जाववत नाहीं ! २७

( आकाशांत )

हे राजन् !

[ व. ति. ]

आरंभितां सवनकर्म दिनावसानीं
दीप्ताग्निवेदिभंवतीं सहसा जमोनी
छाया भयाण दिसती किति राक्षसांच्या !
संध्याघनासदृश पिंगट कांति ज्यांच्या. २८

राजा—हा मी आलोंच ! ( जातो )

तिसरा अंक समाप्त.

# अंक चवथा

( नंतर फुलें वेंचीत आहों असें दाखवीत सख्या प्रवेश करितात. )

**अनसूया**—गडे प्रियंवदे ! गांधर्वविधीनें शकुंतलेचें विवाहमंगल पार पडलें व तिला अनुरूप पति मिळाला यामुळें माझ्या मनाला समाधान झालें. पण बाई ! एका गोष्टीची मात्र अंमळ काळजी वाटते !

**प्रियंवदा**-ती कशी ?

**अनसूया**-आज ऋषींचा यज्ञ संपून त्यांनीं राजाला निरोप दिला. आतां तो आपल्या नगराला जाऊन अंत:पुरांत प्रविष्ट झाला म्हणजे त्याला इकडे झालेल्या गोष्टींची आठवण होईल कीं नाहीं कोणास ठाऊक बाई !

**प्रियंवदा**—त्याविषयीं काळजी नको. जे त्याच्यासारखे थोर व संभावित दिसतात त्यांचें अंतरंगही तसेंच असतें. त्यांच्या हातून भलतेंच कांहीं होण्याचा

संभव नसतो. आतां, हें कळलें म्हणजे बाबांना काय वाटेल हें मात्र सांगतां येत नाहीं बाई!

**अनसूया**—माझा तर्क असा धावतो कीं त्यांना हें मान्य होईल.

**प्रियंवदा**—कशावरून ग ?

**अनसूया**—गुणवान् वराला कन्या द्यावयाची हाच ना बाबांचा मुख्य हेतु ? मग नशीबानें घर बसल्या तसा पति मिळाला तर सहजच त्यांच्या मनाजोगतेंच घडून आलें म्हणावयाचें ! नव्हे का ?

**प्रियंवदा**—( फुलांच्या परडीकडे पाहून ) सखे ! देवपूजेपुरतीं फुलें झालीं.

**अनसूया**—अग पण शकुंतलेच्या सौभाग्यदेवतेचीही पूजा करावयाची आहे.

**प्रियंवदा**—खरेंच गडे ! ( तेंच काम चालूं ठेवलेसें दाखवितात )

( पडद्यांत )

कोण आहे उटजांत ? हा मी आलों आहें हो !

**अनसूया**—( कान देऊन ) कोणातरी अतिथीची हाक वाटते आहे !

**प्रियंवदा**—शकुंतला तर उटजाजवळ आहे.

**अनसूया**—पण तिचें मन कुठें आहे तिच्या जवळ ! एवढीं फुलें पुरें झालीं. ( जाऊं लागतात ).

( पडद्यांत )

काय ग ए ! अतिथीचा अपमान करणारे तापसकन्ये !

[ पृथ्वी ]

जया स्वमनिं चिंतिसी सकलचित्त देओनियां
　　न मानिसि तपोधनाप्रति निजाश्रमा आलिया,
स्मरेल तुजला न तो जरि परोपरी बोधिला,
　　प्रमत्त न जसा स्मरे स्वकृत पूर्विच्या गोष्टिला.　　१

**प्रियंवदा**—अग बाई ! हें काय झालें ? वाटलेंच होतें असें कांहीं तरी होईल म्हणून ! शकुंतलेचें चित्त ठिकाणीं नाहीं. त्यामुळें तिच्या हातून कोणातरी पूज्य माणसाचा अपराध घडला असें वाटतें ! ( उटजाकडे दृष्टि देऊन ) आणि तो माणूस देखील असा तसा नाहीं बाई ! अग हा शीघ्रकोपी महान् दुर्वास ऋषि ! पहा कसा शाप देऊन रागानें तडक भडफडत: चालला आहे तो ! हा कोणाला आवरणार बाई !

**अनसूया**-खरेंच; अग्नीशिवाय दुसरा कोण जाळूं शकणार ? जा तर गडे झटकन्. हातापायां पडून परतव त्याला कसा तरी ! तोंपर्यंत मीही पूजासाहित्य तयार ठेवतें.

**प्रियंवदा**-बरें आहे. ( जाते ).

**अनसूया**-( पुढें पाऊल टाकतांना आडखळल्यासारखें करून ) अग बाई ! माझ्या हातांतून फुलांची परडी पडली या धांदलींत पाय आडखळून ! ( फुलें वेंचण्याचा अभिनय करिते ) ( प्रवेश करून )

**प्रियंवदा**—सखे ! जन्माचाच वांकडा तो ! तो का कुणाच्या विनवण्यांना भीक घालणार ! पण कसाबसा थोडा द्रव आणला बाई त्याच्या हृदयाला !

**अनसूया**—( हंसून ) तो एवढा वश झाला हें तरी पुष्कळच आहे ! बरें पण, हें कसें काय झालें सांग पाहूं.

**प्रियंवदा** जेव्हां नाहींच परत फिरावयाचें असा स्वारीचा रंग दिसला तेव्हां पदर पसरून मीं त्यांना म्हणालें, ' भगवन् ! ती आपली मुलगी आहे. आपल्या तपाचा प्रभाव तिला ठाऊक नाहीं, आणि त्यांतून हा तिचा पहिलाच अपराध. म्हणून म्हणत्यें तो एकवार क्षमा करावा महाराज ! '

**अनसूया**—बरें पुढें ?

**प्रियंवदा**—यावर तो म्हणाला ' माझें वचन कालत्रयीं खोटें व्हावयाचें नाहीं. पण खुणेचा एखादा अलंकार दाखविल्यास शापाची निवृत्ति होईल. ' असें बोलतां बोलतांच तो दिसेनासा झाला !

**अनसूया**—प्रियंवदे ! आतां धीर धरायला जागा झाली हो ! तो राजर्षि नगराकडे जावयाला निघाला तेव्हां त्यानें आपलें नांव कोरलेली आंगठी, आपली आठवण म्हणून, स्वतांच शकुंतलेच्या बोटांत घातली. तेव्हां आतां उपाय शकुंतलेच्या हातांतच आहे म्हणावयाचा !

**प्रियंवदा**—गडे चल. शकुंतलेच्या गौरीची पूजा करूं आपण. ( चालूं लागतात. )

**प्रियंवदा**—( दूर नजर टाकून ) गडे अनसूये ! अंमळ इकडे बघ पाहूं. ती पहा आपली प्रियसखी डाव्या हातावर गाल टेकून कशी चित्रासारखी बसली आहे ! पतीच्या विचारांत मग्न झाल्यामुळें आपलें स्वतांचेंही हिला भान नाहीं ! मग दुसऱ्याला ही कोठून ओळखणार ?

**अनसूया**—गडे पण, ही गोष्ट तुला आणि मलाच ठाऊक अं ! पट्कर्मी होतां कामा नये. आपली प्रियसखी जातीची कोमळ आहे हो ! तिला आपण जपलें पाहिजे.

**प्रियंवदा**—मोगरीच्या वेलीवर कोण बाई कढत पाणी शिंपील ? (जातात)

( नंतर निजून उठलेला शिष्य येतो. )

**शिष्य**—भगवान् काश्यपमुनि प्रवासाहून परत आले. त्यांनीं मला आज्ञा केली आहे कीं वेळ किती झाली ती पाहून ये. तेव्हां बाहेर प्रकाशांत जाऊन पाहतों रात्र किती उरली आहे ती. ( फिरून व पाहून ) अरे ! पहाट झालीच ! पहा,

[ शा. वि. ]

एक्या बाजुसि जाय अस्तशिखरा तो ओषधींचा धनी !
अन्या बाजुसि सूर्य हा प्रकटला सूता पुढें स्थापुनी;
हें तेजोद्वय एककालिंच निजां अस्तोदयां दाविते
थोरांनांहि दशा अशी विधिवशें, ऐसें जणों बोधितें ! २

आणखी पहा,

[ व. ति. ]

हा दृष्टिच्या पलिकडेस मृगांक जातां,
रम्याहि तीच नलिनी रमवी न आतां !
दूरप्रवास घडतां निजवल्लभाला
पीडा सुदुःसह गमे अबलाजनाला. ३

**अनसूया**—( एकदम पडदा सारून येते ) पहा, संसारांतलीं सुखदुःखें काय असतात याचा ज्याला अनुभव नाहीं, त्याला हें काय समजणार ? तरी पण राजानें शकुंतलेशीं केलेलें वर्तन अयोग्य आहे एवढें मला कळतें.

**शिष्य**—आतां होमाची वेळ झाली असें आपण गुरुजींना कळवावें तर मग. ( जातो. )

**अनसूया**—उठलें खरी ! पण आतां करावें तरी काय बाई ! रोजच्या सकाळच्या कामधामाला देखील माझे हातपाय वळत नाहींत ! त्या मेल्या मदनाचा तळीराम गार होवो एकदांचा ! आमच्या भोळ्या व निष्कपट सखीला, थापा देणाऱ्या त्या राजावर, त्यानें विश्वास ठेवायला लाविलें !! अथवा दुर्वा-

साच्या शापामुळें तर त्याचें मन फिरलें नसेल ना ? नाहीं तर तो राजर्षि तशा गोडगोड गोष्टी बोलून, इतका काळ लोटला तरी, अजून एक बोटभर पत्र देखील धाडीत नाहीं हें कसें ? ( विचार करून ) तर मग इकडून खुणेची आंगठी त्याच्याकडे पाठवावी हें बरें. कष्टमय तप करणाऱ्या तापसांपैकीं कोणाला तरी बाई याकामीं तसदी द्यावी ? आणि त्यांतून हें काम अंमळ नाजूक पडलें ! या प्रकरणांत सखीकडे दोष आहे ही गोष्ट तर उघड आहे; तरी तिच्या पित्याला ती कळविणें ही गोष्टही अवश्य आहे; पण प्रवासाहून परत आलेल्या काश्यपबाबांना 'शकुंतलेचा दुष्यंताबरोबर गांधर्व-विवाह होऊन तिला कांहीं दिवस गेले आहेत,' असें कळविण्याला माझें मन नाहीं बाई धजत ! हा मोठा पेंच येऊन पडला आहे. यांतून निभाऊन बाहेर कसें पडावयाचें आतां ! ( प्रवेश करून ).

**प्रियंवदा**—गडे अनसूये ! चल चल लवकर! शकुंतला आज सासरीं जाणार! तेव्हां तिचें प्रस्थानमंगल करावयाला चल लवकर !

**अनसूया**—गडे प्रियंवदे ! हा बेत कसा काय झाला बाई !

**प्रियंवदा**—ऐक. रात्रीं झोंपबीप कशी काय लागली होती असें विचारण्या-करितां मी नुकतीच शकुंतलेकडे गेलें होतें !

**अनसूया**—मग ?

**प्रियंवदा**—इतक्यांत कण्वबाबा तेथें आले ! तेव्हां तिनें लाजून मान खालीं घातली. पण त्यांनीं तिला पोटाशीं धरून आनंदानें म्हटलें; ' बाळे, मी मोठा दैववान् आहें. धुरानें डोळे व्याकुळ झाले असतांही यजमानाची आहुती अगदीं नेमकी अग्नींत पडली ! चांगल्या शिष्याला विद्या दिली म्हणजे तिची काळजी नसते; तशी तुझीही आतां काळजी करण्याचें कारण राहिलें नाहीं. आजच बरोबर ऋषी देऊन तुला पतीकडे पाठवितों बरें !

**अनसूया**—पण बाबांना ही गोष्ट सांगितली कोणी ?

**प्रियंवदा**—अग्निशाळेंत प्रवेश केल्याबरोबर छन्दोमय आकाशवाणी झाली, तिनें.

**अनसूया**—( आश्चर्यानें ) काय आकाशवाणी झाली सांग पाहूं.

**प्रियंवदा**—ती अशी होती,

[ अनुष्टुभ् ]

भूमिभूत्यर्थ दुष्यन्ततेज ही उदरीं धरी,
जाणे ही कन्यका, ब्रह्मन्! अग्निगर्भशमीपरी. ४

**अनसूया**—( प्रियंवदेला मिठी मारून ) गडे! किती मनाजोगती गोष्ट झाली ही! पण बाई! आजच शकुंतलेला पोंचती करणार यामुळें आनंदाचा थोडा विरस होतो.

**प्रियंवदा**—गडे! आपलें दुःख कसें तरी नाहींसें करतां येईल. पण ती बिचारी सुखी होवो, म्हणजे झालें.

**अनसूया**—बरें तर हें बघ, त्या आंब्याच्या डाहाळीला मी एक नारळ कोरून त्यांत, पुष्कळ दिवस टिकेल आणि या वेळेस शकुंतलेला द्यावयाच्या उपयोगी पडेल म्हणून एक बकुळीची माळ गुंफून घालून ठेवली आहे, ती तूं हातानें काढून घे. तोंपर्यंत मीही इकडे मृगरोचना, तीर्थमृत्तिका आणि दूर्वांकुर असें मंगलसाहित्य गोळा करतें.

**प्रियंवदा**—ठीक आहे. ( अनसूया जाते. प्रियंवदा फुलें गोळा करीत असल्यासारखें दाखविते ) ( पडद्यांत )

अगे गौतमी! शार्ङ्गरव व दुसरे ऋषि तिकडे असतील त्यांना सांग कीं, शकुंतलेला पोंचवावयाला तयार व्हा.

**प्रियंवदा**—( कान देऊन ) सखे! चल लवकर! पाय उचल! हस्तिनापुराला जाणाऱ्या ऋषींना बोलावीत आहेत!

**अनसूया**—( हातांत मंगलसाहित्य घेऊन प्रवेश करिते ) गडे प्रियंवदे! चल जाऊं आपण. ( चालूं लागतात )

**प्रियंवदा**—(पाहून) ती पहा शकुंतला बसली आहे! सूर्योदयाबरोबर तिला न्हाऊं घातलें आहे. हातांत नीवाराच्या अक्षता घेऊन, मंगलाशीर्वाद देऊन तापसी तिचें अभिनंदन करीत आहेत! चल आपण तिच्या जवळ जाऊं. ( जवळ जातात )

( नंतर वर दर्शविल्याप्रमाणें आसनावर बसलेली शकुंतला प्रवेश करते ).

**एक तापसी**—( शकुंतलेला ) मुली! भर्त्याच्या मनांतील बहुमान दर्शविणारी महाराणी ही पदवी तुला प्राप्त होवो!

**दुसरी तापसी**—वत्से! वीरजननी हो!

**तिसरी तापसी**—बाळे ! भर्त्याची फार आवडती हो !

( असे आशीर्वाद देऊन गौतमीशिवाय सर्व जातात )

**सख्या**—( जवळ जाऊन ) सखे ! तुला उदंड सुखाचा लाभ होवो !

**शाकुंतला**—सख्यानों ! बऱ्या आलांत ! अशा इथें बसा.

**दोघी**—( मंगल साहित्याचीं पात्रें आणून व बसून ) गडे शकुंतले ! नीट बैस पाहूं. आम्ही तुला मंगलोपचार करितों.

**शकुंतला**—हें देखील खरोखर पुष्कळच समजतें मी ! आतां यापुढें तुमच्या हातून याचा लाभ होणें कठीणच आहे ! ( असें म्हणून डोळ्यांला पाणी आणते )

**दोघी**—गडे ! शुभप्रसंगीं अश्रु ढाळणें चांगलें नाहीं. ( अश्रु पुसून तिला शृंगारण्याचा अभिनय करतात )

**प्रियंवदा**—असल्या रूपाला ( रत्नादिकांचे ) उत्तम अलंकारच योग्य ! येथें रानफुलांच्या लेण्यांशिवाय हिच्या अंगावर घालायला दुसरें काय मिळणार ? पण त्यांनीं हिची मूळची शोभा मात्र कमी होते आहे बाई !

( दोन ऋषिकुमार हातांत देणगीच्या वस्तु घेऊन येतात )

**दोघे**—हीं घ्या वस्त्रें व भूषणें. घाला हीं शकुंतलाताईच्या अंगावर.

( सगळ्याजणी त्यांकडे पाहून आश्चर्यचकित होतात )

**गौतमी**—बाळा नारदा ! कोठून रे हीं वस्त्राभरणें आणलीं !

**प्रथम**—काश्यपबाबांचा हा प्रभाव !

**गौतमी**—काय ? त्यांनीं केवळ इच्छाशक्तीनें हीं निर्माण केलीं ?

**दुसरा**—छे ! तसें नाहीं. ऐकावें; वनस्पतींची फुलें शकुंतलेकरितां घेऊन या; अशी गुरुमहाराजांनीं आम्हांस आज्ञा केली. त्याप्रमाणें आम्ही तिकडे गेलों तों,

[ साकी ]

इंदुधवल शुभ शालू कलो पुढें एकवृक्षानें,
चरणरंजना उचित टाकिला लाक्षारस दुसऱ्यानें;
तरुच्या ताज्या कोंबांची जी बरोबरी करितात,
दिसती जीं बाहेर काढिलीं मणिबंधापर्यंत;

अशा करतलीं, अन्यतरूंच्या पासुनि, वनदेवींनीं
वेगवेगळे अलंकार बहु टाकियले देओनी ! * ५

**प्रियंवदा**—( शकुंतलेकडे पाहून ) गडे शकुंतले ! हा देवतांचा प्रसाद म्हणजे पतीच्या घरीं तुला राज्यलक्ष्मीचा लाभ होणार याचा शुभशकुनच समज.

( शकुंतला लाजल्यासारखें करिते )

**पहिला**—गौतमा, चल चल. तीर्थांत स्नान करून वर आलेल्या काश्यप-गुरूजींना ही वनस्पतींनीं केलेली सेवा निवेदन करूं या.

**दुसरा**—ठीक आहे. ( जातात )

**सख्या**—गडे शकुंतले ! अलंकारांचा उपयोग आम्हांला स्वतांला मुळींच ठाऊक नाहीं. चित्रकलेच्या परिचयावरून कोणता कुठें घालावयाचा तेवढी मात्र माहिती आहे. तिच्या धोरणानें हे अलंकार तुझ्या अंगावर घालतों आतां.

**शकुंतला**—या कामांतली तुमची हुषारी मला चांगली ठाऊक आहे !

( दोघी डागिने घालण्याचा अभिनय करितात. )

( नंतर तीर्थांत स्नान करून वर आलेले काश्यपऋषि येतात. )

**काश्यप**—

[ शा. वि. ]

जाते आज शकुंतला म्हणुनिया मी खिन्न झालों मनीं;
चिंतेनें जड दृष्टि, कंठ भरला, बाष्पां बळें दाबुनी;
स्नेहें व्याकुळ होइं यापरि, जरी राहीं अरण्यांत मी.
कन्येच्या विरहें नव्या मग किती व्हावा गृहस्थाश्रमी ? ६

( इकडे तिकडे फिरतो )

**सख्या**—सखे ! अंगावरचें घालून झालें. आतां हा शालू नेस आणि हा शेला अंगावर घे. ( शकुंतला उठून तसें करिते )

---

* याबद्दल दुसरें पद्य—

[ शा. वि. ]

इंदुश्वेत दुकूल मंगल नवें एक्या तरूनें दिलें,
एकानें पदरंजनोचित अशा लाक्षारसा ओपिलें;
अन्यांपासुनि, पल्लवांकुर जणों, आमूल विस्तारलीं,
देवींनीं वनिच्या, अशा करतलीं, सद्भूषणें अर्पिलीं.

**गौतमी**—बाळे ! आनंदाश्रूंनीं दाटलेल्या आपल्या नेत्रांनींच जणो तुला आलिंगन देऊं पाहणारा हा तुझा पिता जवळ आला आहे. त्याला वंदन कर तर.

**शकुंतला**—( लाजून ) बाबा ! तुम्हांला नमस्कार करतें.

**काश्यप**—बाळे !

[ गीति ]

भर्त्याला बहुमत हो ! जसि शर्मिष्ठा ययातिराजाला,
तुजलाहि चक्रवर्ती होवो सुत ! पूरु जेविं हो तिजला. ७

**गौतमी**—भगवन् ! साक्षात् वरच म्हणावयाचा हा ! आशीर्वाद नव्हे.

**काश्यप**—बाळे ! आतांच पूजन केलेल्या यज्ञसंबंधी अग्नींना अशी इकडून प्रदक्षिणा कर पाहूं. ( सगळे फिरतात )

**काश्यप**—( ऋक्छंदाच्या चालीवर आशीर्वाद देतो. )

[ शा. वि. ]

ज्यांना आदरपूर्व वेदिभवतीं शुद्धासनें दीधलीं,
यन्मध्यें समिधा विराजति, तशा बाजूंसि दर्भावली;
हव्याचा मधु गंध जे विखरुनी संहारिती पातक,
ते हे पावन, गे ! करोत तुजला, यज्ञांतले पावक ! ८

बाळे ! चालूं लाग आतां. ( दूर पाहिल्यासारखें करून ) ती शार्ङ्गरवादि मंडळी कोठें आहे ? ( प्रवेश करून )

**शिष्य**—भगवन् ! हे आम्ही येथें आहों.

**काश्यप**—आपल्या बहिणीला वाट दाखवाल कीं नाहीं !

**शार्ङ्गरव**— शकुंतलाताई ! असें इकडून, इकडून.

**काश्यप**—अहो ! जवळ असणाऱ्या तपोवनवृक्षांनो !

[ शा. वि. ]

तान्हेले असतां तुम्ही, मनिं न जी आणी जलप्राशन;
जी खेहें तुमचा न पल्लव खुडी, वांछी जरी मंडन;
पुष्पांच्या पहिल्या बघोनि बहरा उल्हास होई जिला,
ती ही जाय शकुंतला पतिगृहा; द्या सर्व आज्ञा तिला. ९

( कोकिळाचा शब्द कानीं पडल्यासारखें दर्शवून )

[ मंजुभाषिणी ]

वनवासबंधु तरुंनीं मुलीस या,
अनुमोदिलें पतिगृहासि जावया;
पिकशब्द मंजुल निघे तया मिषें
प्रतिभाषणा करिति ते, असें दिसे ! १०

( आकाशवाणी होते )

[ शा. वि. ]

ठायीं ठायिं तडाग, त्यांत नलिनी श्यामा किती शोभती !
छायावृक्षहि चंड ताप सगळा चंडांशुचा वारिती;
धूली पद्मपरागमिश्र, मृदुला; मंदप्रसन्नानिल;
होवो, मार्ग असा, सुखप्रद हिला, साधो हिचें मंगल ! ११

( सगळे आश्चर्यानें ऐकतात )

**गौतमी**—बाळे ! बंधुप्रेम करणाऱ्या या तपोवनांतील देवतांनीं तुला जाण्यास अनुमोदन दिलें आहे बरें ! यांना वंदन कर.

**शकुंतला**—( नमस्कार करते. इकडे तिकडे फिरून प्रियंवदेस ) गडे प्रियंवदे ! आर्यपुत्राच्या दर्शनाविषयीं जरी मी उत्सुक आहें तरी या आश्रमांतून माझा पाय मोठ्या कष्टानेंच बाहेर निघत आहे !

**प्रियंवदा**—तूं तपोवनाला सोडून जाणार म्हणून तुलाच अवघड वाटतें आहे असें नाहीं. तर तुझी ताटातूट लवकरच होणार यामुळें या तपोवनाची देखील तुझ्या सारखीच स्थिति झाली आहे ! पहा;

[ दिंडी ]

मृगी तोंडांतुनि कवल टाकितात, मयूरीही निजनृत्य सोडितात;
पांडुपर्णें वल्लरी गाळितात, जणों दुःखानें अश्रु ढाळितात ! १२

**शकुंतला**—( स्मरण करून ) ही माझी बहीण, लता वनज्योत्स्ना. हिचा निरोप घेतें आतां.

**काश्यप**—हिच्यावर तुझें सख्ख्या बहिणीसारखें प्रेम आहे हें मला ठाऊक आहे. ही पहा ती, इकडे दक्षिणेच्या बाजूला.

**शाकुंतला**—( लतेपाशीं जाऊन ) बाई वनज्योत्स्ने ! जरी तूं आंब्यावर चढली आहेस तरी या बाजूच्या आपल्या शाखारूप बाहूंनीं मला भेट दे. आज-पासून तुझ्या भेटीला मी अंतरणार हो !

**काश्यप**—

[ व. ति. ]

मीं योजिला प्रथमची वर तूजसाठीं,
पुण्यें तयाशिंच पडे अनुरूप गांठी;
हे आम्रसंगत असे नवमल्लिकाही
चिंता हिची, तुशि तुझीहि, न आज राही ! १३

बरें, आतां इकडून अशी वाट चालूं लाग बेटा !

**शाकुंतला**—सख्यांनों, हिला आतां तुम्हां दोघींच्या स्वाधीन करतें बरें !

**सख्या**-पण आम्हांला कोणाच्या हातीं सोंपविलें आहेस तूं ? ( असें म्हणून टिपें गाळतात )

**काश्यप**—अनसूये ! अग तुम्ही तर शकुंतलेला धीर द्यावयाचा ! तें सोडून तुम्हीच उलट अश्रु ढाळतां ! रडूं नको बेटा ! ( सर्व चालूं लागतात )

**शाकुंतला**-बाबा ! ही पहा पर्णकुटीच्या शिंवेवर आमची हरणी गाभण असल्यामुळें हळू हळू चालली आहे. हिची नीटपणे सुटका झाली म्हणजे ती आनं-दाची बातमी देऊन कोणी तरी मजकडे पाठवाल ना ?

**काश्यप**-हें आम्ही विसरणार नाहीं.

**शाकुंतला**-( चालतांना आडखळल्यासारखें दाखवून ) कोण बाई माझ्या लुगड्याला हा लगटतो आहे ? ( मागें फिरून पाहते )

**काश्यप**-बाळे !

[ व. ति. ]

दर्भाग्र यन्मुखिं करी व्रण तीव्र जेव्हां,
सोडीसि त्यावरति इंगुदितैल तेव्हां;
ज्या वाढवीसि तृणधान्य भरोनि तोंडीं,
तो पुत्रतुल्य मृगबाळ न मार्ग सोडी. १४

**शाकुंतला**—बाळा ! आतां तुला सोडून मी जाणार ! माझ्या मागोमाग कशाला बरें येतोस ? तूं जन्मल्याबरोबर आईला अंतरलास. तेव्हांपासून मींच

तुला लहानाचा मोठा केला. आतां मीही तुझ्यापासून दूर झालें ! तरीपण बाबा तुझी काळजी घेतील बरें ! जा बाळा ! परत जा कसा ! ( रडत जाऊं लागते )

**काश्यप—**

[ व. ति. ]

वाहे प्रफुल्ल नयनांतुनि वारिधारा;
ती आवरीं धरुनि धैर्य; बघें पुढारां.
भूमी नतोन्नत, तुला दिसतें न कांहीं;
खालीं वरी तव पदें पडतात पाहीं ! १५

**शार्ङ्गरव—**भगवन् ! आप्तजनाला उदकाच्या तीरापर्यंत पोंचवावें अशी श्रुति आहे.. हें सरोवराचें तीर आलें. तेव्हां या ठिकाणीं आह्मांबरोबर संदेश देऊन आपण मागें फिरावयाचें आतां !

**काश्यप—**तर मग आपण या वटवृक्षाच्या सावलींत जाऊं या.

( सर्वजण थोडें फिरून उभे राहतात. )

**काश्यप—**( स्वगत ) त्या महाभाग दुष्यंताला या प्रसंगाला अत्यंत उचित असा कोणता बरें संदेश पाठवावा ?

**शकुंतला—**( एकीकडे ) सख्यानों ! आपला प्रिय सहचर केवळ कमळ-पत्राच्या आड होऊन दिसेनासा झाल्यामुळें ही चक्रवाकी केवढा आक्रोश करीत आहे ! स्वल्पकालाच्या मानानें माझा वियोग कितीतरी मोठा ! हें अति कठिण दुःख मला कसें सोसवेल बाई !

**अनसूया—**गडे ! असें भलतेंच मनांत आणूं नकोस !

[ साकी ]

रमणाविण हीदेखिल कंठी दुःखदीर्घतर रात्र.
पुढच्या आशेवरि गुरुदुःखहि सोशी मानव-मात्र ! १६

**काश्यप—**शार्ङ्गरवा ! शकुंतलेला पुढें करून त्या राजाला, माझा म्हणून, असा निरोप सांग;

**शार्ङ्गरव—**आज्ञा व्हावी महाराज.

**काश्यप**—

[ गीति. ]

आम्ही संयमधन; तव उच्च कुल; प्रेम ही तसें सहजीं
तुजवरि करि; बंधु न या कारण; हें नीट धरिं मनामाजीं.
इतर जशा चार तुझ्या भार्या तेवींच हेंहि समजावीं;
यापुढतीं भाग्य तिचें! बंधूंनीं गोष्ट ती न बोलावी. १७

**शार्ङ्गरव**—संदेश नीट ऐकिला महाराज!

**काश्यप**—बाळे! तुला आतां थोडा उपदेश करावयाचा आहे तो ध्यानांत ठेव. आम्ही जरी रानांत राहतों तरी लौकिक व्यवहार आम्हांस चांगला कळतो.

**शार्ङ्गरव**—ज्ञानसंपन्न पुरुषांना अगम्य काय असणार!

**काश्यप**—बाळे! येथून पतीच्या घराला गेलीस म्हणजे,

[ शा. वि. ]

सेवीं तूं वडिलांस; वाग सवतींसंगें सखीच्यापरी;
रागानें पतिशीं विरोध न करीं, धिक्कार केला तरी;
होईं दासजनीं उदार; न धरीं तूं आढ्यता वैभवीं;
ऐसी होय वधू जनीं सुगृहिणी, अन्या कुला दूषवी * १८.

का गौतमी! कसा काय उपदेश आहे?

**गौतमी**—सासरीं जाणाऱ्या मुलीला एवढेंच सांगावयाचें असतें. बाळे! हें नीट ध्यानांत ठेव बरें.

**काश्यप**—बाळे! मला व सख्यांना एकदा भेट पाहूं.

**शकुंतला**—बाबा! येथूनच का अनसूया आणि प्रियंवदा परतणार?

**काश्यप**—बाळे! यांनाही (तुझ्यासारख्या) देऊन टाकावयाच्या आहेत. यांना तुझ्याबरोबर तिकडे पाठविणें बरें दिसत नाहीं. गौतमी येईल तुझ्या बरोबर, बरें!

**शकुंतला**—( पित्याला मिठी मारून ) मलयगिरीच्या कड्यावरून उमळून

---

*या अर्धाबद्दल पुढील पाठः—

दासीं होइं उदार फार; न कधीं उन्मत्त हो वैभवीं.
ऐशी थोर पदासि जाय युवती; अन्या कुला दूषवी.

पडलेल्या चंदनाच्या वेलीसारखी तुमच्या अंकावरून मी खालीं आले. आतां परक्या ठिकाणीं जीव धरून मी कशी राहणार बाबा !

**काश्यप**—बाळे ! असा धीर कां सोडतेस ?

[ साकी ]

थोर पतीच्या बहुमानाच्या गृहिणीपदिं बसशील,
मोठ्या कामांमधें सारखी गुंतुनियां जाशील;
पवित्र पुत्रा प्रसवशील मग, रविला जेवीं प्राची,
तदा न गणिशिल पीडा लवहीं, बाळे ! मम विरहाची. १९

( शकुंतला पित्याच्या पायां पडते )

**काश्यप**—माझ्या इच्छेप्रमाणें तुला वैभव प्राप्त होवो !

**शकुंतला**—( सख्यांजवळ जाऊन ) सख्यांनों ! दोघीजणी मला एकदम भेटा बरें !

**सख्या**—( तसें करून ) गडे शकुंतले, यदाकदाचित् राजाला ओळखीची पंचाईत पडली तर त्याच्या नांवाची ही आंगठी त्याला दाखीव हो !

**शकुंतला**—सख्यांनों ! तुमच्या या शंकेनें किनई माझें काळीज धडधडूं लागलें आहे !

**सख्या**—अग भिण्याचें कारण नाहीं. अतिप्रेमामुळें नाहींत त्या शंका येतात झालें ! दुसरें काय ?

**शार्ङ्गरव**—दोन प्रहर उलटले हो ताई ! त्वरा कर आतां.

**शकुंतला**—(आश्रमाकडे तोंड करून) बाबा ! हें तपोवन पुन्हां आतां माझ्या दृष्टीस केव्हां बरें पडेल ?

**काश्यप**—हें पहा,

[ शा. वि. ]

होऊनी बहुकाळ सिंधुवसनापृथ्वीसपत्नी, मुली !
दुष्यंतात्मज, ज्या समान न रथी, स्थापोनि राज्यावरी;
वार्धक्यांत कुटुंबभार सगळा पुत्रावरी टाकुनी
तूं कांतासमवेत येशिल पुन्हा शांताश्रमाकारणी. २०

**गौतमी**—बाळे ! प्रस्थानाची वेळ निघून चालली हो ! पित्याला जाऊं दे

परत आतां. ( काश्यपांस ) कितीही वेळ झाली तरी ही अशीच बोलत राहणार. तेव्हां आपणच परतावें म्हणतें.

**काश्यप**—बाळे ! चालूं लाग बेटा ! आमच्या तपाला यामुळें आडयळा नाहीं का होणार?

**शकुंतला**—( पुन्हा पित्याला आलिंगन देऊन ) बाबा ! तप करून करून तुमचें शरीर अगोदरच किती तरी क्षीण झालें आहे! त्यांत आणखी माझी काळजी वाहून अधिक त्रास करून घेऊं नका हो !

**काश्यप**—( दुःखाचा उसासा टाकून )

[ गीति ]*

उटजद्वारिं उगवला, पूर्वीं नीवारबलि तुवां दिधला,
दृष्टिपुढें असतां तो, शांत कसा होय शोक? सांग मला. २१

बरें; ये बेटा आतां ! तुझा प्रवास सुखकर होवो !

( शकुंतला व तिच्या बरोबरचीं माणसें जातात )

**सख्या**-( शकुंतलेच्या वाटेकडे दृष्टी लावून ) नशीबा ! गेलीच आमची प्रियसखी शेवटीं ! पहा, वनराईच्या आड झालीच ती !

**काश्यप** ( सुस्कारा टाकून ) तुमची धर्माचरणाची मैत्रीण निघून गेली बरें ! आतां दुःख आवरून माझ्याबरोबर चला. हा मी निघालों.

**दोघी**-बाबा ! शकुंतला गेल्यामुळें हें तपोवन किती उदासवाणें दिसत आहे पहा ! त्यांत आतां पाऊल देखील टाकवत नाहीं.

**काश्यप**-हा सगळा प्रेमाचा प्रभाव आहे ! त्याच्यामुळें हें असें दिसतें, दुसरें काय ? ( विचार करीत पुढें चालतांना म्हणतो )

[ इंद्रवंशा ]

*कन्या पराचेंचि असे, अहो ! धन,
आजी तिला भर्तृगृहासि धाडुन,

---

*या अर्थाचें दुसरें पद्य.

[ अनुष्टुभ् ]

कन्या धन पराचेंच, तिला भर्त्या निवेदुनी
निश्चिंत मी, जणों ठेव धन्या परत देउनी !

निश्चिंत झालें अगदींच मन्मन;
ज्याची तया ठेवाचि काय देउन ! २१

( चवथा अंक समाप्त. )

---

# अंक पांचवा.

( आसनावर बसलेला राजा व विदूषक प्रवेश करतात. )

**विदूषक**—( कान देऊन ) मित्रा, संगीतशाळेंत काय चाललें आहे तिकडे अंमळ लक्ष्य दे पाहूं. अस्पष्ट पण गोड व शुद्ध अशा गीतींच्या ( षड्जादिक ) स्वरांचा मिलाफ ऐकूं येत आहे. मला वाटतें, हंसपदिका राणी संगीताचा ( गीति-रागप्रतिपादक वर्णांचा ) अभ्यास करते आहे.

**राजा**-मुकाट्यानें बैस. जरा ऐकूं दे.

( आकाशांत गायन चालतें )

[ गीति ]

नवमधुलुब्धा ! मधुपा ! चुंबुनि मनसोक्त आम्रमंजरिला
केवळ कमळवसतिवरि तुष्ट, कसा विसरलासि वद हिजला ? १

अहाहा ! काय रसाचा प्रवाह चालला आहे या गीतींत !

**विदूषक**—तिच्या पदांतला अर्थ आला का तुझ्या लक्ष्यांत ?

**राजा**—(हंसून) एकवार आमचें हंसपदिकेवर प्रेम होतें. म्हणून तिचा राणी वसुमतीसंबंधानें आम्हांला हा टोमणा आहे ! मित्रा माढव्या ! हंसपदिकेला मीं सांगितलें आहे म्हणून सांग कीं मोठ्या खुबीनें तूं आमची शोभा केलीस बोवा !

**विदूषक**—तुझी आज्ञा प्रमाण. ( उठून ) अप्सरेच्या हातांत सापडलेल्या विरक्ताला जितपत मोक्षाची आशा, तितपतच तिनें परक्याकडून शेंडी धरवून मला मार देण्याची सुरवात केली म्हणजे मलाही मोक्षाची आशा !

**राजा**—जा कीं, अंमळ संभावितपणें तिला निरोप कळीव म्हणजे झालें !

**विदूषक**—काय करावें ? उपाय नाहीं. ( जातो )

**राजा**—अशा अर्थाचें गाणें ऐकून, प्रियजनाचा विरह झाला नसतांही, माझ्या मनाला कां बरें एवढी हुरहुर वाटत आहे ? अथवा,

[ शा. वि. ]

पाहोनी रमणीय वस्तु नयनीं, ऐकोनि रम्य ध्वनि,
एखाद्या समयीं सुखी मनुजही अस्वस्थ होतो मनीं;
याचें कारण अन्यजन्मि घडले संबंध जे सुंदर,
चित्ताला स्मरताति ते, न कळतां, होवोनि भावस्थिर ! २

( असें म्हणून सचिंत होऊन बसतो ).

( नंतर कंचुकी प्रवेश करितो. )

**कंचुकी**—अरेरे ! काय दशा झाली माझी ही !

[ गीति ]

अधिकारचिह्न म्हणुनिच, अंतःपुरि नृपतिच्या, करीं धरिली,
ती यष्टि चालतां मज वृद्धाला सांवरावया सजली ! * ३

अहो ! राजानें न्यायाच्या कामाला विलंब लावणें योग्य नव्हे हें खरेंच. तरी पण, महाराज इतक्यांतच न्यायासनावरून विश्रांतीकरितां उठले आहेत; म्हणून कण्वशिष्यांचें आगमन कळवून त्यांना पुन्हां लागलीच तसदी कशी द्यावी बरें ? अथवा, प्रजानुशासनाचें कामच असें आहे कीं, त्यांत विश्रांतीला अवसरच न हीं ! पहा,

[ व. ति. ]

जोडी रथा रवि तुरंगम एकवार,
वाहातसे पवन संतत सर्वकाळ;
तो भूमिभार शिरिं शेष सदैव वाहे,
षष्ठांशवृत्तिनृपधर्महि हाच आहे. ४

---

* या अर्थाचा दुसरा श्लोक—

[ व. ति. ]

जी राजदंड म्हणुनी धरिली करांत
मागें नृपाल-रमणी-जन-मंदिरांत;
फारां दिनीं, मजसि वार्द्धकिं, तीच आतां
मार्गांत सांवरुनियां धरि, तोल जातां !

तेव्हां आपलें काम बजावलें पाहिजे. ( इकडे तिकडे फिरून व पाहून ) पहा,

[ व. ति. ].

स्वापत्यतुल्यचि जनां परिपालुनीयां
विश्रांतिसाठिं विजनीं नृप बैसला या.
यूथासि हिंडवुनि चंडकरप्रतप्त
नागेंद्र कंदरिं भजे स्थल जेविं शीत. ५

( जवळ जाऊन )

महाराजांचा जयजयकार असो! हिमालयाच्या पायथ्याजवळील अरण्यांत राहणारे कोणी तपस्वी काश्यपमुनींचा संदेश घेऊन आले आहेत. त्यांच्याबरोबर स्त्रियाही आहेत. यावर महाराजांची आज्ञा होईल त्याप्रमाणें.

**राजा**—( आदरानें ) काय? काश्यपमुनींचा संदेश घेऊन आले आहेत?

**कंचुकी**—होय सरकार.

**राजा**—तर सोमरातभट्टांना माझी विनंति कळवा कीं, त्या आश्रमवासी तपस्व्यांची वेदोक्तविधीनें संभावना करून स्वतांच त्यांना मजकडे घेऊन या म्हणून. मीहि इकडे तपस्विजनांचें दर्शन घेण्याला योग्य अशा ठिकाणीं बसून त्यांची वाट पाहतों.

**कंचुकी**—महाराजांच्या आज्ञेप्रमाणें करतों. ( जातो )

**राजा**—( उठून ) वेत्रवति! अग्निशाळेचा मार्ग दाखीव पाहूं.

**प्रतीहारी**—इकडे महाराज, असें इकडे.

**राजा**—( फिरतो व राजाधिकाराविषयीं खेद दाखवून म्हणतो ) प्रत्येक माणूस इष्टप्राप्ति झाली म्हणजे सुखी होतो. परंतु राजाचा मनोरथ पूर्ण झाला तरी शेवटीं त्यांच्या नशीबीं दुःखच ठेविलेलें असतें!

[ व. ति. ]

औत्सुक्य मात्र शमवी उपलब्ध अर्थ,
आयास फार परि तत्परिपालनार्थ.
वारी अतिश्रम न, दे परि कष्ट मोठे,
राज्य स्वहस्तधृतछत्रसमान वाटे. ६

**दोन वैतालिक**—महाराजांचा जयजयकार असो!

पहिला—

[ पृथ्वी. ]

स्वसौख्य न गणोनिया श्रमसि तूं प्रजारंजनीं,
अशीच अथवा तुझी सतत वृत्ति रात्रंदिनीं !
शिरीं अनुभवोनिया सतत भानुचंडातप
प्रशांत करि, सावली करुनि, आश्रितां पादप. ७

दुसरा—

[ मालिनी. ]

कुपथिं नजर टाकी दापिशी त्यासि दंडें,
जनभरणसमर्था ! मोडिशी वादबंडें !
विपुल विभव तेथें ज्ञातिंना काय वाण ?
तुजमधि परि राहे लोकबंधुत्व पूर्ण ! ८

**राजा**—मघां मनाला थकवा वाटत होता. पण आतां थोडा उल्लास वाटत आहे ! ( असें म्हणून फिरतो. )

**प्रतीहारी**—महाराज ! हा पहा अग्निशाळेचा ओटा ! नुकताच झाडून सारवून सुंदर केला आहे. याच्याजवळ कामधेनुही उभी आहे. वर जाऊन बसावयाचें सरकारांनीं !

**राजा**—( वर चढतो व दासीच्या खांद्यावर हात टेकून ) वेत्रपति ! भगवान् कण्वमुनींनीं माझ्याकडे तपस्वी कशाकरतां बरें पाठविले असावे ?

[ शा. वि. ]

कोणी राक्षस कीं तपोनिधितपालागोनि संरोधिती ?
कोणी ताप तपोवनामधिल वा प्राण्यांसि देती अती ?
किंवा मत्कृतपातकें वनलता येती न पुष्पें फलें ?
ऐसे तर्क बहु, न निर्णय मना, तेणेंचि मी गोंधळें. ९

**प्रतीहारी**:—महाराजांच्या सत्कृत्यांनीं आनंदित होऊन महाराजांचें अभिनंदन करण्याकरितां ऋषि आले असावे, असा माझा तर्क आहे.

( नंतर कंचुकी आणि पुरोहित व त्यांच्या मागून शकुंतलेला पुढें करून गौतमीसह मुनि, प्रवेश करितात. )

**कंचुकी**—मुनिवर्यांनो ! इकडे, असें इकडे यावयाचें !

**शार्ङ्गरव**—शारद्वता !

[ शिखरिणी ]

न सोडी मर्यादा बहुविभवशाली नरमणी,
न कोणी वर्णानें अधमहि भजे निंद्य सरणी.
परी एकांताची संवय मजलों नित्य म्हणुनी
* नृसंमर्दें वाटे पतित गृह हें अग्निवदनीं. १०

**शारद्वत**—या नगरांत प्रवेश केल्यापासून तुझी अशी अवस्था झाली हें योग्यच आहे. मी देखील,

[ गीति ]

स्नात कृताभ्यंगाला, शुचि अशुचीला, स्वतंत्र बद्धाला,
जागृत सुप्ताला, गणि तेंवि सुखासक्त येथिल जनाला. ११

**शकुंतला**—( अपशकुन झाल्यासारखें दाखवून ) अग बाई ! माझा उजवा डोळा कां बरें लवतो ?

**गौतमी**—बाळे ! इडापीडा टळो ! अमंगळ पळो ! भर्त्याच्या कुलदेवता तुझें मंगल करोत ! ( इकडे तिकडे चालते )

**पुरोहित**—(राजाकडे बोट दाखवून) अहो मुनिवर्य ! हे पहा आमचे वर्णाश्रमधर्म पाळणारे महाराज ! यापूर्वीच हे न्यायासनावरून उठून आपली वाट पाहात आहेत.

**शार्ङ्गरव**—हे ब्राह्मणवर्या ! ही गोष्ट अत्यंत अभिनंदनीय तर खरीच. परंतु आम्हांला यांत कांहीं नवल वाटत नाहीं. कारण,

[ पुष्पिताग्रा ]

नमति फलभरें तरू वनांत, नवजलसंभृत मेघ लोंबतात.
सुजन विभवें दावि नम्रताची, प्रकृतिच ही उपकारशील त्यांची. ऽ १२

---

* या चरणाबद्दल दुसरा:—जनांच्या दाटीनें उठलि गमते आग सदनीं !

ऽ या अर्थाचा दुसरा श्लोक—

[ द्रु. वि. ]

फलभरें तरु काननिं वांकती, नवजलें घन अंबरिं लोंबती;
न विभवें जनिं उद्धत सज्जुही, उपकृती करि तत्प्रकृतीच ही.

**प्रतीहारी**—ऋषि प्रसन्नवदन दिसत आहेत. तेव्हां माझा तर्क आहे कीं, ते कांहीं तरी स्वस्थपणाचें काम घेऊन आले असावे.

**राजा**—( शकुंतलेकडे पाहून ) पण ही

[ साकी ]

कोण असावी बरें सुंदरी हें न कळे मजला कीं,
अंगकांति न स्पष्ट दिसे बहु, आवरणें तनु झाकी !
पांडुरपल्लववेष्टित कोमल आम्रमंजरी जेवीं,
तपोधनांच्या मंडळांत ही गाला गमते तेवीं. १३

**प्रतीहारी**—ही कोण असावी हें समजण्याची इच्छा खरी. पण तत्संबंधानें कांहींच तर्क चालत नाहींत ! तरी पण, हिची तनु रमणीय असावीशी वाटते.

**राजा**—असो. परक्याच्या स्त्रीकडे निरखून पाहणें योग्य नव्हे!

**शकुंतला**—( हृदयावर हात ठेवून स्वगत ) हृदया, असें भीतीनें कंपित कां होतेस ? आर्यपुत्राचें पूर्वीचें प्रेम लक्ष्यांत ठेवून धीर धर अंमळ !

**पुरोहित**—( पुढें जाऊन ) या तपस्व्यांचा विधिपूर्वक सत्कार केला आहे महाराज ! यांच्या गुरुजींचा कांहीं निरोप आहे. महाराजांनीं तो ऐकावा अशी विनंति आहे.

**राजा**—मी ऐकण्यास सिद्ध आहें.

**ऋषि**—( हात वर करून ) राजन् ! विजयोऽस्तु !

**राजा**—सर्वांना वंदन करतों.

**ऋषि**—इष्टाशीं तुझा समागम होवो !

**राजा**—ऋषिवर्यांनो ! मुनिजनाचीं तपें निर्विघ्न चाललीं आहेत ना ?

**ऋषि**—

[ अनुष्टुभ् ]

सत्तपा विघ्न कोठोनि तूं भूमीप्रति पाळितां ?
तम प्रकट होईल केविं सूर्य प्रकाशतां ? १४

**राजा**—माझें राजपद हें आज सार्थ झालें म्हणावयाचें ! लोकांच्या कल्याणासाठींच ज्यांचें जन्म ते भगवान् काश्यपमुनि कुशल आहेत ना ?

**ऋषि**—सिद्धिसंपन्न पुरुषांचें कुशल त्यांच्या स्वतांच्याच हातांत असतें. कुशलप्रश्नपूर्वक त्यांनीं तुला असें कळवावयाला आम्हांला आज्ञा केली आहे;

**राजा**—काय आज्ञा आहे मुनिवर्यांची ?

**शार्ङ्गरव**—गांधर्वविवाहविधीनें या माझ्या मुलीचें तूं पाणिग्रहण केलेंस ही गोष्ट समजून मला संतोष झाला. हें तुम्हां उभयतांच्या संमतीनें झालेलें कृत्य मला मान्य आहे. कारण;

[ व. ति. ]

मान्यांत मुख्यचि जनीं तुज मानिलाहे;
सत्कृत्यमूर्ति जणुं काय शकुंतला हे;
जोडोनि तुल्यगुण आजि वधूवरांला
निंदेतुनी बहुदिनीं विधि मुक्त झाला ! ऽ १५

म्हणून आतां या गर्भवती पत्नीचा स्वीकार करून तिच्या बरोबर धर्माचरण करावें.

**गौतमी**—आर्या ! मला थोडेसें बोलावेसें वाटतें. वास्तविक मला बोलायला जागाच राहिली नाहीं ! कारण असें,

[ द्रु. वि. ]

*गुरुजनासि हिनें न अपेक्षिलें, नचि तुवांहि तयासि विचारिलें.
तुम्हि परस्पर यापरि वागलां, वदुं अतां हिज, काय तसें, तुला ? १६

**शकुंतला**—( स्वगत ) यावर आर्यपुत्र काय म्हणतो तें पहावें.

**राजा**—हें काय काढलेंत प्रकरण तुम्हीं ?

**शकुंतला**—हें सुरवातीचें बोलणें म्हणजे अग्नीच !

---

* या अर्थाचा दुसरा श्लोक:-

[ मालिनी ]

गरज गुरुजनाची वाटली हीस नाहीं,
नचि मुळिं पुसिलें तद्बांधवांलागि तूंही.
अनुचित तुमचा हा जाहला कारभार,
हिजसि तुजासि तेवीं काय मी सांगणार !

ऽ या अर्थाचा दुसरा श्लोक—

[ द्रु. वि. ]

गणिति मान्य जनीं पहिला तुला, सुकृति मूर्तिमतीच शकुंतला;
जुळवुनी अनुरूप वधूवरां, बहुदिनीं विधि सुयश लाभला !

**शार्ङ्गरव**—आपण स्वतांच चांगले व्यवहारज्ञ असून असें कसें बोलतां हें !

[ वंशस्थ ]

सदा बसे भर्तृमती सती जरी
स्वबंधुगेहीं जन शंकती तरी.
म्हणोनि भर्त्या प्रिय ती असो नसो,
तदास इच्छी पतिगेहिं ती वसो. १७

**राजा**—काय ? हिच्याशीं मीं पूर्वी लग्न लाविलें म्हणतां ?

**शकुंतला**—( खिन्न होऊन स्वगत ) मना ! तुला शंका आली ती उगीच नाहीं बरें !

**शार्ङ्गरव**—

[ गीति ]

कृतकार्यद्वेषास्तव, काय नृपा धर्मविमुखता उचित ?

**राजा**—भलत्याच कल्पना मनांत आणून असा प्रश्न कसा करतां ?

**शार्ङ्गरव**—बहुधा विकार ऐसे माजति ऐश्वर्यमत्त पुरुषांत. १८

**राजा**—हा मोठाच गहजब करीत आहां माझ्यावर !

**गौतमी**—बाळे ! क्षणभर लाज ठेव बाजूला. तुझा बुरखा मी दूर करतें अंमळ. म्हणजे तरी भर्त्याला तुझी ओळख पटेल. ( तसें करते )

**राजा**—( शकुंतलेकडे निरखून पाहून स्वगत )

[ साकी ]

रूप असें हें सतेज सुंदर घरा चालुनी आलें;
पूर्वी स्वीकारिलें न वा हें ? शंकाकुल मन झालें !
प्रभातसमयीं अंतरिं हिम त्या कुंदसुमा अलि जेवीं,
हें भोगाया टाकायाही समर्थ मी नाचि तेवीं ! १९

( विचार करीत बसतो )

**प्रतीहारी**—अहो ! आमच्या महाराजांचा न्यायाविषयीं केवढा पक्षपात हा ! अशा प्रकारचें रूप अनायासें घरीं चालून आलें असतां त्याची विचारणा करीत कोण बसणार आहे यांच्या सारखा !

**शार्ङ्गरव**—का राजा ! बोलत कां नाहींस आतां ?

**राजा**—मुनिवर्यांनों ! मी पुष्कळ आठवण करून पाहतों आहें; पण या बाईचा, पत्नी म्हणून स्वीकार केल्याचें मला, मुळींच स्मरत नाहीं. गर्भाचीं लक्षणें हिच्या ठिकाणीं स्पष्ट दिसत आहेत. तेव्हां मी हिचा पति नसतां उगाच हिचा स्वीकार कसा करूं ?

**शकुंतला**—( स्वगत ) लग्नाविषयींच मुळीं इकडे शंका आहे ! मग आतां उंच उंच मनोरथ गडगडलेच म्हणावयाचे सगळे !

**शार्ङ्गरव**—नकोच करूं !

[ आ. वि ]

कन्या त्वां हरिली, तरी अनुमता झाली मुनीला, पहा;
हा त्याच्या विषयीं त्वदादर महान् आश्चर्यकारी अहा !
चोरा चोरियलीच वस्तु फिरुनी द्यावी धन्यानें जशी
हें कन्याधन चोरिलें तुज मुनी दे, गोष्टि आहे तशी. २०

**शारद्वत**—शार्ङ्गरवा ! आतां पुरें कर बोलणें ! शकुंतले ! आम्हांला काय सांगावयाचें तें आधीं सगळें सांगून टाकलें आहे. हे राजश्री तर असें बोलत आहेत ! याला ओळख पटण्यासारखें कांहीं उत्तर द्यावयाचें असेल तर पहा.

**शकुंतला**—( स्वगत ) पूर्वीच्या प्रेमांत एवढा फरक पडल्यावर आठवण देण्याचा तरी काय उपयोग बाई ! आतां स्वतांबद्दल शोक करीत बसणें एवढेंच माझ्या नशिबांत आहे खचित ! ( उघड ) आर्यपुत्रा ! ( मध्येंच जीभ चावून ) लग्नाविषयींच जेथें शंका तेथें असें संबोधन काय म्हणून ? ( उघड ) पौरवा ! पूर्वीं आश्रमामध्यें स्वभावतां भोळसर अशा या मुलीला वचन देऊन तूं फसविलें. तिला आतां अशा शब्दांनीं धुडकावून देणें तुझ्या सारख्याला शोभतें काय ?

**राजा**—( कानावर हात ठेवून ) शांतम् पापम् ! हें काय ?

[ गीति ]

कां कुल कलुष कराया, इच्छिसि पाडावयास याहि जना ?
कूलंकष सिंधु जशी प्रसन्न सलिला तशीच तटतरुंना. २१

**शकुंतला**—बरें आहे. जर खरोखरच मी परस्त्री आहे अशी शंका घेऊन तूं असें बोलत असशील तर ही पहा आतां खुणेची वस्तु दाखवून तुझी शंका दूर करितें मी.

**राजा**—वा: ! उत्तम युक्ति !

**शकुंतला**--( आंगठीची जागा चांचपून ) आं ! हें काय झालें बाई ! बोटांतली आंगठी कुठें गेली ? ( दुःखानें गौतमीकडे पाहते )

**गौतमी**--शक्रावतारावर शचीतीर्थाला वंदन करीत असतांना तुझ्या बोटां-तून ती गळून पडली यांत कांहीं संशय नाहीं !

**राजा**—( स्मित करून ) वेळ मारून नेण्याच्या कामांत स्त्रिया मोठ्या पटाईत असतात असें म्हणतात तें हें असें !

**शकुंतला**--येथें दैवानें आपलें प्रभुत्व गाजविलें खरें !' दुसरी खुणेची गोष्ट सांगून आपली खात्री करून देतें.

**राजा**—पहाण्याचें आतां ऐकण्यावर आलें एकूण !

**शकुंतला**—हें पहा, एके दिवशीं आपण मोगरीच्या मांडवांत बसलों होतों. तेव्हां कमळाच्या पानांचा, पाण्यानें भरलेला द्रोण, पाणी पिण्याकरतां आपण हातांत घेतला.

**राजा**—हं, चालूं द्या. आमचे कान आहेत तिकडे !

**शकुंतला**--इतक्यांत मीं मुलासारखा मानलेला दीर्घापांग नांवाचा हरिण-बालक जवळ आला. तेव्हां आपल्याला दया येऊन आपण म्हणालां, याला अगो-दर पाणी पिऊं द्या; व त्यानें पाणी प्यावें म्हणून आपण पुढें हात करून त्याला चुचकारून पाहिलें. पण आपली ओळख नसल्यामुळें तो आपल्याजवळ येईना ! पुढें तोच पाण्याचा द्रोण मीं हातांत घेऊन त्याच्या पुढें केला, तेव्हां तो चटकन् पाणी प्याला ! त्यावेळीं आपण थट्टेनें असें म्हणालां कीं जो तो आपल्या जातीवर विश्वास ठेवतो. तुम्हीं दोघेंही अरण्यांतलींच !

**राजा**—कार्यसाधू स्त्रियांच्या असल्या निव्वळ खोट्या पण मोहक शब्दांनीं विषयलंपट लोक मात्र फसतात.

**गौतमी**—हे महाभाग ! हें बोलणें तुला शोभत नाहीं. या मुलीला कपट-हा पदार्थच ठाऊक नाहीं ! कारण, ही तपोवनांत वाढलेली आहे.

**राजा**— अहो वृद्ध तापसीबाई !

[ व. ति. ]

आत्याच धूर्त बहु पक्षिपशुस्त्रियाही,
त्या मानुषी मग किती असतील पाहीं !

अन्यद्विजीं परभृता शिशु पोसवीती
जों अंतरिक्षगमना असमर्थ होती. २२

**शाकुंतला**—( रागानें ) अनार्या ! आपल्या मनावरून दुसऱ्याची परीक्षा करतोस काय ? तृणानें आच्छादिलेल्या कूपाप्रमाणें वरून धर्माचें पांघरूण घेणारा तूं आहेस ! तुझ्यासारख्या अधम कृत्य* करणाराला तोड कुठें मिळणार आहे !

**राजा**—( स्वगत ) हिचा राग खऱ्यासारखा दिसत आहे ! हा माझ्या मनांत संशय उत्पन्न करीत आहे ! कारण;

[ व. ति. ]

झाले कठोर मन फारचि विस्मृतीनें,
एकांतिचा प्रणय होय अमान्य तेणें;
भ्रू मोडि ही मजवरी अतिरक्तनेत्रीं
कंदर्पचाप जणुं कोपभरें सुगात्री ! २३

( उघड ) आर्ये ! दुष्यंताचें चरित्र सगळें जग जाणतें. पण त्याच्या वैऱ्यालाही त्यांत तूं म्हणतेस तसें कांहीं दिसत नाहीं.

**शाकुंतला**—पुरुषांनाच काय ते शास्त्राधार व लोकांची धर्मस्थिति कळते वाटते ? स्त्रिया मात्र निर्लज्ज असून त्यांना कांहीं कळत नाहीं होय ! बरें, तर मग पुरुवंशाच्या नांवावर जाऊन, तोंडांत मध व पोटांत विष, अशा या मनुष्याच्या तावडींत मी सांपडलें ! आणि म्हणूनच मनाला मानेल तसें वागणारी ठरलें ना ! ( पदरानें तोंड झाकून रडूं लागते )

**शार्ङ्गरव**-नाचरेपणानें वागण्याचा असाच तापदायक परिणाम व्हावयाचा !

[ गीति ]

म्हणुनि परीक्षुनि करणें विशेषतां अंतरंगिची मैत्री.
मन नोळखितां करितां ऐशी होते विरोधजनयित्री. २४

**राजा**—अहो ! केवळ ही बाई सांगते तेंच खरें समजून कठोर निंदावचनांनीं माझी निर्भर्त्सना करितां ?

**शार्ङ्गरव**—( सहन न होऊन सगळ्यांस ) अहो ! ऐकलात ना हा उलटा न्याय !

[ शा. वि. ]

जन्मापासुनिया परां फसविणें ज्यालागि ठावें नसे,
त्याचें भाषण अप्रमाण म्हणुनी कीं मानिलें जातसे !
जे कोणी, फसवेगिरी समजुनी विद्याचि, अभ्यासिती,
भूपाला ! जन तेच मानें जगतीं या सत्यवक्ते अती !* २५

**राजा**—अहो सत्यवादी ! घटकाभर तुम्ही म्हणतां तसें कां होईना ! पण या बाईला फसवून आमच्या पदरांत काय पडावयाचें आहे ?

**शार्ङ्गरव**—अधःपात ! दुसरें काय ?

**राजा**—पौरव आणि अधःपाताची इच्छा करणार ! ही गोष्ट कोणालाही खरी वाटणार नाहीं.

**शारद्वत**—शार्ङ्गरवा ! आतां उत्तर देण्यांत हंशील नाहीं. आपण गुरुजींचा निरोप कळविला आहे. परतूं वसे आतां. ( राजाला )

[ अनुष्टुभ् ]

असो; ही तव पत्नीच. घेई वा देइं टाकुनी;
पतीची स्त्रीवरी आहे प्रभुता सर्वरीतिनीं*

गौतमी ! चालू लाग पुढें. ( जाऊं लागतात. )

**शकुंतला**—काय ! या धूर्तानें मला फशी पाडलें ! आणि तुम्हीही सोडून चाललांत ! ( पाठीमागून जाऊं लागते )

---

*या अर्थाचा दुसरा श्लोक—

[ व. ति. ]

जन्मांतही कपटभाव जिला न ठावा
विश्वास तद्वचनिं अल्पहि कीं नसावा ?
विद्येपरी शिकुनि जो शठकर्म साधी,
तो मात्र शिष्टजनसंमत सत्यवादी !

* या अर्थाचा दुसरा श्लोक—

[ अनुष्टुभ् ]

असो. ही तव पत्नीच. त्यागीं आदरिं वा हिला.
स्मृतीनीं पति भार्येचा स्वामी संपूर्ण मानिला.

**गौतमी**—( थांबून ) बाळा शार्ङ्गरवा ! दीनवाणीनें विलाप करीत ही शकुंतला आपल्या मागें येत आहे. पतीनें रागावून हिला धुडकावून लाविलें आहे. तेव्हां माझ्या या पोरीनें करावें तरी काय ?

**शार्ङ्गरव**—( रागानें परतून ) काय ग ए ढालगज पोरी ! स्वतंत्रपणानें वागायला हवें नाहीं का तुला ? ( शकुंतला भीतीनें कांपू लागते. )

**शकुन्तले** ! .

[ व. ति. ]

[1]ह्या सांगतो नृप तशी असशी कुशीला,
तूं स्वैरिणी मग हवीस कशा पित्याला ?
वाटे मनासि जरि वर्तन शुद्ध राहे,
प्राणेशगेहिं तुज दास्यहि योग्य आहे.

उभी राहा. आम्ही चालते होतो. २७

**राजा**—अहो तापसानो ! या बाईला का उगाच आशा लावून फसवितां ?

[ गीति ]

नलिनीलाचि दिनमणी, कुमुदलतेलाचि इंदु, हासवितो;
केव्हांहि जितेंद्रिय नर अन्यस्त्रीसंगविमुख आढळतो. २८

**शार्ङ्गरव**—दुसरीच्या नादीं लागून पूर्वीच्या संबंधाचें वृत्त विसरणारे आपण ! आपणांस अधर्मभीरु कोण म्हणणार ?

**राजा**—( पुरोहितास ) गुरुजी ! दोन गोष्टी उपस्थित झाल्या आहेत. यांतील कमी दोषास्पद कोणती याचा आपण निर्णय करावा.

[ गीति ]

काय मला भूल पडलि ? किंवा ही अनृत बोलते बाला ?
वरं दारत्यागा ? वा परभार्यास्पर्शजनित दोषाला ? २९

**पुरोहित**—( विचार करून ) तर मग मला वाटतें, असें करावें;

1 याच अर्थाचें दुसरें पद्य--

[ द्रु. वि. ]

**नृप वदे तशि तूं असशी जरी, मग कशी कुटला जनका तरी ?**
**मानिसि शुद्धचि वर्तन आपुलें, पतिगृहीं तव दास्यचि चांगलें.**

**राजा**—आज्ञा व्हावी.

**पुरोहित**—या मुलीला प्रसूतीपर्यंत आपल्या घरांत राहूं द्यावें. असें कां म्हणाल तर सांगतों. आपणांस साधूंनीं मागें आशीर्वाद दिला आहे कीं, आपला पहिला मुलगा चक्रवर्ती होईल. या मुनिकन्येला चक्रवर्ति-चिह्नांचा मुलगा झाला तर हिचा आदरपूर्वक स्वीकार होईलच. तसें नाहीं झालें तर हिला हिच्या पित्याच्या घरीं पोंचविणें प्राप्तच आहे.

**राजा**—गुरुजींची इच्छा मान्य आहे.

**पुरोहित**—मुली ! माझ्या मागें चल.

**शकुंतला**—भगवति वसुंधरे ! मला पोटांत ठाव दे ! ( रुदन करीत जाऊं लागते. राजाशिवाय सगळे जातात. शापानें नष्टस्मृति झालेला राजा शकुंतलेविषयीं विचार करीत बसतो. इतक्यांत )

( पडद्यांत )

आश्चर्य ! अहो आश्चर्य !

**राजा**-( ऐकून ) हें काय बरें असावें ? ( प्रवेश करून )

**पुरोहित**-( विस्मयानें ) महाराज ! खरोखर मोठी अद्‌भुत गोष्ट घडून आली बोवा !

**राजा**—ती कोणती !

**पुरोहित**—कण्वशिष्य परतल्यावर

[ व. ति. ]

लावीत बोल अपुल्या नशिबास बाला
लागे रडूं स्वकर लावुनिया कपाळा;

**राजा**—मग पुढें ?

**पुरोहित**—स्त्रीज्योति तीर्थनिकटीं इतुक्यांत आली
घेऊनि तीस उचलोनि अदृश्य झाली ! २०

( सगळे आश्चर्य दर्शवितात )

**राजा**-अहो उपाध्याय ! आम्ही या वस्तूचा या पूर्वींच त्याग करून चुकलों आहों. आतां हिच्या विषयीं उगाच तर्क हवे कशाला ! आपण विश्रांति घ्यावी आतां.

**पुरोहित**-तुझा विजय असो ! ( जातो )

**राजा**—वेत्रवति ! माझा जीव फार थकून गेला आहे ! शयनमंदिराची वाट दाखीव.

**प्रतीहारी**-असें इकडून यावयाचें महाराज ! ( चालूं लागते )

**राजा**—　　　　[ गीति ]

> धिक्कृत मुनिकन्येला वरिलेलें आठवत मला नाहीं.
> विरहाभितप्त मन परि मजला जणुं धीर यावया पाही ! 　　३१

( जातो )

पांचवा अंक समाप्त.

---

# अंक सहावा

( नंतर शहरचा कोतवाल येतो व त्याच्या मागून एका माणसाच्या मुसक्या बांधून त्याला घेऊन दोन शिपाई येतात. )

**दोघे शिपाई**—( त्या माणसाला धक्काबुक्की करून ) अरे ए भामट्या ! ही आमच्या महाराजांची, त्यांचें नांव वरतीं कोरलेली, रत्नाची आंगठी, तुला कोठें सांपडली ? बोल !

**मनुष्य**--( भ्याल्यासारखें लटलट कांपून ) दया करा दादांनो ! मी असलें काम करणारा माणूस नाहीं.

**पहिला शिपाई**--मग काय मोठा सत्पात्र ब्राह्मण समजून तुला ही महाराजांनीं दान केली होय ?

**मनुष्य**—ऐका तरी जरा. मी शक्रावतारीं राहतों. मी जातीचा कोळी आहे.

**दुसरा शिपाई**—अरे चोरा ! आम्ही तुला तुझी जात विचारली होय ?

**कोतवाल**—अरे सूचका ! याला सगळें क्रमाक्रमानेंच सांगूं दे. त्याला उगीच मधें आडथळा करूं नका.

**दोघे शिपाई**—साहेबांचा हुकूम होईल तसें. ( मनुष्याला.) अरे ए बोल.

**मनुष्य**—जाळें, गळ वगैरे साधनांनीं मी मासे धरतों व त्यांवर बायका-पोरांचें पोट भरतों.

**कोतवाल**—( हंसून ) धंदा तर खूप पवित्र आहे बुवा !

**मनुष्य**—साहेब ! असें म्हणूं नका.

[ गीति ]

जें सहज कर्म तें नाचि टाकावें, निंद्यही, असें वदती.
श्रोत्रिय दयामृदुचि, जरि पशुहननकठोर अध्वरीं दिसती. १

**कोतवाल**—बोल, पुढें बोल.

**मनुष्य**—एके दिवशीं मला रोहितजातीचा एक मासा सांपडला. तो चिरून त्याचे तुकडे करीत असतां त्याच्या पोटांत ही रत्नासारखी चमकणारी आंगठी गवसली. पुढें ती विकून टाकण्याकरितां मी चार ठिकाणीं दाखवीत असतां मला दादांनीं धरलें ! आतां डोकें तोडा कीं सोडा. आंगठी माझ्याकडे आली ती अशी आली बघा !

**कोतवाल**—जानुका ! याच्या अंगाला कच्च्या मासाची कोण घाण येते आहे रे ! हा सुसरखाऊ कोळीच आहे यांत संशय नाहीं ! आंगठी याच्या हातीं कशी आली याचा मात्र चांगला शोध लावला पाहिजे. चला तर राजवाड्या-कडेसच जाऊं.

**दोघे शिपाई**—जी साहेब ! ( कोळ्याला ) अरे ए खिसेकापू ! चल, पुढें हो.

( सर्वजण इकडे तिकडे फिरतात. )

**कोतवाल**—सूचका ! येथें देवडीवर, याच्यावर सावधगिरीनें नजर ठेवा. तोंपर्यंत मी ही आंगठी कशी मिळाली याची हकीकत महाराजांच्या कानावर घालून त्यांचा काय हुकूम होईल तो घेऊन परत येतों.

**दोघे शिपाई**—आपण खुशाल जावें. महाराजांची आपणांवर महात्कृपा होवो ! ( कोतवाल जातो. )

**पहिला शिपाई**—काय रे जानुका ! कोतवालसाहेबांना यावयाला एवढा उशीर कां बरें लागला ?

**दुसरा शिपाई**—अरे ! राजेलोकांची भेट एकदम होत नसते. संधी साधून ती घ्यावी लागते.

**पहिला शिपाई**—वधाच्या वेळीं घालावयाच्या फुलमाळा याच्या गळ्यांत अडकवण्याकरितां माझे हात कसे फुरफुरत आहेत गड्या !

( कोळ्याकडे बोट दाखवितो. )

**मनुष्य**—विनाकारण मला गरीबाला मारण्याची गोष्ट नका मनांत आणूं दादा !

**दुसरा शिपाई**—( पाहून ) अरे ! हे पहा आपले धनी कोतवालसाहेब ! महाराजांचें आज्ञापत्रक हातांत घेऊन इकडेसच ते येत आहेत ! ( कोळ्याला ) आतां तू गिधाडाच्या, नाहीं तर कुत्र्यांच्या, भक्ष्यस्थानीं पडणार !

( प्रवेश करून )

**कोतवाल**—सूचका ! या कोळ्याला सोडा ! याची आंगठी मिळाल्याची हकीकत अगदीं खरी ठरली !

**सूचक**—हुकूम साहेब ! हा मृत्यूच्या दाढेतून बाहेर निसटला म्हणावयाचा !

( कोळ्याला मोकळें करितो )

**मनुष्य**—( कोतवालाला रामराम करून ) काय साहेब ! कसा काय आमचा धंदा ? बोला आतां !

**कोतवाल**—महाराजांनीं आंगठीच्या किंमतीचे हे पैसेही तुला देण्याचा हुकूम केला आहे ! कोळीदादा; हे घे ते पैसे ! ( पैसे देतो )

**मनुष्य**—( राम राम करून पैसे घेतो. ) साहेब ! केवढी मेहेरबानी मज-वर ही !

**सूचक**—सुळावरचा उतरून हत्तीवर चढविला कीं याला ! याला म्हणावें राजाची कृपा !

**जालुक**—कोतवाल-साहेब ! या बक्षिसावरून असें दिसतें कीं ती आंगठी महाराजांना फार बिनमोल वाटत असावी.

**कोतवाल**—आंगठीवरील रत्नाच्या मोलाचें महत्त्व महाराजांना वाटलें

आहे असें नाहीं मला वाटत. ती दृष्टी पडतांक्षणींच कोणा तरी इष्ट माणसाची त्यांना आठवण झाली असें वाटतें; आणि म्हणूनच, महाराजांचा स्वभाव जातीचा गंभीर असूनही, त्यांचे डोळे पाण्यानें भरून आले !

सूचक—मग धनीसाहेबांनीं महाराजांची मोठीच कामगिरी बजावली म्हणावयाची !

जानुक—अरे ! या कोळ्यांच्या नायकाकरितां, असें म्हण कीं !

( कोळ्याकडे आशाळभूतपणानें पाहतो. )

मनुष्य—दादानों ! यांतले अर्धे पैसे तुमचे हो ! उगाच फूल ना फुलाची पाकळी म्हणून देतों !

जानुक—आतां ठीक जमलें !

कोतवाल—कोळीदादा ! तुम्ही आमचे बडे दोस्त झालां आतां कीं ! आपली पहिली मैत्री दारूच्या साक्षीनें कायम झाली पाहिजे ! चला तर सगळेच गुत्याकडेस ! ( सगळे जातात. )

( नंतर आकाशमार्गानें सानुमतीनांवाची अप्सरा प्रवेश करिते. )

सानुमती—अप्सरस्तीर्थावर साधुजनाचीं स्नानें होईपर्यंत तेथें राहण्याची माझी आजची पाळी होती. तें काम मीं आटपून टाकलें आहे. आतां त्या राजर्षीची बातमी काय आहे ती प्रत्यक्ष काढतें. मेनकेच्या नात्यामुळें शकुंतलेविषयीं मला आपलेपणाच वाटतो. तिनेंही आपल्या मुलीकरितां हें काम माझ्याकडेस सोंपविलेंच आहे. ( सभोंवतीं पाहून ) या वसंतऋतूंत जिकडे तिकडे उत्सव सुरू असावयाचा. असें असून राजवाड्यांत उत्सवाची कांहींच गडबड नाहीं हें कसें ? अंतर्ज्ञानानें हें सर्व जाणण्याचें मला सामर्थ्य आहे. पण सखीनें आगत्यानें सांगितलेलें काम प्रत्यक्ष जाऊनच केलें पाहिजे. या दोन बाया बागेची रखवाली करीत आहेत. त्यांच्या बाजूला तिरस्करिणी विद्येच्या बळानें गुप्त उभी राहून बातमी काढतें. ( आकाशांतून खालीं उतरल्यासारखें दाखवून उभी राहते ! ( नंतर ह्याच्या मोहोराकडे पहात पहात एक उद्यानपालिका प्रवेश करिते व तिच्या मागोमाग दुसरी एक येते. )

पहिली—( नरजन्मामाजिं या चालीवर. )

थोडा हिरवा, फिक्कट, तांबुस दिससि आम्रमोहरा !

वसंतप्राणाचे गमसी खरा.

मधुमासाच्या मंगलदूता ! प्रसन्न हो मजवरी,
प्रार्थना मी तुजला ही करीं. २

**दुसरी**—परभृतिके ! आपल्याशींच काय ग पुटपुटते आहेस ?

**पहिली**—मधुकरिके ! आम्रकलिका पाहून परभृतिका उन्मत्त व्हावयाचीच !

**दुसरी**—( ईर्ष्येनें व त्वरेनें जवळ जाऊन ) काय ? मधुमासाला आरंभ झाला !

**पहिली**—बाई मधुकरिके ! तुझे हे आतां दिवसच आहेत मत्त होऊन गाण्याच्या रंगांत दंग असण्याचे !

**दुसरी**—गडे ! मला धर पाहूं, म्हणजे चवड्यावर उभी राहून मी आंब्याचा मोहोर तोडून कामदेवाची पूजा करतें.

**पहिली**—पण पूजेचें अर्धे पुण्य माझ्या पदरांत पडेल तर !

**दुसरी**—तें तर न सांगतांही मिळेल. कारण, तुझा व माझा जीव एक, देह मात्र दोन ! ( सखीला धरून उभी राहते आणि आंब्याचा मोहोर खुडूं लागते ) अग ! मोहोर चांगला फुलला नाहीं तरी देठापासून खुडल्यामुळें याला किती मनोहर वास येत आहे ? ( हात जोडून )

[ व. ति. ]

ज्यानें करीं धरियलें धनु सज्य पाहीं,
आम्रांकुरा ! तुज तया मदनासि वाहीं.
रोखोनिया धरिं तयां पथिकांगनांला,
पांचा शरांत मिळवीं पहिल्या पदाला. ३

( असें बोलून मोहोर फेकते. ) ( एकदम पडदा सारून रागानें )

**कंचुकी**–अग ए मूर्ख पोरी ! खबरदार ! महाराजांनीं वसंतोत्सवाला मनाई केली आहे. असें असतां तूं आंब्याचा मोहोर तोडण्याचें काम आरंभलें आहेस ?

**दोघी**—दादा ! दया करा ! रागाऊं नका ! आम्हांला हें ठाऊक नाहीं.

**कंचुकी**—या वसंतऋतूंतील झाडांनीं, तसाच त्यांच्यावर बसणाऱ्या पांखरांनीं सुद्धां, महाराजांचा हुकूम पाळला ! आणि तो तुम्हांला कळला नाहीं काय ?

[ शा. वि. ]

आम्राला फुटली कधींच कलिका, ना ती विकासे परी;
देठांतूनि सुटे, तरी न फुलते अद्यापि चांफेकळी;
संपे शीत ऋतू, तरी न खुलला, त्या कोकिलांचा स्वर;
मार्गे घेइ, जगो भयें, मदनही, ओढीयलेला शर ! ४

सानुमती—यांत कांहीं शंका नाहीं. या राजाचें सामर्थ्यच असें आहे !

पहिली—दादा ! राजश्यालक मित्रावसूनीं आम्हांला राणीसाहेबांच्या चरण-सेवेला पाठविल्याला थोडेच दिवस झाले; आणि या प्रमदवनावर नजर ठेवण्याचें कामही आमच्यावर नुकतेंच सोंपविलें आहे. म्हणून ही बातमी आमच्या कानावर यापूर्वी आली नाहीं.

कंचुकी—बरें आहे. पण पुन्हां मात्र असें करतां कामा नये !

दोघी—बरें पण दादा ! महाराजांनीं वसंतोत्सवाला मनाई कां केली हें समजण्याची आम्हांला उत्सुकता आहे. आम्हांला सांगण्यासारखें असेल तर सांगा दादा !

सानुमती—मनुष्यमात्राला उत्सव प्रिय असतो. तेव्हां कांहीं तरी तसेंच कारण असल्याशिवाय उत्सवाला मनाई केली नसावी !

कंचुकी—हें तर सगळीकडेच झालें आहे ! सांगायचें नाहीं काय म्हणून ? शकुंतलेला महाराजांनीं झिडकारून परत लावून दिली हा प्रवाद तुमच्या कानावर आला नाहीं वाटतें ?

दोघी—आंगठी महाराजांच्या दृष्टीस पडली; एथपर्यंतची बातमी राजश्यालकाच्या तोंडून समजली आहे.

कंचुकी—मग थोडेंच उरलें आहे सांगावयाचें ! जेव्हां स्वतांची आंगठी दृष्टीस पडली तेव्हां आपण शकुंतलेशीं पूर्वी गुप्तपणें विवाह केला असून स्मृतिभ्रंशामुळें आपण तिला टाकलें या गोष्टीचें त्यांना स्मरण झालें; व तेव्हांपासून त्यांना पश्चात्ताप वाटूं लागला आहे ! यामुळें

[ शा. वि. ]

द्वेषी सुंदर वस्तु तो; प्रतिदिनीं भेटे न पूर्वीपरी
मंत्र्यांना; गतनिद्र कंठि रजनी लोळोनि शय्येवरी;

दाक्षिण्यें बहु योग्य शब्द वदतां अंतःपुरींच्या जना
घेवोनी भलतेंच नांव विरमे ! वाटोनि लज्जा मना. ५

**सानुमती**—वाः; मला हवी तीच गोष्ट झाली !

**कंचुकी**—असें मन फार अस्वस्थ झाल्यामुळें महाराजांनीं उत्सवाला बंदी केली आहे.

**दोघी**—आतां जुळलें !

( पडद्यांत )

यावें, यावें आपण !

**कंचुकी**—( कान देऊन ) बायांनों ! महाराज इकडेसच येत आहेत ! जा आपल्या कामाला कशीं !

**दोघी**—बरें आहे दादा ! ( जातात )

( नंतर पश्चात्तापाला योग्य असा वेष केलेला राजा तसेच विदूषक व प्रतीहारी प्रवेश करतात )

**कंचुकी**—( राजाकडे पाहून ) अहाहा ! मोठीं माणसें कोणत्याही स्थितींत किती तरी गोड दिसतात ! महाराज इतके खिन्न आहेत तरी सुंदरच दिसतात ! पहा,

[ शा. वि. ]

*सारी:दूर विशेष मंडन; धरी हातांत डाव्या कडें
सोन्याचें; अधरासि पांडुरपणा श्वासातपानें जडे;
चिंताजागरणें प्रताम्र नयनें; तेजःप्रभावामुळें,
लाभे ज्या उजळा अशा मणिपरी, हा क्षीणही, नाकळे ! ६

**सानुमती**—( राजाला पाहून ) आपणास घालवून देऊन अपमान केला

---

* याच अर्थाचीं पद्यें:—

[ दिंडी ]

वलय डाव्या करिं मात्र कांचनाचें, इतर मंडनविधि सोडियले साचे,
श्वास विरहें टाकितो महाभाग, उष्ण, तेणें अधरासि पांडुराग;
झोंप येईना प्रियाचिंतनानें, लाल झालें बहु नयनयुगुल तेणें,
क्षीण तरि, तेजें तसा दिसत नाहीं, मणी उजळा सारिला जेवि पाहीं.

तरी देखील शकुंतला याच्या करितां झुरत आहे ती कांहीं उगाच नाहीं !

**राजा**—( चिंतन करीत इकडे तिकडे फिरतो. )

[ गीति ]

निजलेंचि हृदय पूर्वी, जरि म्हटली त्या मृगाक्षि बोधाया;
तें मन्दभाग्य आतां उठलें अनुतापदुःख सोसाया ! ७

**सानुमती**—बिचारीच्या नशीबांतच असल्या गोष्टी लिहिलेल्या !

**विदूषक**—( एकीकडे ) शकुंतलेच्या रोगानें पुन्हां या स्वारीला पछाडलें वाटतें ! कोणत्या उपायाची योजना केल्यानें याचा हा रोग दूर करितां येईल कोण जाणे !

**कंचुकी**—( जवळ जाऊन ) महाराजांचा जयजयकार असो ! महाराज ! प्रमदवनांतील सगळीं ठिकाणें मीं तपासून आलों ! तरी इच्छेप्रमाणें महाराजांनीं कोणत्याही करमणुकीच्या ठिकाणीं जाऊन बसावें.

**राजा**—वेत्रवति ! अमात्य आर्यपिशुन यांना मीं सांगितलें आहे म्हणून सांग, कीं रात्रीं आम्हांला फार जागरण झाल्यामुळें आज न्यायासनावर बसून कामकाज पाहणें आम्हांला होणार नाहीं. नगरांतील लोकांच्या कामकाजांचे आपण केलेले निवाडे असतील ते इकडे लिहून पाठवून द्यावे.

**प्रतीहारी**—जी सरकार ( जाते. )

**राजा**—वातायना ! तूंही आपल्या कामाला लाग जा !

**कंचुकी**—महाराजांची आज्ञा प्रमाण. ( जातो )

**विदूषक**—मित्रा ! तूं तर येथें चिटपाखरूं सुद्धां राहूं दिलें नाहींस ! हा पहा प्रमदवनाचा भाग. हा थंड असून उन्हाचा ताप नसल्यामुळें आनंद-दायक आहे. येथें बैस म्हणजे मनाची करमणूक होईल.

**राजा**—'संधि सांपडण्याचा अवकाश कीं संकटें उभीं !' असें म्हणतात तें कांहीं कधीं खोटें ठरावयाचें नाहीं. कां म्हणशील तर,

[ द्रु. वि. ]

मुनिसुताप्रणयस्मृति जो हरी, प्रबल मोह असा पळतो दुरीं,
मदन सज्जचि तों धनु घेउनी प्रहरणा, शरमोहर योजुनी ! ८

**विदूषक**—थांब जरा ! या सोडग्यानें कंदर्पबाणाचा दर्प नाहींसा करून टाकतों ! ( काठी उचलून मोहोर झोडपण्याचा आविर्भाव करतो. )

**राजा**—( हंसून ) पुरे पुरे ! पडला ब्रह्मतेजाचा प्रकाश ! बरें पण मित्रा ! आपण येथें कोठें बरें बसावें म्हणजे किंचित् माझ्या प्रियेसारख्या दिसणाऱ्या या लतांकडे पहात डोळ्यांची करमणूक होईल ?

**विदूषक**—अरे ! आपल्या तैनातींतल्या चतुरिकादासीला नाहींका निरोप देऊन पाठविलीस कीं या माधवीमंडपांत ही वेळ मी घालविणार आहें; तेव्हां मीं आपल्या हातानें चित्रफलकावर शकुंतलेचें चित्र काढिलें आहे तें इकडे घेऊन ये म्हणून ?

**राजा**—मित्रा ! मनाच्या करमणुकीला असेंच स्थान पाहिजे, तिकडेसच चल पाहूं.

**विदूषक**-मित्रा ! असें इकडे यावयाचें !

( दोघे फिरतात; सानुमती त्यांच्या मागें चालते )

**विदूषक**—हा पहा माधवीमंडप ! यांत रत्नखचित पाषाणाचा चौथरा मांडला आहे. सुंदर पुष्पफलपल्लवरूप उपहारांनीं तो स्वागतची तयारी करून आपली जणूं काय वाट पहात आहे ! तेव्हां आंत प्रवेश करून बैस मित्रा !

( दोघेही आंत जाऊन बसतात )

**सानुमती**—या लतेचा आश्रय करून मी माझ्या सखीची तसबीर पाहतें अगोदर. मग तिला सांगेन तुझ्यावर तुझ्या पतीचें अनेक प्रकारांनीं व्यक्त होणारें प्रेम किती आहे तें. ( लतेचा आश्रय करून उभी राहते )

**राजा**—मित्रा ! आतां शकुंतलेची पहिली सगळी हकीकत आठवली गड्या ! आणि तुला मीं ती एकदां सांगितली आहेच. परंतु मीं तिला झिडकारून घालवून दिलें तेव्हां तूंही माझ्याजवळचा नाहींसा झालास ! पण काय रे ! त्याच्या पूर्वी तरी तूं कधीं तिचें नांव काढलें नाहींस, हें कसें ? कीं, माझ्या सारखा तुलाही तिचा विसरच पडला ?

**विदूषक**—मी कसा विसरेन ? पण सगळें सांगितल्यावर पुन्हां तूंच मला शेवटीं सांगितलेंस कीं, ही सगळी थट्टा आहे, यांतलें कांहीं एक खरें समजूं नको म्हणून ! मी काय ? मातीच्या ढेकळासारखा जडबुद्धि ! तेंच खरें धरून बसलों ! अथवा, भवितव्यतेपुढें कोणाचें चालत नाहीं, हेंच खरें.

**सानुमती**—असेंच खरोखर हें.

**राजा**—( चिंतन करून ) मित्रा ! मला यांतून कसें तरी सोडीव बाबा !

**विदूषक**—मित्रा ! अरे हें काय करतोस ! तुला हें खचित शोभत नाहीं ! थोर पुरुष शोकाच्या स्वाधीन कधीं होत नाहींत ! वादळांत देखील पर्वत डगमगत नाहींत !

**राजा**—मित्रा ! मीं अपमानानें परत घालवून दिल्यामुळें प्रियेच्या मनाला फार दुःख झालें तेव्हांची तिच्या मनाची अवस्था मनांत येऊन मी अगदीं व्याकुळ होऊन गेलों आहें ! कारण,

[ स्रग्धरा ]

बाला धिक्कारितां ती इथुनि निजजनामागुनी जाऊं पाहे,
गर्जोनी तैं तियेला गुरुसम वदले शिष्य, 'हां एथ राहें !'
बाष्पौघें रुद्ध दृष्टी, अकरुण जनिं या, टाकि ती या प्रसंगीं;
दाही ती गोष्ट भारी ! घुसुनि विषयुता शल्यशी अंतरंगीं. ९

**सानुमती**—अग बाई ! माणसाचा किती तरी आपलपोटा स्वभाव असतो ! या राजाला ताप होत आहे पण त्यामुळें मला उलट आनंदच वाटत आहे !

**विदूषक**—मित्रा ! माझा तर्क असा आहे कीं, कोणीं तरी आकाशसंचार करणारानें शकुंतलेला नेलें असावें.

**राजा**—त्या पतिव्रतेला स्पर्श करण्याला परक्याची छाती कशी होईल ? हें पहा, माझ्या ऐकण्यांत असें आहे कीं, मेनका तुझ्या सखीची जननी. तेव्हां मेनकेच्या मैत्रिणींनी तुझ्या सखीला नेलें असावें, असा माझा तर्क वाहतो.

**सानुमती**—याच्या मनाला भूल पडावी हीच आश्चर्याची गोष्ट आहे ! हा आतां पुन्हां वृत्तीवर आला यांत कांहीं मोठेसें नाहीं.

**विदूषक**—असें आहे तर कांहीं काळानें तिचा समागम होईल यांत संशय नाहीं.

**राजा**—तो कसा ?

**विदूषक**—आईबापांना पतिविरहानें कष्टी झालेली आपली मुलगी फार दिवस पाहवत नाहीं !

**राजा**—मित्रा !

[ नरजन्मामधिं० या चालीवर ]

स्वप्न, मतिभ्रम, तीं भुरळचि, वा पुण्यसंपदा भली,
आपुलें फल देउनि संपली !
गेलें तें नाचि येइल पुनरपि रूप ! मनोरथ मम
निष्फल, प्रपातांचिया सम. १०

**विदूषक**—छे छे ! असें नाहीं. भेट व्हावयाची असेल तर ती अकल्पित रीतींनें कशीही होणारच. याला उदाहरण या आंगठीचेंच. दूर कशाला जावयाला हवें ?

**राजा**—( आंगठीकडे पाहून ) अरेरे ! ही आंगठी आयासानें मिळविलेल्या स्थानापासून भ्रष्ट झाली, यामुळें इची स्थिति किती अनुकंपनीय झाली आहे !

[ पृथ्वी ]

तुझें सुकृत मुद्रिके ! परम अल्प माझ्यापरी
फलावरुनि कल्पना मजसि होय ही अंतरीं.
सुरक्त नखरीं तिच्या अतिमनोरमा अंगुली,
तयांवरति बैसुनी पतन पावसी तूं जलीं ! ११

**सानुमती**—दुसऱ्या कोणाच्या हातीं पडली असती तर ही खरोखरच शोचनीय झाली असती.

**विदूषक**—मित्रा, ही आपल्या नांवाची आंगठी तिच्या बोटांत तूं कोणत्या प्रसंगीं घातलीस ?

**सानुमती**—माझ्याप्रमाणें यालाही तीच गोष्ट जाणण्याची उत्सुकता आहे !

**राजा**—ऐक; आपल्या राजधानीकडे जावयाला मी निघालों तेव्हां प्रिया डोळ्याला पाणी आणून मला म्हणाली, 'तिकुडली बातमी आतां मला किती दिवसांनीं येईल ?'

**विदूषक**—बरें मग ?

**राजा**—तेव्हां ही आंगठी तिच्या बोटांत घालतां घालतां मीं तिला म्हटलें,

[ मन्दाक्रान्ता ]

माझें मुद्राक्षर गणित जा प्रत्यहीं एक एक,
या रीतीनें करित गणना अंतिं जातांच देख,
माझा कोणी परिजन इथें येउनी आश्रमास
ने नेईल प्रियसखि ! तुला जाण अन्तःपुरास. १२

आणि त्याचीही भूल पडून या पाषाणहृदयानें तेवढेंही केलें नाहीं !

**सानुमती**— दिली तरी भेटीचा योग सुंदर होता ! पण मेलें दुर्दैव आडवें पडलें ना मधें !

**विदूषक**—बरें पण, कोळ्यानें कापलेल्या रोहितमाशाच्या पोटांत रे ती कोणीकडून गेली ?

**राजा**—शचीतीर्थाला वंदन करीत असतां तुझ्या सखीच्या हातांतून ती गंगाप्रवाहांत गळून पडली !

**विदूषक**—आतां जुळलें !

**सानुमती**—तरीच या अधर्मभीरु* राजर्षीला बिचाऱ्या शकुंतलेशीं आपण केलेल्या विवाहाविषयीं शंका उत्पन्न झाली ! हें सारें ठीक. पण एवढें प्रेम असतां खुणेसाठीं हा अडून बसला हें कसें बाई !

**राजा**—या आंगठीलाच फजीत केलें पाहिजे आतां !

**विदूषक**—( स्वगत ) ही स्वारी लागली वेड्यासारखी भकायला आतां !

**राजा**—

[ पृथ्वी ]

जया मधुर कोमला बहु विराजती अंगुली,
त्यजोनि कर तो कशी जलिं तुवां उडी घेतली ?
खरेंच अथवा, कसा गुण अचेतनाला कळे ?
परी प्रथम मींच कां प्रियतमेसि धिक्कारिलें ? १३

**विदूषक**—( स्वगत ) भुकेनें माझा प्राण घेतला बोवा !

**राजा**—प्रिये, मीं विनाकारण तुझा त्याग केला ! त्यामुळें माझ्या मनाला मोठा ताप होत आहे. म्हणून फिरून एकवार दर्शन देऊन मजवर दया कर.

( एकदम पडदा सारून हातांत चित्राची फळी घेऊन चतुरिका येते. )

**चतुरिका**—हें राणीसाहेबांचें चित्र महाराज ! ( चित्रफलक दाखविते. )

**विदूषक**—( पाहून ) सुंदर रीतीनें अवयव रेखाटल्यामुळें हिच्या प्रेमभावाचा उठाव यांत बहारीचा दिसत आहे ! चित्राच्या उंचनीच भागांवर माझी दृष्टि जणूं काय अडखळत आहे !

**सानुमती**—अहाहा ! राजर्षींच्या चित्रकलेचें केवढें कौशल्य हें ! सखी अगदीं माझ्या समोर उभी आहे असें वाटते !

राजा--

[ अनुष्टुभ् ]

जें जें चित्रामधें न्यून तें तें पूर्ण करीतसें;
तरी अल्पांशेंचि तिचें लावण्य उठलें दिसे. १४

सानुमती--पश्चात्तापानें वृद्धिंगत झालेल्या प्रेमाला व विनयाला हें साजेसेंच आहे.

विदूषक--अरे मित्रा ! यांत तर तिघीजणी दिसतात. या सगळ्याच सुंदर आहेत ! यांत तुझी प्रियसखी कोणती ?

सानुमती--अशा रूपाची याला पारख नाहीं ? मग याला डोळे असून नसून सारखेच म्हणावयाचे !

राजा--यांत तू कोणाला शकुंतला समजतोस पाहूं बरें ?

विदूषक--पाणी शिंपल्यामुळें ज्याचे कोमल पल्लव तुळतुळीत दिसत आहेत अशा आंब्याच्या झाडाच्या बाजूला थोडी थकल्यासारखी होऊन उभी राहिलेली, वेणीची गांठ ढिली झाल्यामुळें तिच्यांतलीं फुलें गळून पडलेली, मुखावर घर्मबिंदु असलेली, दोन्ही बाहू अगदीं गळून गेलेली, अशी जी ही दिसत आहे ती शकुंतला. दुसऱ्या दोघी तिच्या सख्या; अशी माझी कल्पना आहे.

राजा--मोठा चतुर परीक्षक आहेस बोवा ! या चित्रांत माझ्या सात्त्विक भावांचेंही चिह्न दिसत आहे. पहा !

[ गीति ]

स्विन्नांगुलिवा दिसतो चित्रप्रांतींच अंक बहु मलिन;
गालावरि पडलेला अश्रु दिसे वर्णबिंदु वरि उठुन ! १५

चतुरिके ! हें करमणूकीचें साधन अर्धवटच राहिलें आहे. जा; कुंचली घेऊन ये.

चतुरिका--मधुभटजी ! मी येईपर्यंत ही फळी धरून ठेवा बरें तुम्ही.

राजा-- मींच ती धरतों. ( तसें करितो ) ( चतुरिका जाते. )

राजा--( सुस्कारा टाकून. )

[ व. ति. ]

साक्षात् प्रिया अवाळें पातलि धाकधीली,
चित्रांतली मजसि हे बहु मान्य झाली !

मार्गी तुडुंब भरल्या त्यजुनी नदीला
वांछी सख्या खचित मी मृगतृष्णिकेला ! १६

**विदूषक**—( स्वगत ) ही स्वारी आतां नदी ओलांडून मृगजळाकडे धावली आहे ! ( उघड ) मित्रा ! या चित्रांत आणखी काय काय काढावयाचें आहे रे !

**सानुमती**—माझ्या सखीला जीं जीं स्थळें आवडतात तीं तीं याच्या मनांत काढावयाचीं असतील.

**राजा**—

[ साकी ]

हंसदंपती स्वस्थ विहरती पडुनि जिच्या पुलिनांत,
काढावयाची नदी मालिनी ती, अजुनी चित्रांत,
तिच्या भोंवतीं प्रदेश पावन गौरीच्या जनकाचे,
हरिण जयांमधिं सुखें बैसले, तेही दावायाचे;
मृगी खाजवी कृष्णमृगाच्या शृंगिं वामनयनाला,
काढिन ती तळिं तरुच्या, ज्यावरि लोंबति वल्कलमाला ! १७

**विदूषक**—( स्वगत ) मला वाटलें कीं हा लांब दाढ्यांच्या जटाळ्यांनीं हें चित्र भरून काढणार सगळें !

**राजा**—मित्रा ! शकुंतलेच्या आवडीचा दुसरा एक अलंकार आहे तो यांत दाखवायचा राहिला !

**विदूषक**—तो कोणचा मित्रा !

**सानुमती**—तिच्या आश्रमांतील वास्तव्याला, सुकुमारपणाला व विनयाला शोभेल असाच कांहीं तरी असला पाहिजे.

**राजा**—

[ शा. वि. ]

ज्याचे सुंदर तंतुजाल सखिच्या गालावरी लोंबलें
तें कर्णावरलें शिरीष अजुनी चित्रीं न म्यां काढिलें.
तेवीं कोमल शारदेन्दुकरसे पद्मांतले केसर
जे मीं ठेवियले स्तनांतरि, न त्यां येथें दिलेलें स्थल. १८

**विदूषक**—पण मित्रा ! तांबड्या कमळाच्या दलासारख्या तळहातानें आपले

मुख आच्छादून ही चित्रकल्यासारखी कां बरें उभी राहिली आहे ? ( कान लावून पाहतो) अरे ! फुलांतला रस चोरणारा हा रांडलेक भुंगा आमच्या मित्राच्या प्रियसखीच्या मुखकमलावर तुटून पडत आहे !

**राजा**–अरे ! या धटिंगणाला हाकून देशील कीं नाहीं ?

**विदूषक**–उन्मत्तांना शिक्षा देण्याचें काम तुझें आहे बाबा ! तूंच याला घालवून देण्याला समर्थ आहेस !

**राजा**–ठीक आहे. अरे ! फुलवेलींच्या प्रियकर पाहुण्या ! येथें घिरटया घालून उगाच जीवाला त्रास कां करून घेतोस ?

[ गीति ]

ही कुसुमिं बैसलेली तृषितहि साध्वी अति त्वदनुरक्त,
तुजविण मधु नचि चाखी सोत्कंठ बसेचि वाट तव बघत. १९

**सानुमती**–खरेंच, मोठ्या सभ्यपणें याला घालवून दिला बाई !.

**विदूषक**–अरे मित्रा ! हा जातीचाच खट ! हा असा गोडी गुलाबीनें जाणार आहे थोडाच !

**राजा**—( भ्रमरास ) काय ? तूं नाहींच ऐकत माझें ? ऐक तर आतां,

[ व. ति. ]

ज्याच्या प्रफुल्ल–नव–पल्लव–कांति अंगीं,
प्यालों जया जपुनि मीं सुरतप्रसंगां;
बिंबाधरासि जरि झोंबसि त्या, प्रियेच्या,
बंधांत टाकविन मी कमलोदरांच्या ! २०

**विदूषक**—असें चवदावें रत्न दाखविलें म्हणजे कोण भिणार नाहीं ! (हंसून स्वगत) या स्वारीला तर वेड लागलें आहे! मीही त्याच्या संगतीनें तसाच बनलों आहें ! ( मोठ्यानें ) अरे बाबा ! हें चित्र आहे चित्र !

**राजा**—काय चित्र आहे ?

**सानुमती**—माझ्या देखील आतां लक्ष्यांत आलें कीं हें चित्र आहे ! मग चित्रांत दाखविल्याप्रमाणें ज्यानें स्वतां अवस्था पाहिली आहे त्याची स्थिती काय सांगावी ?

**राजा**–मित्रा ! काय रे हें भलतेंच काम केलेंस ?

[ गीति ]

तन्मयचित्तें साक्षात् तद्दर्शनसुखचि पूर्ण अनुभवितां
वस्तुस्थिति सुचवुनियां पुनरपि चित्रस्थ दाविशी कांता ! २१

( असें म्हणून अश्रु ढाळितो. )

**सानुमती**–मागच्या पुढच्याशीं ताळमेळ नसणारा हा विरहाचा मार्ग नवलाचाच आहे !

**राजा**–मित्रा ! हें दुःख मी कसें रे सहन करूं ? यांत मला क्षणाचाही विसांवा नाहीं बाबा !

[ अनुष्टुभ् ]

मोठ्या जागरणें गांठ स्वप्नींही न हिची पडे !
अश्रुप्रवाहें चित्रींही न दर्शन हिचें घडे ! २२

**सानुमती**–शकुंतलेला अपमानपूर्वक घालवून देऊन जें दुःख दिलेंस तें आज पार धुऊन टाकलेंस राजा !

[ प्रवेश करून ]

**चतुरिका**–महाराजांचा जयजयकार असो ! महाराज ! रंगाच्या सामानाची करंडी घेऊन मी इकडे यावयाला निघालें.

**राजा**–बरें मग ?

**चतुरिका**–इतक्यांत वाटेंत, तरलिकेसह वसुमतीराणीसाहेब भेटल्या; 'मीच ही करंडी तिकडे नेऊन देतें,' असें म्हणून त्यांनीं ती माझ्या हातांतून हिसकावून घेतली !

**विदूषक**–तूं सुटलीस तिच्या हातून हें तुझें नशीबच म्हणायचें !

**चतुरिका**—राणीसाहेबांच्या शेल्याचा पदर झाडाच्या फांदीला गुंतला तो तरलिका सोडवूं लागली; इतक्यांत मीं निसटलें !

**राजा**—मित्रा ! राणी आली रे आली ! ती मोठी मानी व गर्विष्ठ आहे ! तेव्हां हें चित्र संभाळ बाबा !

**विदूषक**—चिलालाच काय, 'स्वतालाही संभाळ' असें म्हण कीं. ( चित्राची फळी घेऊन उठतो.) जर तूं अंतःपुरांतील कारस्थानांच्या जाळ्यांतून निभावून बाहेर पडलास तर मेघप्रतिछन्द वाड्यांत मला हाक मार. ( घाईघाईनें निघून जातो. )

**सानुमती**—दुसरीवर मन बसलें असूनही हा पहिलीला मान देण्याला तयार आहे. पण हा प्रेमाचा प्रकार औपचारिक दिसत आहे.

( हातांत पत्र घेऊन प्रवेश करिते. )

**प्रतीहारी**--विजयोऽस्तु महाराज !

**राजा**—वेत्रवति ! वाटेंत राणीसाहेबांची गांठ पडली नाहीं वाटतें ?

**प्रतीहारी**—हो, पडली तर. पण माझ्या हातांत पत्र आहे असें पाहून त्या परतल्या.

**राजा**-- ती मोठी धोरणी आहे. केव्हां कसें वागावें हें तिला उत्तम समजतें. माझ्या कामांत आडमुळा आणणारी नाहीं ती !

**प्रतीहारी**--महाराज ! अमात्यसाहेबांची विज्ञापना आहे कीं आज पुष्कळ प्रकारच्या वसुलाच्या गणतींचें काम फार आहे, म्हणून एकाच नागरिक प्रकरणाची चौकशी केली. पत्रांत मजकूर प्रविष्ट केला आहे. तो महाराजांच्या अवलोकनांत यावा.

**राजा**--पत्र इकडे आणून दाखव.

**प्रतीहारी**--( पत्र नेऊन देते. )

**राजा**--( मनांत वाचून ) काय ? " धनमित्र नांवाचा, जलमार्गानें मालाची नेआण करणारा, प्रमुख व्यापारी नावेंत बुडाला ! आणि त्या बिचाऱ्याला मागें मूलबाळ नाहीं ! म्हणून त्याची दौलत सरकारजमा व्हावयाची. " असें अमात्य म्हणतात ! पोटीं संतान नसणें ही मोठीच दुःखाची गोष्ट आहे ! वेत्रवति ! त्या व्यापाऱ्याजवळ विपुल धन होतें. तेव्हां त्याला बायकाही बऱ्याच असाव्या. शोध आणीव बरें; त्यांच्यापैकीं एकादी गरोदर आहे कीं काय ?

**प्रतीहारी**—महाराज ! अयोध्यानगरींतल्या एका व्यापाऱ्याची मुलगी त्याला दिलेली असून तिचें नुकतेंच तिसऱ्या महिन्याचें ओटीभरण झालें आहे असें समजलें.

**राजा**--तर अर्थात् पित्याच्या धनावर मालकी गर्भाची. जा, अमात्यांना सांग असें.

**प्रतीहारी**—जो हुकूम सरकार. ( जाऊं लागते. )

**राजा**—अग पण जरा इकडे ये पाहूं.

**प्रतीहारी**—ही हजर आहे सरकार.

**राजा**—संतति असली किंवा नसली, त्याचें काय ?

[ दिंडी ]

जनीं होतां प्रियबंधुविरह कोणा
बंधु त्याचा दुष्यंत भूप जाणा;
मात्र बंध तो पातकी नसावा.
असा अस्मत्संदेश घोषवावा ! २३

**प्रतीहारी**– खरोखर अशीच दवंडी पिटवायला हवी. ( बाहेर जाऊन व पुन्हां प्रवेश करून ) योग्य कालच्या पर्जन्यवृष्टीप्रमाणें महाराजांच्या दवंडीचें प्रजाजन अभिनंदन करीत आहे.

**राजा**—( दीर्घ व उष्ण उसासा टाकून ) अशा रीतीनें कुटुंबांतील एकटा कर्ता पुरुष आटोपला असतां संतती खुंटल्यामुळें निराधार झालेल्या त्या कुटुंबाची संपत्ति परक्याकडे जाते ! शिव शिव ! माझ्या पश्चात् सुद्धां पुरुवंशाच्या लक्ष्मीची अशीच दुर्दशा होणार ना ?

**प्रतीहारी**—इडा पीडा टळो ! महाराज ! भलतेंच काय हें बोलणें !

**राजा**—घरीं चालून आलेल्या लक्ष्मीचा मीं अव्हेर केला. तेव्हां मला धिक्कार असो !

**सानुमती**—खरोखर माझी सखीच मनांत येऊन यानें आपणास दोष लावून घेतला असें दिसतें.

**राजा**—

[ गीति ]

कुलदीपिकाहि पत्नी मत्तेजोधारिणीहि टाकावी !
वेळींच पेरिलेली बहुफलदात्री वसुंधरा जेवीं. २४

**सानुमती**—राजा ! तुझ्या संततीला आतां खंड पडणारच नाहीं !

**चतुरिका**—( एकीकडे प्रतीहारीला ) अग, त्या श्रेष्ठ व्यापाऱ्याची बातमी ऐकून महाराजांचें दुःख द्विगुणित झालें आहे. यांना धीर देण्याकरितां मेघप्रतिच्छन्दप्रासादांत मधुभटजी बसले आहेत त्यांना घेऊन ये बरें.

**प्रतीहारी**–बरेंच गडे. ( जाते. )

**राजा**–हर हर ! या दुष्यंताच्या पिंडाधिकारी पितरांची अवस्था फार कठिण झाली आहे ! कारण,

[ गीति ]

या दुष्यंतामागुनि कवण बरें आमुच्या कुलामाजी
संपन्न श्रुतिसंमत करील पिंडप्रदान आम्हां जी ?
ऐसें मनांत येउनि मम पितर प्राशितील जल दिधलें
पुत्रविहीनानें म्यां, प्रक्षाळुनि लोचनांसि जें उरलें ! २५

( मूर्च्छा पावतो )

**चतुरिका**–( घाबऱ्या घाबऱ्या राजास आवरून धरून ) महाराज धरि धरा. धीर धरा.

**सानुमती**–अरेरे ! दिवा असूनही, पडदा आड आल्यामुळें, अंधकाराची पीडा याला होत आहे ! मनांत आणलें तर मी याला आतां याक्षणीं दुःख-मुक्त करीन ! पण नको. महेंद्राची माता ( अदिती ) शकुंतलेचें सांत्वन करीत होती, तेव्हां तिच्या तोंडून हे शब्द मी ऐकले आहेत कीं " देवांना यज्ञभाग घेण्याची इच्छा उत्पन्न होऊन तेच आतां अशी युक्ति योजणार आहेत कीं, तूं जी धर्मपत्नी, त्या तुझा स्वीकार तुझा पति लवकरच करील." तेव्हां तों पर्यंत वाट पहावी हेंच योग्य. मध्यंतरीं समक्ष झालेला हा वृत्तांत सखीला कळवून तिला धीर देतें. ( उड्डान करून निघून जाते )

( पडद्यांत )

ब्राह्मण संकटांत पडला आहे ! याला वांचवा हो वांचवा !

**राजा**–(सावध होऊन) अरे ! माढव्याच्या ओरडण्यासारखा शब्द येत आहे ! कोण आहे रे तिकडे !

( प्रवेश करून )

**प्रतीहारी**–(लगबगीनें) संकटांत सापडलेल्या मित्राला महाराजांनीं वांचवावें !

**राजा**–माणवकाला कोणीं धरिलें आहे ?

**प्रतीहारी**–कोणीं पिशाचानें गुप्तरूपानें येऊन माढव्याला मेघप्रतिच्छन्द वाड्यांतून उचलून वरच्या गच्चीवर नेऊन ठेविलें आहे !

**राजा**–( उठून ) छित् ! असें कसें होईल ! आमच्याही वाड्यांत पिशा-चांचा धुमाकूळ ! अथवा,

[ भु. प्र. ]

स्वतांचेचि जे प्रत्यहीं होति दोष
असे शक्त मी तेहि जाणावयास. २६

जनीं वागतो कोण कैशा प्रकारें
कुणा वृत्त हें जाणण्या शक्य सारें ?

( पडद्यांत )

मित्रा धाव ! मित्रा धाव !

**राजा**--( लगबगीनें धावून ) मित्री ? भिऊं नको !

( पडद्यांत. )

( पुन्हां पहिल्यासारखेंच ओरडून ) कसा भिणार नाहीं ? हा कोणसा माझी मान वांकवून उसाप्रमाणें माझे तीन तुकडे करूं पहात आहे !

**राजा**--( दृष्टि फेकून ) अरे ! धनुष्य आणा आधीं !

( धनुष्य हातांत घेऊन प्रवेश करिते )

**यवनी**—महाराज ! हें आगलें धनुष्य आणि हें अंगुलित्राण.

( राजा बाणासह धनुष्य घेतो )

( पडद्यांत )

[ शा. वि. ]

प्यावें रक्त तुझें नवें म्हणुनिया आलोंचि मारावया !
मारी व्याघ्र जसा मृगासि, झगटे जो प्राण रक्षावया.
दीनांच्या अवनार्थ सज्ज धनु जो हस्तीं सदा वागवी
तो दुष्यंत नृपाल रक्षण करो ! त्राणार्थ त्या बोलवीं. २७

**राजा**—( रागावून ) काय ? मलाच उद्देशून बोलत आहे ? मांसभक्षका ! थांब. तुझें मरण ओढवलें समज आतां ! ( धनुष्यावर बाण चढवून ) वेत्रवति ! जिन्याचा रस्ता दाखीव.

**प्रतीहारी**--महाराज ! इकडे, असें इकडे.

( सगळे घाईनें तिकडे जातात )

**राजा**—( भोंवतालीं बघून ) येथें तर कोणी नाहीं ! अगदां शून्य !

( पडद्यांत )

धाव, मित्रा धाव ! अरे तूं मला दिसतो आहेस, पण तुला मी दिसत नाहीं ! मांजराच्या पकडींत सांपडलेल्या उंदराप्रमाणें मला आतां जीवाची आशा राहिली नाहीं बाबा !

**राजा**—अरे ! तिरस्करिणीविद्येनें माजलेल्या पिशाचा ! माझें अस्त्र तुला हुडकून काढील आतां ! हा बाण लावला पहा !

[ अनुष्टुभ् ]

जो वधील तुला वध्या, द्विजा रक्षासि रक्षिल,
हंस घे दुग्ध, टाकोनि त्यांशीं मिसळलें जल. २८

( असें म्हणून अस्त्र योजतो )

( तेव्हां विदूषकाला सोडून देऊन मातली येतो )

**मातलि**—

[ द्रु. वि. ]

असुर लक्ष्य तुझें करितो हरी, तव शरासन वांकवि त्यांवरी;
सुहृदिं टाकि कटाक्ष भला जन, अतिकृपामृदु, बाण न दारुण.*

**राजा**—( लगबगीनें अस्त्र मागें घेऊन ) ओहो ! काण ? मातली ! महेंद्र-सारथ्याचें स्वागत असो !

( प्रवेश करून )

**विदूषक**—ज्यानें मला यज्ञांतल्या पशुप्रमाणें यथेच्छ बुकललें त्याचें आमचा मित्र स्वागतपूर्वक अभिनंदन करीत आहे !

**मातली**—( हंसून ) आयुष्मन् ! इंद्रानें मला तुझ्याकडे कां पाठविलें तें ऐक.

**राजा**—बोल, मातले ! माझें लक्ष्य आहे.

**मातली**—कालनेमीच्या कुळांत जन्मलेला दुर्जय नांवाचा राक्षससमुदाय आहे.

**राजा**—होय. नारदांच्या मुखानें तो मला श्रुत आहे.

---

* या अर्थाचा दुसरा श्लोक–

[ मंजुभाषिणी ]

असुरांसि लक्ष्य करितो तुझें हरी,
तव चाप आश्रवण ओढिं त्यांवरी;
सुहृदीं प्रसादमृदु टाकि सज्जन
अपुले कटाक्ष; नचि बाण दारुण.

**मातलि**—

[ **प्रहर्षिणी** ]

तो इन्द्रा, तव सखया, न जाय हार,
त्याला, तूं, वदति, रणांत मारणार;
नाशाया हिनमणि ज्या न शक्त होतो,
रात्रींचें तम विधु तें लयास नेतो. ३०

असा, तूं आतां सशस्त्र आहेस तसाच, या इंद्राच्या रथावर आरूढ होऊन विजय-प्रस्थान कर.

**राजा**—इंद्रानें दर्शविलेल्या आदरानें मी उपकृत झालों. बरें पण, मातले! या माढव्याशीं तूं असें कसें वर्तन केलेंस ?

**मातलि**—तेंही सांगतों. कांहीं कारणामुळें मनाला ताप होऊन तूं उद्विग्न झाल्यासारखा दिसलास. म्हणून तुला राग आणण्याकरितां मीं तसें केलें. कारण,

[ **गीति** ]

चाळविला अग्नि फुले, नाग डवचिला फणा उभी करितो;
बहुशा, क्षोभविला जन पहिल्या तेजासि आपुल्या चढतो. ३१

**राजा**—( एकीकडे विदूषकास ) स्वर्गेश्वर महेंद्राची आज्ञा मोडतां येत नाहीं; म्हणून झालेली हकीकत अमात्य पिशुनांना कळीव व हा माझा निरोप त्यांना सांग;

[ **अनुष्टुभ्** ]

गुंतलें अन्यकार्यांत सज्ज हें धनु तोंवरी
प्रजांचें पालन करो तुझीच मति एकली ! ३२

**विदूषक**—तुझी आज्ञा प्रमाण. ( जातो )

**मातलि**—रथावर चढावें, आयुष्मन् !

( राजा रथावर चढल्यासारखें दाखवितो. सगळे जातात. )

**सहावा अंक समाप्त.**

# अंक सातवा

( नंतर रथांत बसून राजा व मातली आकाशमार्गाने चालले आहेत असा देखावा )

**राजा**--मातलि ! इंद्राचें काम मीं शेवटास नेलें. तरी पण त्याबद्दल त्यानें जो माझा विशेष सत्कार केला तो मनांत आला म्हणजे इतक्या मानाजोगें माझ्या हातून कांहींच झालें नाहीं असें मला वाटतें.

**मातलि**—( हंसून ) आयुष्मन्, तुम्हां उभयतांनाहि आपआपल्या कामांत कांहीं तरी कमीच पडलें आहे असें वाटत आहे.

[ व. ति. ]

इंद्राकडोनि तव आदर फार झाला,
तेणें गणींसि बहु अल्प कृतश्रमाला;*
पाहोनि शौर्य तव विस्मय चित्तिं दाटे;
त्यालाहि, मान दिधला तुज, अल्प वाटे १

**राजा**—मातलि ! छे छे ! असें नाहीं. मला निरोप देतांना इंद्रानें माझा सत्कार केला तो खरोखर कल्पनेच्या बाहेर होता. कारण त्यानें देवांच्या समक्ष मला आपल्या अर्ध्या आसनावर बसवून

[ व. ति. ]

इच्छा मनांत धरुनी जवळींच होता
पाहोनि मंद हसिंतेंचि तया जयन्ता,
मंदारहार हरि तो स्वकरींच घाली
कंठांत या, हृदयचंदनगंधशाली २

**मातलि**—असा कोणता मान आहे कीं जो सुरेंद्रानें दिला असतां तुम्हां शोभणार नाहीं ? पहा,

[ व. ति. ]

पूर्वी कराल नरकेसरिच्या नखांनीं,
आतां तुझ्या कठिन घातक सायकांनीं;

---

* 'कृतोपकारा' असा पाठ.

तो स्वर्गिचा असुरवृन्द लयासि नेला,
सौख्यांत मम हरि संकटमुक्त केला. ३

**राजा**--तरी पण या बाबतींत इंद्राच्या मोठेपणाचीच प्रशंसा केली पाहिजे.

[ शा. वि. ]

भृत्यांलागुनि लाभतें यश महाकार्यांतही, कारण,
याचें एकचि होय कीं प्रभु तयां देताति मोठेपण.
सूर्यानें नसतें जरी बसविलें अग्रस्थलीं स्यंदनीं
होता काय तरी समर्थ अरुण ध्वांताचिया ध्वंसनीं ? ४

**मातलि**--तूं असें म्हणवेंस हें योग्यच आहे. ( अंमळ पुढें रथ चालवून ) आयुष्मन् ! स्वर्गांत चिरस्थायी झालेलें आपल्या यशाचें वैभव येथून पहा !

[ साकी ]

जे उरलेले सुरांगनांनीं निज अंगां लावोनी
रंग सकल ते स्वर्गांतिल हे सुरगण उपयोजोनी
कल्पलतांच्या पानांवरती चरित तव लिहितात
गीतामध्यें बसण्याजोगा योजुनि अर्थ मनांत. ५

**राजा**--मातलि ! त्या दिवशीं मी स्वर्गलोकाला आलों त्यावेळीं असुरांना मारण्याविषयीं उत्सुक असल्यामुळें या मार्गाकडे माझें लक्ष्य गेलें नाहीं. वायूच्या कोणत्या मार्गांत आपण आलों बरें ?

**मातलि**-- [ गीति ]

वाहे नदी त्रिपथगा, जिची प्रतिष्ठा नभांत थोर असे,
वांटुनि निज वेगौघा ज्योतिर्गण निजपथांत फिरवितसे;
तम दूर होय ज्यांतिल वामनपद लागल्यामुळें दुसरें,
तो हा पथ वायूचा, 'परिवह' हें नांव त्यास जनिं पडलें ६

**राजा**—मातलि ! म्हणूनच माझा आत्मा कसा आंत बाहेर अगदीं प्रसन्न झाला आहे ! ( रथाच्या चाकांकडे पाहून ) मेघमार्गावर आपण उतरलों !

**मातलि**—हें कसें लक्ष्यांत आलें तुम्हा ?

**राजा**— [ गीति ]

आरांच्या विवरांतुनि चातक बाहेर उडति वेगानें,
मधुनी मधुनि तुरंगम चमकति विद्युल्लताप्रकाशानें;

अंबुकणांनीं भिजल्या धावा, तेणें गमे तुझा रथ हा,
चाले घनांवरोनी, ज्यांच्या उदरांत उदकराशि महा ! ७

**मातलि;**—आयुष्मन्, आतां एका क्षणांत तूं आपल्या सत्तेच्या भूमिप्रदेशांत जाऊन उतरशील !

**राजा**—( खालीं पाहून ) मातलि ! आपण वेगानें खालीं जात असल्यामुळें हा मनुष्यलोक किती आश्चर्यकारक दिसत आहे, पहा !

[ साकी ]

उसळति वरती शैल, तयांच्या शृंगींवरुनी खालीं
वसुंधरा ही अतिवेगानें उडी जणों कीं घाली !
जो इतुक्यांतचि दडला होता निजपर्णांच्या मागें
स्कंध प्रकटुनि विटपगण तो स्पष्ट दिसाया लागे !
फारच बारिक नष्टसलिलशा होत्या दिसत दुरोनी
निर्झरिणी त्या ओघ आपुले दाविति उघड करोनी !
अशा रीतिनें अतिवेगानें जातां खोलचि खोल
कोणी तरि उचलोनि मजकडे आणि गमे भूगोल ! ८

**मातलि**—मोठें मार्मिक अवलोकन आहे तुझें राजा ! ( मोठ्या आदरानें पाहून ) अहाहा ! ही वसुंधरा किती गंभीर आणि रमणीय दिसत आहे !

**राजा**—मातलि ! पूर्वपश्चिमसमुद्रांत प्रविष्ट झालेला, सुवर्णरसाचे निर्झर ज्यावर आहेत असा, संध्याकाळच्या मेघमालेप्रमाणें दिसणारा हा कोणता पर्वत असावा बरें ?

**मातलि**—हा हेमकूट नांवाचा पर्वत आहे. या ठिकाणीं कुबेराचे किंपुरुष नांवाचे सेवक राहतात. ऋषींच्या तपाच्या अंतिम सिद्धींचें हें मोठें क्षेत्र आहे. पहा,

[ गीति ]

विधिचा पुत्र मरीची, त्याचा सुत जो प्रजापती विदित,
तो हा सुरासुरगुरू, येथें पत्नीसवें तपोनिरत. ९

**राजा**—तर अशल्या पुण्यवानांचें दर्शन घेतल्याशिवाय पुढें जावयाचें नाहीं.

**मातलि**—फार उत्तम !

( खालीं उतरल्या सारखें दाखवितात )

[ राजा—( आश्चर्यानें )

[ व. ति. ]

पृथ्वीतलासि न शिवे रथ हा म्हणोन,
घावा न वाजति, धुळी उडते मुळीं न.
त्वां दोर आखडियले, मज तें दिसेना
तेणें तुझा उतरला रथही कळेना ! १०

मातलि– एवढाच तर इंद्रांत व तुझ्यांत भेद !

राजा—मातलि ! मारीचमुनींचा आश्रम कोणत्या प्रदेशांत आहे बरें !

मातलि –( हातानें दाखवून ) राजा ! ज्या ठिकाणीं

[ साकी ]

*अर्धतनू वारुळीं झांकिली, उरा चिकटल्या कांती,
जीर्णलतांनीं फास घातला कसोनि कंठाभोंतीं;
पक्षिगणांच्या घरट्यांनीं जो खचुनि टाकिला पार
स्कंधप्रांतीं लोळत राहे असा जटेचा भार;
एकसारखी रविबिंबावरि दृष्टि लावुनी राहे,
तो मुनि निश्चल उभा स्थाणुसम, तेथें आश्रम आहे. ११.

राजा—उग्र तप करणाऱ्या तपोधना ! तुला नमस्कार असो !

मातलि—( दोर ओढून रथ उभा करतो ) पहा ! अदितीनें वाढविलेले मंदारवृक्ष ज्यांत आहेत अशा या प्रजापतीच्या आश्रमांत आपण शिरलों !

राजा—स्वर्गापेक्षांही अधिक आनंददायक हें स्थान आहे ! मला तर अमृताच्या डोहांत बुडी मारल्यासारखें वाटत आहे !

मातलि—( रथ उभा करून ) उतरावें आयुष्मन् !

राजा –( उतरून ) मातलि ! पण तूं आतां काय करणार !

---

+ या अर्थाचा दुसरा श्लोक—

[ शा. वि. ]

अर्धें अंग निमग्न वारुळिं, उरा सर्पत्वचा झांकती,
वेढोनी अतिजीर्ण वल्लिवलयें कंठासि संरोधिती.
स्कंधप्रांतिं रुळे, समग्र भरलें नीडीं, जटामंडळ
ऐसा स्थाणुपरी मुनि स्थिर उभा लक्षीत तो भास्कर.

**मातलि**—मीं रथ खुंटवून ठेवला आहे. मीही उतरतोंच. ( उतरून ) आयुष्मन् ! असें इकडे यावयाचें. ( फिरून ) पूज्य मुनिजनांचीं हीं तपोवनें पहा. !

**राजा**—हीं पाहून खरोखरच माझ्या मनाला मोठा विस्मय वाटतो !

[ साकी ]

सुंदर कल्पद्रुम विलसति या तपोवनप्रांतांत;
राहति येथें मुनि त्याच्या तळीं केवळ सेवुनि वात !
धर्मबुद्धिनें मात्र स्नानें करिती कासारांत,
सुवर्णकमळांतिल रज लागुनि पिंगट सलिल जयांत.
रत्नशिळांच्या आसनावरी ध्यानमग्न होतांतां,
सुरांगनाही जवळीं असुनी इंद्रियदमन करीती.
भूमीवरले मुनि ज्याकरितां कष्टुनि तप करितात.
येथें सिद्धचि तें सगळें, तरि मुनिवर हे तपतात ! १२

**मातलि**—थोरांचे मनोरथ उंच उंचच जावयाचे ! ( फिरून व आकाशाकडे पाहून ) अरे वृद्ध शाकल्या ! भगवान् मारीच मुनि काय करीत आहेत ? काय म्हणतोस ? दाक्षायणीनें पतिव्रताधर्माविषयीं प्रश्न विचारल्यावरून तो धर्म ते तिला व इतर ऋषिपत्नींना सांगत बसले आहेत, म्हणून ?

**राजा**—( कान देऊन ) तर मग मुनींचें हें प्रवचन संपेपर्यंत वाट पाहिली पाहिजे.

**मातलि**—( राजाकडे पाहून ) आयुष्मन् ! तू या अशोकाच्या मुळाशीं बैस; तोंपर्यंत मी आश्रमांत जाऊन इंद्राचे गुरु मारीच मुनि यांना तूं आल्याचें वृत्त निवेदन करण्याची संधि साधतों.

**राजा**—तुझ्या इच्छेला येईल तसें. ( उभा राहतो ).

**मातलि**—आयुष्मन् ! मी जातों. ( जातो )

**राजा**—( शकुन झाल्यासारखें करून )

[ गीति ]

इष्टप्राप्ति न आतां ! बाहो ! कां फुकट करिसि तूं स्फुरण ?
लक्ष्मी धाडविली ती पुनरपि येणें दिसे परम कठिण ! १३

( पडद्यांत )

पुरे बाबा तुझ्या खोड्या त्या ! काय बाई ! हा गेलाच कीं पुन्हां आपल्या स्वभावावर !

**राजा**—( कान देऊन ) दांडगाईची ही जागा नव्हे ! मग कोण कोणाला दटावीत आहे येथें ? ( जिकडून शब्द आला तिकडे पाहून व हंसून ) अरे ! ज्याच्यां बरोबर दोन तापसी आहेत, असा हा थोर माणसासारखा वीर्यशाली बालक कोण असावा बरें ?

[ गीति ]

मातृस्तना पितांना हरिकलभा ओढि हा बळें बाल,
झगडुनि त्याशीं वेगें बहु दुखवी स्कंधि वाढले बालि. १४

( नंतर वर वर्णन केल्याप्रमाणें क्रीडासक्त बाल दोन तापसींसह येतो. )

**बाल**—ए, सिंहाच्या पोला ! आ कर पाहूं ! मला तुझे दांत मोजायचे आहेत !

**पहिली**—अरे ए दांडग्या ? आमच्या पोटच्या पोरांसारखे हे प्राणी, यांच्या उगाच कां राशीस लागतोस ? काय मेले ! जों जों बोलावें तों तों तुझ्या चेष्टा वाढतच चालल्या, बाबा ! ऋषींनीं तुझें नांव ' सर्वदमन ' असें ठेविलें तें कांहीं उगाच नाहीं !

**राजा**—या बालकाकडे पाहतांच स्वतांच्या पुत्रासारखें मला प्रेम वाटूं लागलें आहे ! असें कां बरें व्हावें ? मला मुलींच संतति नाहीं यामुळें असें पुत्र--प्रेम वाटत असावें.

**दुसरी**--बाळा सर्वदमना ! जर का या सिंहीच्या पोराला तूं सोडलें नाहींस तर तुझ्या ही बोकांडी बसलीच समज !

**बाल**—( हंसून ) अबब, खूप भ्यालों बोवा आम्ही ! ( वांकुल्या दाखवितो

**राजा**—

[ अनुष्टुभ् ]

हा बाल मोठ्या तेजाचें बीज हें मानि मन्मन,
इंधनाची वाट पाहणारा कीं अग्निचा कण. १५

**पहिली**—बाळा, या सिंहाच्या [illegible] दे सोडून आतां ? मी तुला दुसरें कांहीं तरी खेळणें आणून देतें.

**बाल**—कुठाय तें ? दे तर मला. ( [illegible]करितां हात पसरतो. )

**राजा**— काय ? चक्रवर्तिलक्षणही याच्या हातावर आहे !

[ साकी ]

आवडणारी वस्तु घ्यावया पसरी कर हा बाल,
दिसे अंगुलींवरी पसरलें याच्या रेषाजाल;
दलें न दिसती स्पष्ट जयांतिल, पावे अल्प विकास
अरुण उषेनें, कमल मधुर तें, साजे उपमा यास.* १६

**दुसरी**--सुव्रते ! हा कांहीं बाई नुसत्या शब्दांनीं समजणारा मुलगा नाहीं ! तर जा तूं; माझ्या उटजांत ऋषिकुमार मार्कंडेय याचा रंगवलेला मातीचा मोर आहे तो याला आणून दे कसा.

**पहिली**--बरें आहे. ( जाते )

**बाल**--याच्या खोबलच मी खेळेन तों पर्यंत ! सोडायचा नाहीं ! ( तापसीकडे पाहून हंसतो. )

**राजा**--हा खोडकर खरा; पण याला जवळ घ्यावा असें वाटतें !

[ साकी ]

मुलींच कांहीं कारण नसतां मंद हास्य करितात,
त्यायोगानें थोड्या थोड्या दंतकळ्या दिसतात;
बोल बोबडे मधुर बोलुनी रमविति मानस फार,
अंकावरती बसायाची उत्कंठा अनिवार;
मांडीवरि कटिखांद्यावरि वा करीं अशा तनयांस
खेळवितांना मलिन यदंगें, धन्य होति ते खास ! १७

**तापसी**--छे बाई ! हा मला कसचा जुमानतो ! ( बाजूला दृष्टि देऊन ) ऋषिकुमारांपैकीं येथें कुणी आहे का रे ! ( राजाला पाहून ) भल्या गृहस्था ! इकडे ये थोडा.

या सिंहाच्या पोराला यानें घट्ट धरिलें आहे. याला सोडीव बाबा त्याच्या

---

*या अर्थाचा श्लोक,

[ पृथ्वी ]

पुढें पसरि बालक प्रिय पदार्थ घ्याया कर,
तयावरति जालशा जडित अंगुली सुंदर;
प्रभातिं उमलोनियां अरुणकांतिनें रंगलें
अदृश्यदलभेद तें कमल रम्य वाटे भलें !

मगरमिठींतून एकदां ! याचे पोरखळ चालले आहेत पण त्या बापड्याचे हाल होत आहेत फार !

**राजा**--( जवळ जाऊन आणि हंसून ) अरे ए महर्षिपुत्रा !

[ पंचचामर ]

वृत्ति आश्रमाविरुद्ध जन्मतांचि ही अशी
आदरोनि कां बळेंचि संयमासि दूषिसी
तपोवना सुखप्रदा तशाचि सत्त्वधारणा ?
कृष्णसर्पबाल जेविं चंदना प्रमोदना. १८

**तापसी**--बाबा रे ! हा कांहीं ऋषिपुत्र नाहीं.

**राजा**--आकृतीप्रमाणेंच असणारी याची कृति पाहून मला तसें वाटलेंच होतें. पण हा तपोवनांत असल्यामुळें ऋषीचा पुत्र असावा असा तर्क धावला. ( तिनें सांगितल्याप्रमाणें त्या मुलाच्या पकडींतून सिंहाच्या छाव्यास सोडवीत असतां मुलाचें स्पर्शसुख अनुभवून स्वगत )

[ शा. वि. ]

कोणाचा असला कुलांकुर खरें हा जन्मलासे जनीं ?
याला स्पर्श करीं तरीहि इतुका आनंद माझ्या मनीं !
प्रेमानें कुतुकेंहि यास नर जो स्वांकावरी वाढवी
त्या धन्यासि, कळे न, बालक असा. केवीं किती तोषवी ! १९

**तापसी**--( दोघांकडे निरखून पाहून ) अग बाई ! केवढें नवल हें ! केवढें नवल !

**राजा**—बाई ! नवल तें कशाचें ?

**तापसी**—या बाळकाच्या व तुमच्या रूपांत केवढा तरी सारखेपणा आहे ! शिवाय तुम्ही अगदीं अनोळखी असतां, पहा बाई ! हा तुमच्या जवळ अगदीं दांडगाई न करतां कसा मुकाट्यानें बसला आहे ! म्हणून मला नवल वाटलें.

**राजा**-( मुलाला कुरवाळून ) बाई ! जर हा मुनिकुमार नव्हे तर याचें कुल तरी कोणतें ?

**तापसी**-पुरुकुल.

**राजा**-(स्वगत) काय माझ्याच वंशांतला हा ! तरीच या बाईला हा मुलगा माझ्यासारखा वाटत आहे ! वानप्रस्थाश्रम हा पौरवांचा शेवटचा कुलाचार आहे.

[ मालभारिणी ]

त्रिजयीवनि राहुं इच्छितात, क्षितिरक्षार्थ समृद्ध मन्दिरांत;
तप वृद्धपणीं करावयाला, तरुमूले सदनेंचि होति त्यांला. २०

( उघड ) पण या प्रदेशांत मनुष्य स्वतांच्या सामर्थ्यानें कसा येऊं शकणार ?

तापसी–आपलें म्हणणें बरोबर आहे. याच्या मातेचें अप्सरेशीं नातें असल्यामुळें ती देवगुरु मारीचमहर्षि यांच्या तपोवनांत प्रसूत झाली.

राजा–( स्वगत ) हें दुसरें आशेला कारण झालें ! ( उघड ) बरें; ती कोणत्या राजर्षीची पत्नी हें ठाऊक आहे का ?

तापसी–आपल्या धर्मपत्नीला टाकणारा तो ! त्या मेल्याचें नांव तरी कोण काढणार तोंडावाटे !

राजा–( स्वगत ) हें प्रकरण तर मलाच चिकटतें आहे देऊन ! बरें तर, या मुलाच्या आईचें नांव विचारून पहावें. पण दुसऱ्यांच्या बायकांची उठाठेव करणें अनुचित आहे.

( मातीचा मोर हातांत घेऊन )

तापसी—बाळा सर्वदमना, हें पाहिलेंस का शकुंत-लावण्य !

बाल–( दृष्टी फेकून ) कुठे आहे माझी आई !

दोघी—याचा सारा ओढा आईकडे असल्यानें तिच्या नांवासारखीं अक्षरें ऐकून फसला बिचारा !

दुसरी– बाळा, या मातीच्या मोराचें लावण्य पहा, असें मीं तुला म्हटलें.

राजा–( स्वगत ) काय ? याच्या आईचें नांव शकुंतला ! पण एकाच नांवाचीं वेगळीं वेगळीं माणसें का थोडीं असतात ? या नुसत्या नांवाचा निर्देश मृगजळाप्रमाणें खेदाला तर कारण होणार नाहीं ना ?

बाल—हा चिमुकला मोल फार आवडतो मला ! ( खेळावयाचा मोर हातांत घेतो. )

पहिली—( पाहून व घाबरून ) अग बाई ! याच्या मनगटावर रक्षेचा ताईत दिसत नाहीं कुठें !

राजा—घाबरू नका बाई ! सिंहाच्या छाव्याच्या व याच्या झटापटींत हा येथें पडला आहे तो ! ( उचलून घ्यावयास पाहतो )

दोघी—हां हां ! त्याला शिवूं नका ! काय बाई ! उचललाच यांनीं तो !

( आश्चर्यानें हृदयावर हात ठेवून एकमेकींकडे पाहतात. )

**राजा**--बायानों ! शिवूं नको असें कां म्हणालांत मला ?

**पहिली**--ऐकावें महाराज ! ही अपराजिता नांवाची ओषधी आहे. हा कुमार जन्मला त्यावेळीं भगवान् मारीच ऋषींनीं जातकर्माच्या वेळेस, ही याला दिली. ही जर खालीं भूमीवर पडली तर याचे आईबाप किंवा स्वतां हा, यांच्या-शिवाय, ती कोणी उचलून घ्यावयाची नाहीं असें आहे.

**राजा**--आणि कोणीं घेतली तर ?

**पहिली** तर ती साप होऊन त्याला डसते.

**राजा**--पण ती असें कोणाला डसल्याचा प्रत्यक्ष अनुभव आहे का ?

**दोघी**--अगबाई ! किती तरी वेळां !

**राजा**--( हर्षानें स्वगत ) माझे मनोरथ पूर्ण झाले तरी आतां मी आनंद मानूं नये ! ( मुलाला पोटाशीं धरतो. )

**दुसरी**--सुव्रते ! चल. शकुंतला आपल्या नेमधर्मांत असेल. तिला ही झालेली हकीकत कळवूं ( जातात )

**बाल**--छोला मला; मी आपला आईकले जातो आतां.

**राजा**--पुत्रा ! माझ्याबरोबर तूं मातेचें अभिनंदन करावयाला जाशील.

**बाल**--माझा बाप दुष्यन्त लाजा ! तूं नाहींस कांहीं !

**राजा**--( हंसून ) तुझ्या या भांडणावरूनच खात्री पटली ! (जातात.)

( एकपेडी वेणी घातलेली शकुंतला येते )

**शकुंतला**--सर्वदमनाच्या वनस्पतीचें रूपांतर व्हावयाला हवें होतें, तरी ती तशीच राहिली ! हें ऐकून नशीब उघडण्याची तर आशाच राहिली नव्हती बाई ! पण सानुमतीनें सांगितलें त्याप्रमाणें असलें तर मात्र कदाचित् तिकडची भेट होण्याचा संभव आहे !

**राजा**--( शकुंतलेकडे पाहून ) अरे ! तीच ही शकुंतला ! काय दशा झाली हिची ही !

**[ मालभारिणी ]**

नियमें कृशता मुखासि आली, वसनें धूसरवर्ण दोन त्याली.
विरहीं उपचार ते कुठोनी ? अलकांची रचि एकपेड वेणी !

अपमानुनि हीस घालवीली, करुणाशून्यचि वृत्ति दाखियेली.

तरि ही अतिशुद्धशील बाला, मजसाठीं करि दीर्घ या व्रताला !* २१

**शाकुंतला**—(पश्चात्तापानें फिकट तोंड झालेल्या राजाला पाहून) अग बाई ! हे कांहीं ते दिसत नाहींत ! पण मग ऋषींनीं रक्षाबंधन घातलेल्या माझ्या बाळाला अंगाचा स्पर्श करून हा कोण बरें विटाळीत आहे ?

**बाल**—( आईजवळ जाऊन ) आई ग, हा कोन ग मला पुत्त पुत्त म्हणून मिथी मालतोय ? .

**राजा**—प्रिये ! मी जरी तुझ्याशीं कठोरपणानें वागलों तरी त्याचा शेवट गोड झाला आहे. . कारण आतां तूं मला ओळखिलेंस ही खूण मला पटली !

**शाकुंतला**—( स्वगत ) हृदया ! धीर धर ! धीर धर ! दैवानें हेवादावा सोडून मजवर आतां दयादृष्टि केली आहे. तेच आहेत हे !

**राजा**—प्रिये ,

[ गीति ]

स्मृति नाशी मोहतमा, भाग्यें संमुख उभी, सुमुखि ! असशी,

सुटतां ग्रहण, विधुशीं संगत ती होय रोहिणी जशी. २२

**शाकुंतला**—आर्यपुत्राचा जयजयका-( असें अर्धेंच बोलून कंठ भरून आल्यामुळें थांबते )

**राजा**—प्रिये !

[ गीति ]

मीं जिंकिलें ! जरी 'जय'—शब्द तुझा अश्रुरुद्ध अस्पष्ट,

तव दिसलें मुख, ज्याचा पाटल संस्कारशून्य अधरोष्ठ. २३

**बाल**—आई ! कोन ग हा ?

**शाकुंतला**—बाळा ! तुझ्या भाग्याला विचार.

**राजा**—( शकुंतलेच्या पायां पडतो ) प्रिये !

---

* या अर्थाचें दुसरें पद्य.

[ दिंडी ]

उजळ वसनें दिसती न, तपें आली, म्लानि वदना, वेणिची जटा झाली ।

जरी निर्दय मी, तरिहि शुद्धशीला, दीर्घ विरहव्रत चालविते बाला !

[ शा. वि. ]

प्रत्यादेशविषाद सुंदरि ! तुझ्या सोडोनि जावो मना !
झाला मोह मला विलक्षण तदा कैसा, न ये कल्पना.
सद्वस्तूविषयीं अशाच बहुधा मोहांधवृत्ती जनीं;
शीर्षक्षित झुगारि अंध सुमनोमाला अही शंकुनी ! २४

**शाकुंतला**—हें काय भलतेंच ! माझ्या का कुठें पायां पडावयाचें बरें ! उठा-बघें आतां ! मागच्या जन्मीं मींच कोणां तरी स्त्रीपुरुषांचा बिघाड केला, तें पातक तेव्हां फळाला आलें ! आणि त्यानें हिजडचें मन, फार दयाळु असतांही, माझ्याविषयीं पाषाणासारखें कठोर बनवून टाकलें ! ( राजा उठतो )

**शाकुंतला**--मग या अभागिनीची आटवण इकडे कशी झाली ?

**राजा**—खेदाचें शल्य उपटून टाकून सांगतों तुला !

[ साकी ]

बिंदुजालका पसरुनि वदनीं तव अधराला दाही,
भूल पडुनियां पूर्वी, सुंदरि ! उपेक्षिलेला राही;
कुटिल पापण्यांवरी आज तव, लोंबत राही, पाहीं,
अश्रुबिंदु तो पुसोनि मग अनुताप हरिन लवलाहीं ! २५

( तिचे अश्रु पुसतो. )

**शाकुंतला**—( नांवाची आंगठी पाहून ) महाराज ! हीच ती आंगठी हो !

**राजा**—ही सांपडल्यामुळेंच तर तुझी स्मृति पुन्हां जागृत झाली !

**शाकुंतला**—आपली खात्री पटविण्याच्या ऐनवेळीं हिनें तोंड काळें केलें ! असें फसवेगिरीचें काम केलें हिनें !

**राजा**-तर मग ऋतुसंगमाचें चिह्न म्हणून वेलीनें कुसुम धारण करावें म्हणतों.

**शाकुंतला**—हिच्यावर आतां पुन्हां विश्वास ! ही गोष्टच व्हावयाची नाहीं ! ती आपल्याच बोटांत असूं द्यावी !

( नंतर मातली प्रवेश करतो )

**मातलि**—महाराज ! देवाची केवढी कृपा ही ! आज आपणांस धर्मपत्नी मिळाली व पुत्राचें मुखही पहावयास मिळालें !

**राजा**—माझ्या मनोरथाला गोड फळें आलीं आहेत ! मातलि ! ही वार्ता सुरेंद्राला कळली नसावी नाहीं ?

**मातलि**—समर्थच ते ! त्यांच्या नकळत काय व्हावयाचें आहे ! महाराज ! चलावें. भगवान् मारीच आपणांस दर्शन देण्यास तयार आहेत.

**राजा**—प्रिये ! या मुलाला घेऊन चल. माझ्या मनांत तुझ्यासह भगवान् मारीचमुनींचें दर्शन घ्यावयाचें आहे.

**शकुंतला**—वडील माणसांसमोर, बरोबर कसें जायचें बाई !

**राजा**—अगे अशा शुभप्रसंगीं असेंच गेलें पाहिजे. चल तर.

( सगळे आश्रमाकडे जाऊं लागतात. )

( नंतर आदिति व आसनावर बसलेले मारीचमुनि असा प्रवेश )

**मारीच**--दाक्षायणि !

[ शा. वि. ]

पुत्राच्या तव ठाकतो रणमुखीं, हा भूमि पाळीतसे,
याचें नांव चहूंकडे श्रुत जना दुष्यन्त ऐसें असे.
वज्राचें सगळेंच कार्य करितें याचें धनू, केवळ
शोभेसाठिच इंद्र वागवि तया, अग्रे जयाचीं खर. २६

**आदिति**—याच्या आकृतीवरून याच्या पराक्रमाची कल्पना येण्यासारखी आहे.

**मातलि**--आयुष्मन् ! हे पहा देवांचे मातापितर पुत्रप्रेमानें तुजकडे पाहात आहेत ! तेव्हां त्यांच्याकडे चल.

**राजा**—मातलि !

[ स्रग्धरा ]

लाभे बारां रवींना, मुनि वदति, महातेज ज्यांपासुनीया,
जन्मा जे हेतु होती त्रिभुवनभरणोद्युक्त देवेश्वराच्या;
ज्यांच्या पोटीं स्वयंभू परमपुरुषही जन्म घेण्यास आला,
ते हे मारीचदाक्षायणि; विलसति हीं नातवंडें विधीला ! २७

**मातलि**—बरोबर आहे.

**राजा**—( जवळ जाऊन ) इंद्राचा सेवक दुष्यंत हा आपणां उभयतांस प्रणाम करीत आहे.

**मारीच**--वत्सा, दीर्घायु हो ! पृथ्वीचें पालन कर.

**आदिति**—वत्सा ! अद्वितीय वीर हो !

**शकुंतला**—मुलासह आपणां दोघांस वंदन करते.

**मारीच**--वत्से !

[ गीति ]

तव इंद्रतुल्य भर्ता, पुत्रहि ज्या शोभते जयन्ततुला,
हो इन्द्राणीसम तूं, नचि आशीर्वाद अन्य उचित तुला ! २८

**अदिति**--मुली, पतीला बहुमान्य हो ! आणि तुझा मुलगा दीर्घायु होऊन दोन्ही कुलांना आनंद देवो ! बसा.

( सगळे प्रजापतीसभोंवतीं बसतात. )

**मारीच**--( एकेकाकडे बोट दाखवून. )

[ गीति ]

कण्वसुता साध्वी, हें अपत्य शोभन, तसाचि तूं नृवरा !
श्रद्धावित्तविधींचा संगम रमणीय हा इथें घडला ! २९

**राजा**--भगवन् ! आधीं इष्टसिद्धि आणि मग दर्शन ! असा हा आपला प्रसाद कांहीं अपूर्व आहे ! पहा,

[ गीति ]

आधीं येताति फुलें, मागुनि तरुवल्लरींस येति फळें,
घन उठती प्रथम नभीं, नंतर ते वर्षताति विपुल जळें.
आधीं कारण, मागुनि कार्य; जनीं ही परंपरा ऐसी;
परि तूं आधि मनोरथ पुरवुनि मग धन्य दर्शनें करिसी ! ३०*

**मातलि**--विधात्यांचे प्रसाद असेच असतात !

**राजा**--भगवन् ! ही आपली आज्ञाधारिणी शकुंतला, हिचें गांधर्व विधीनें मीं पाणिग्रहण केलें. परंतु पुढें कांहीं काल गेल्यावर तिचे आप्त तिला माझ्या घरीं घेऊन आले असतां, माझी स्मृति शिथिल होऊन, मीं तिला धिक्कारपूर्वक घालवून दिलें ! आणि आपले सगोत्र कण्वमुनि यांचा मीं मोठा अपराध केला. पुढें जेव्हां आंगठी माझ्या दृष्टीस पडली तेव्हां त्यांच्या कन्येशीं लग्न केल्याची मला आठवण झाली. या गोष्टीचें मला आश्चर्य वाटतें !

---

* या अर्थाचें दुसरें पद्य;

[ द्रु. वि. ]

प्रथम येति फुलें मग तीं फळें, घन अगोदर, मागुनिया जळें;
क्रम असा दिसतो नियमें जनीं, तप कृपा अधि, दर्शन मागुनी !

[ इंद्रवज्रा ]

प्रत्यक्ष हत्ती दिसतां पटेना, जातांच शंका हृदयांत नाना.
पाहोनि पादां परि ये प्रतीति, तसीचि मच्चित्तविकाररीति. ३१

**मारीच**—वत्सा ! अपराध केलास असें समजण्याचें कारण नाहीं. त्यावेळीं तुला मोह पडला तोही ठीकच पडला. कसा तो ऐक.

**राजा**—ऐकतों, भगवन् !

**मारीच**—मेनका अप्सरस्तीर्थावर गेली होती. ती इकडे परत येतांना दुःखी दिसत असलेल्या शकुंतलेला बरोबर घेऊन आली; तेव्हांच समाधिबलानें मला समजलें कीं तुझ्या बिचाऱ्या धर्मपत्नीला दुर्वासाच्या शापामुळें तूं परत पाठविलेंस; उगाच नव्हे; परंतु पुढें आंगठी दृष्टीस पडल्याबरोबर तो शाप संपला !

**राजा**—( आनंदानें श्वास टाकून ) अहाहा ! आज मी जनापवादांतून मुक्त झालों !

**शकुंतला**—खरेंच बाई ! कारणावांचून इकडून धिक्कार झाला नाहीं ही आनंदाची गोष्ट आहे ! पण मला शाप झाल्याचें कांहींच आठवत नाहीं हें कसें ? किंवा इकडच्या विरहामुळें माझें मन ठिकाणावर नव्हतें म्हणून तो मला समजला नसेल ! याकरतांच मला वाटतें सख्यांनीं मला बजावून सांगितलें होतें कीं इकडे खुणेची जरूर पडली तर आंगठी दाखीव म्हणून.

**मारीच**—मुली ! आतां खरी गोष्ट तुला समजली आहे ! तर मग यापुढें आपल्या सहधर्मचारी पतीवर राग करूं नका, समजलीस ? पहा !

[ शा. वि. ]

शापानें स्मृति रोधिली म्हणुनियां यानें तुला टाकिलें,
आतां यावरती प्रभुत्व तवची, शापें तया सोडिलें;
केव्हांही मलयुक्त दर्पणतलीं बिंबा मिळेना स्थळ,
तत्काल प्रतिबिंब त्यांत पडतें, होतांचि तो निर्मळ. ३२

**राजा**—आपण म्हणतां तसेंच.

**मारीच**—हा तुझ्यापासून शकुंतलेला झालेला पुत्र आहे. याचे जातकर्मादि विधि आम्हीं केले. ते तुला मान्य होतीलच.

**राजा**—भगवन् ! हें काय विचारावें ? हा कुमार तर आमच्या वंशाचा मुख्य आधार ! (मुलाला हातानें धरतो)

**मारीच**—तसाच हा पुढें चक्रवर्ती होणार हें ध्यानांत असूं द्या.

[ शिखरिणी ]

स्थिरीं बसोनीया रथिं, जलधि जाईल तरुनी,
  तशी सप्तद्वीपा, अतुलबल, जिंकील अवनी.
इथें हा सर्वांतें दमवि म्हणूनी ' सर्वदमन '
  पुढें संज्ञा याला ' भरत, ' करुनी लोकभरण. ३३

**राजा**—खतां मुनिवर्यांनीं ज्याचे संस्कार केले तो सर्व कांहीं करील असा भरंवसा आम्हांस असणारच.

**अदिति**-भगवन् ! या मुलीच्या मनोरथसिद्धीचें सविस्तर वर्तमान कण्वमुनींना कळवावयाला हवें. मुलीचा लळा असलेली मेनका तर येथें आपल्यापाशींच आहे.

**शकुंतला**—(स्वतःशीं) भगवतीनें अगदी माझ्या मनांतली गोष्ट सांगितली !

**मारीच**— तपाच्या सामर्थ्यानें कण्वांना सर्व दिसतेंच आहे.

**राजा**—तरीच मजवर ते फारसे रागावले नाहींत !

**मारीच**—तथापि, ही आनंदाची वार्ता त्यांना कळविणें अवश्य आहे. कोण आहे रे तिकडे ?

( प्रवेश करून )

**शिष्य**—भगवन् ! हा मी आहें.

**मारीच**—गालवा ! आतांच आकाशमार्गानें जा आणि कण्वमुनींना हें आनंदाचें वर्तमान मीं कळविलें आहे म्हणून सांग कीं शकुंतलेचा शाप संपला, दुष्यंताला तिची आठवण झाली आणि त्यानें तिचा पुत्रासह स्वीकार केला.

**शिष्य**—भगवन् ! आज्ञेप्रमाणें करितों. ( जातो )

**मारीच**—वत्सा ! तूंही पुत्र व पत्नी यांना घेऊन आपला मित्र इंद्र याचा रथ येथें सिद्धच आहे त्यांत बैस आणि राजधानीकडे प्रस्थान कर.

**राजा**—भगवन् ! आपली आज्ञा प्रमाण.

**मारीच**—आणखी तुला सांगावयाचें इतकेंच कीं,

[ मालिनी ]

विपुल करु तुझ्या तो इंद्र राज्यांत वृष्टी,
  करुनि सतत यज्ञां तूंहि दे त्यासि तुष्टी !
सुखद उभयलोकीं, श्लाघ्यही फार तेवीं,
  युगशत उभयांनीं सत्कृती चालवावी ! ३४

**राजा**—भगवन् ! यथाशक्ति हें श्रेय संपादण्याचा यत्न करीन.

**मारीच**—वत्सा ! तुला प्रिय अशी आणखी कोणती गोष्ट आहे ?

**राजा**—याहून अधिक प्रिय काय असणार ! तथापि आपण म्हणतां त्यापक्षीं असें होवो !

[ पृथ्वी ]

प्रजाहित करावया नृप झटो मनापासुनी !
  सुविद्य--कवि--भारती परम मान्य होवो जनीं !
स्वयंभु विभु तेविही सकलशक्तिमान् शंकर
  निवारुनि पुनर्भवा मजसि सोडवो सत्वर ! ३५

( सर्व निघून जातात )

## सातवा अंक समाप्त.

---

लेखनकाल-शके १८२५: मुद्रणकाल-शके १८४८.



## भाषान्तरकाराचे उपसंहारात्मक श्लोक

रानीं बाळपणीं विहंगमगणीं सप्रेम संरक्षिली,
शांतस्वाश्रमिं दान्त**कण्व**मुनिनीं सानन्द संवर्धिली;
**दुष्यन्तें** वरिली, तशी **कविवरें** रम्याक्षरीं चित्रिली,
ती ही कान्त **शकुन्तला** सहृदयस्वान्तांत विश्रान्तली ! १

झाले **शाकुन्तला**ची प्रतिकृति पहिली निर्मिते **गोडबोले**[१],
काळें तेवीं गुणेंही प्रथमचि वरिलें स्थान ती, गोड बोले !
त्यांच्या मागोनि [२]**गुंजीकर** कुशलमती **आपटे**[३] **राजवाडे**[४]
त्यांनीं भाषान्तरांतें रचुनि उभविले कीर्तिचे राजवाडे ! २

**अण्णा किर्लोस्कर** विरचिती नाट्य संगीतरूप,
कीर्तिश्रीतें त्वरित वरितें जाहले ते अमूप.
या सर्वांना स्मरुनि रचितों तें पुन्हां प्राकृतांत !
वाटे **शाकुंतल**विषयक प्रेम चित्तीं नितान्त. ३

मूलार्थ--संग्रहिं यथामति यत्न केला,
न्यावें तयासि रसिकें परिपूर्णतेला;
भाग्यें कवीन्द्र--कृतिशीं सहवास झाला.
*हा लाभ अल्प न गमे मम मानसाला.* ४

जेसें मूळ तशी हेही गद्यपद्यात्मिका कृती
समवृत्त समश्लोकी न, तरी आदरो कृती, ५

काव्यारविन्दमधुपानिं सदैव दंग
जे, त्यां पुढें नमवुनी निज उत्तमांग
श्रीकालिदासकविची कमनीय कन्या
वेषान्तरें वितरिं, आजि तयांसि, धन्या ! ६

---

१ परशुरामपंत गोडबोले. २ रामचंद्र भिकाजी गुंजीकर. ३ महादेव चिमणाजी आपटे. ४ कृष्णशास्त्री राजवाडे.

# पुरवणी.

(पृ. ६) पं. ११ 'एवंगुणयुत' याबद्दल 'असा गुणांचा' असा पाठ. (पृ. ९) पं. ३० 'अंगांत मुसमुसणाऱ्या' बद्दल 'पयोधरांचा विस्तार करणाऱ्या' असा पाठ. (पृ. १२) पं. २१ 'माझा पिच्छा' बद्दल 'माझी पाठ' असा पाठ. (पृ. १४) पं. ९ 'धन्य' बद्दल 'कृतार्थ' असा पाठ. (पृ. १५) पं. ९ 'ह्रिय...मधुनी' याबद्दल 'विद्युल्लता न येई वरि वसुधेच्या कधीं तल।-मधुनी.' (पृ. १५) पं. २२ व्रत = मुनिव्रत. (पृ. १९) ३३ ह्या पद्याबद्दल 'जातो देह पुढें, मन धावे उलट्या दिशेकडे चपल । पवनाविरुद्ध नेतां ध्वज जेविं तदीय चीन वसन वर ॥' असा पाठ. (पृ. २७) पं. १६ 'ह्या' बद्दल 'टाका' पाठ. (पृ. २९) पं. १५ 'पाळीसि' बद्दल 'आचरसि' असा पाठ. (पृ. २९) पं. १६ 'यज्ञा' बद्दल 'सत्रा' असा पाठ. (पृ. ३०) पं. ८-९ 'उप...यावें' याबद्दल 'पुत्रपिंडोत्पालन नांवाच्या उपवासाचें पारणें आहे, ते दिवशीं आमच्यापाशीं तुम्हीं असलें पाहिजे, म्हणून त्यावेळीं अवश्य यावें' असा पाठ. (पृ. ३२) पं. ६ 'मौर्वी...हरी' याबद्दल 'मौर्वीरवेंचि धनुच्या हुंकारें जणुं नरेंद्र विघ्न हरी' असा पाठ. (पृ. ३३) पं. ८ 'करीसि शार तूं तुझे' याबद्दल 'शरां करिसि आपुल्या' असा पाठ. (पृ. ३४) पं. २ 'असते' बद्दल 'असावा' असा पाठ. (पृ. ३४) पं. ७ 'तोडि तयानें' बद्दल 'तोडी तेणें' असा पाठ. (पृ. ३४) पं. २० 'दगडाच्या चौथऱ्यावर' बद्दल 'शिलातलावर' असा पाठ. (पृ. ३९) पं. १५ 'दाही' बद्दल 'भाजी' असा पाठ. (पृ. ३९) पं. १६ 'नचि पाहीं' बद्दल 'न पहा जी,' असा पाठ. (पृ. ४०) पं. २२ 'दोनची कुला' बद्दल 'दोन मरकुला' असा पाठ. (पृ. ४०) पं. २३ 'तुमची बहु भली' बद्दल 'तुमचीच आहकी' असा पाठ. (पृ. ४७) पं. १२ 'धर्नी' बद्दल 'पति' असा पाठ. (पृ. ४७) पं. १३ 'सूतापुढें स्थापुनी' बद्दल 'सूताचिया मागुती.' असा पाठ. (पृ. ४९) पं. १४ 'गोळा करिते' याबद्दल 'उटण्याकरितां गोळा करितें' असा पाठ. (पृ. ५२) पं. ९ 'जेविं हो तिजला' बद्दल 'ज्यापरी तिजला' असा पाठ. (पृ. ५४) पं. १७ 'सगर्भ' बद्दल 'गर्भिणी', (पृ. ५७) पं. ६ 'थोर' बद्दल 'कुलीन.' (पृ. ५७) पं. ७ सगळ्या पंक्तीबद्दल

×.

'पतिच्या मोठ्या कामीं संतत गुंतुनियां जाइलि' असा पाठ. ( पृ. ६० ) पं. २९ ' दिनीं ' बद्दल ' दिसां ' असा पाठ. ( पृ. ६२ ) पं. २८ 'घन अंबरिं लावती' बद्दल ' घन नम्र वियत्पथीं ' असा पाठ. ( पृ. ६३ ) पं. २५ ' उठुलि गमते आगं सदनीं ' याबद्दल 'भवेन दहनें वेष्ठित गणीं' असा पाठ. गणीं = मी समजतो. ( पृ ६६ ) पं. २३ ' हिम ' बद्दल ' मधु ' असा पाठ. ( पृ. ६७ ) पं. ३७ ' युक्ति ' बद्दल ' तोड ' पाठ. ( पृ. ६८ ) पं. २८ ' आत्या...ही ' बद्दल ' आत्याच पंडित अमानुषयोषिताही ' असा पाठ. ( पृ. ७१ ) पं. १० ' हवीसे कशा ' बद्दल ' कशास हवी ' असा पाठ. ( पृ. ७१ ) पं. १६ ' हासवितो ' बद्दल ' विकसवितो ' असा पाठ. ( पृ. ७१ ) पं. २३ ' काय...पडलि ' याबद्दल ' पडली ही भुरळ मला ' असा पाठ. ( पृ. ७२ ) पं. २२ ' लागे...कपाळा ' बद्दल ' लागे रहूं वरि करोनि निजां भुजांला ' असा पाठ. ( पृ. ७८ ) पं. ३ ' ना...परी ' बद्दल ' ना ती रजालें घरी. ' असा पाठ. ( पृ. ७८ ) पं. ५–६ बद्दल ' संपे शीत खुलेपणा तरि न ये त्या कोकिलाच्या स्वरा । मार्गे घेइ जणों भयें मदनहीं तूणार्धकृष्टा शरा ' ॥ असा पाठ. ( पृ. ८२ ) पं. २ 'मला...बाबा' बद्दल ' माझें कसें तरी रक्षण कर बाबा ! ' असा पाठ. ( पृ. ८२ ) पं. १३ ' दाही...घुसुनि ' बद्दल ' संतापा गोष्ट ती दे शिरुनि ' असा पाठ. ( पृ ८७ ) पं. १३ ' संभावितपणें ' याबद्दल ' खुबीनें ' असा पाठ. ( पृ. ९० ) पं. ५ ' मात्र नसावा ' याबद्दल ' मात्र गर्हित संबंध तो नसावा. ' असा पाठ. ( पृ. ९६ ) पं. ८ ' सूर्यानें...बसविलें ' याबद्दल ' योजीलें ( स्थापीलें ) नसतें सहस्रकिरणें ' असा पाठ. ( १०३ ) पं. २८–२९ ' सिंहाच्या झटापटींत ' याबद्दल ' हा बालक सिंहाच्या छाव्याला बुकलींत असतां ' असा पाठ. ( पृ. १०५ ) पं. २२ ' पादल संस्कारशून्य ' बद्दल ' संस्कारविहीन फिकट ' असा पाठ. ( पृ. १०९ ) पं. २५ ' होतांचि तो ' बद्दल ' होतां परी ' असा पाठ.

( ३ )

# महाभारतांतील दुष्यन्तशकुन्तलाख्यानाचा सारांश.

एकदा दुष्यन्तराजा मोठें सैन्य बरोबर घेऊन अमात्य व पुरोहित यांसह मृगयेला बाहेर पडला. त्यानें पुष्कळ शिकार केली. शेवटीं एका हरणाचा पाठलाग करीत असतां मालिनीतीरावरील परम सुंदर व पवित्र असा कण्वमहर्षींचा आश्रम त्याच्या दृष्टीस पडला. आश्रमांत जाऊन कण्वमुनींचें दर्शन घ्यावें अशी त्याला इच्छा झाली. सैन्य तपोवनाच्या बाहेर उभें करून अमात्य व पुरोहित यांसह नम्रवेषानें तो तपोवनांत प्रविष्ट झाला. तेथें अनेक आश्रम व मुनि त्याच्या दृष्टीस पडले. परंतु कण्वमुनींचा आश्रम त्यास शून्य दिसला. तेव्हां तो त्यांत एकटाच शिरला; व ' आश्रमांत कोण आहे हो ? ' असें मोठ्यानें विचारूं लागला. तो शब्द ऐकतांच प्रत्यक्ष लक्ष्मीच अशी तापसकन्या शकुंतला पुढें आली. तिनें राजाचें स्वागत केलें, अर्घ्यपाद्यादिकांनीं पूजन केलें व कुशलप्रश्नपूर्वक आगमनप्रयोजन विचारलें. राजा म्हणाला, ' कण्वमहर्षींचें दर्शन घेण्याकरितां मी आलों आहें. मुनिवर्य कोठें आहेत ?' शकुंतलेनें सांगितलें, 'माझा पिता फळें आणण्याकरितां बाहेर गेला आहे, घटकाभर आपण बसा, म्हणजे त्याची भेट होईल.' असें तिचें भाषण ऐकून व मुनि आश्रमांत नाहींत असें पाहून, त्या रूपयौवनसंपन्न, तेजस्वी, स्मितमुखी तापसकन्येला राजा म्हणाला, ' सुंदरि, तूं कोणाची ? इथें आलीस कशी ? आपल्या अलौकिक सौंदर्यानें तूं माझें मन हिरावून नेलें आहेस. तुझी हकीकत मला सांग. ' त्यावर शकुंतला म्हणाली, ' दुष्यन्ता, मी कण्वमुनींची प्रिय दुहिता आहें. ' तें ऐकून दुष्यन्त विचारता झाला,' सुंदरि, कण्वमुनि आजन्म ब्रह्मचारी आहेत. तेव्हां त्यांची तूं मुलगी हें कसें ? ' शकुंतला उत्तर करती झाली, " पौरवेश्वरा, मागें कोणा एका मुनीनें माझ्या पित्याला असाच प्रश्न केला. त्याला जें पित्यानें सांगितलें तेंच मी आपणांस सांगतें. कण्वबाबा त्या मुनीला म्हणाले, 'हे मुने, एकदा राजर्षि विश्वामित्र घोर तपश्चर्या करूं लागला. तेव्हां इंद्राला आपलें पद जाईल कीं काय अशी भीति पडली. तेव्हां विश्वामित्राच्या तपाचा भंग करण्याकरितां त्यानें मेनका नांवाची अप्सरा, वसंतमारुत व मदन यांस बरोबर देऊन, पाठविली. विश्वामित्र मेनकेला भुलून तिला वश झाला. त्याच्यापासून तिला

एक मुलगी झाली. मुलगी जन्मताच मेनकेनें तिला अरण्यांत टाकून दिलें. या स्थितींत शकुंतानीं तिचें रक्षण केलें. मी मालिनीतीराकडे जात असतां तिला अशा स्थितींत पाहिलें. मला तिची दया आली म्हणून मीं तिला उचलून घेऊन आश्रमांत आणिलें; व आपली मुलगी समजून तिचें संवर्धन केलें. शकुंतानीं हिचें रक्षण केलें म्हणून हिचें नांव मीं शकुंतला असें ठेविलें.' याप्रमाणें त्या मुनींला कण्वमुनींनीं माझ्या संबंधाची सर्व हकीकत सांगितली. अशा प्रकारें मी मुनि-कन्या आहें." यावर दुष्यन्त म्हणाला,'यावरून तूं राजकन्या आहेस हें उघड आहे. तूं माझी भार्या हो. तुझ्याकरितां मी काय करूं तें सांग. सर्व राज्य तुझें आहे समज. सुंदरि, गांधर्वविधीनें आपण संगत होऊं.' शकुंतला म्हणाली, 'राजा, माझा पिता फळें आणण्याकरितां बाहेर गेला आहे. तो क्षणांत येईल; व मला आपणांस दान करील.' दुष्यन्त म्हणतो, 'हे चारुशीले, तूं माझी पत्नी हो. आठ विवाहांपैकीं गांधर्व व राक्षस क्षत्रियास विहित आहेत. तेव्हां परस्परानुरक्त आपण गांधर्वविवाह लावूं. यांत अधर्म मुळींच नाहीं. तूं स्वतांचें दान करण्यास अधिकारी आहेस. तेव्हां आतां उशीर लावूं नकोस.' शकुंतला म्हणाली, 'महाराज, आपण म्हणतां हाच खरा धर्ममार्ग असेल व मी माझें दान करण्यास अधिकारी असेन तर एका शर्तीवर मी आपली भार्या होण्यास तयार आहें. ती ही शर्त कीं, आपल्यापासून होणाऱ्या माझ्या पुत्रास आपण राज्याधिकारी केलें पाहिजे.' राजानें हें वचन तत्क्षणीं मान्य केलें व तीं उभयतां गांधर्वविधीनें लागलीच परिणीत झालीं. 'चतुरंगसेना तुला नेण्याकरितां पाठवितों,' असें अनेकवार आश्वासन व वचन देऊन दुष्यन्त राजधानीला निघून गेला. झालेली गोष्ट कळली म्हणजे कण्व काय करतील याची त्यास मोठी भीति वाटत होती. इकडे कण्वही कांहीं वेळानें आश्रमाला परत आले. शकुंतला लाजेमुळें त्यांच्यासमोर गेली नाहीं. मुनींनीं अन्तर्ज्ञानानें झालेली गोष्ट जाणली व शकुंतलेचें अभिनंदन केलें. योग्य कालीं शकुंतला चक्रवर्तिचिह्नांनीं युक्त असा पराक्रमी पुत्र प्रसवली. सहा वर्षे लोटलीं तरी दुष्यन्ताकडून न्यावयाला कोणी आलें नाहीं, किंवा कांहीं निरोपही आला नाहीं. मुलीला फार दिवस आपल्या घरीं ठेवून घेणें प्रशस्त नाहीं असें समजून कण्वानें शिष्य बरोबर देऊन शकुंतलेची मुलासह दुष्यन्ताकडे रवानगी केली. शिष्यांनीं हस्तिनापुरास नेऊन तिला राजवाड्यांत प्रविष्ट केलें. शकुंतलेनें पुत्रासह राजाची गांठ घेतली व आपणा उभयतांचा स्वीकार कर-

ण्याविषयीं त्याला विनंति केली. सर्व गोष्टींचें स्मरण असतांही राजानें कानावर हात ठेवले व तिची निर्भर्त्सना करून म्हटलें, ' तुझा माझा कांहीं संबंध नाहीं. या मुलाला मी ओळखत नाहीं. चालती हो ! दुष्टे ! बायका असत्य बोलणाऱ्या असतात. तुझ्यावर माझा विश्वास नाहीं. माझ्याशीं भलताच संबंध जोडावयाला तुला लाज कशी वाटत नाहीं ?' हें ऐकून शकुंतला आश्चर्यचकित झाली. तिला अत्यंत क्रोध आला. तिनें दुष्यंताला म्हटलें, ' राजा ! जाणून बुजून खोटें बोलणें तुझ्या सारख्यास योग्य नाहीं. धर्माला ओळख. आत्मवंचना करूं नकोस. जन्मांतरीं मीं कांहीं तरी पातक केलें म्हणून लहानपणीं आईबापांनीं मला टाकिलें व आतां तू टाकीत आहेस ! माझा स्वीकार करीत नसशील तर या पुत्राचा तरी कर व त्याला वचनाप्रमाणें यौवराज्याभिषेक कर.' यावर दुष्यंतानें पुन्हां दुर्भाषण करून तिचा धिक्कार केला. त्यावर शकुंतला म्हणाली, ' ठीक आहे. तूं स्वीकार न केलास तरी हा पुत्र सार्वभौम राजा होईल ! ही मी याला घेऊन चालती होतें.' असें म्हणून ती जावयाला निघाली. इतक्यांत आकाशवाणी झाली कीं ' दुष्यंता, शकुंतला तुझी धर्मपत्नी आहे; व तिच्या पासून तुला झालेला हा पुत्र आहे. यांचा सन्मानपूर्वक स्वीकार कर व या पुत्राला यौवराज्याभिषेक कर !' तेव्हां दुष्यंतानें तेथें जमलेल्या सर्व लोकांस सांगितलें कीं, ' शकुंतलेशीं माझा गुप्त विवाह झालेला मला आठवत होता. तरी लोकापवादभयास्तव तिचा स्वीकार मीं केला नाहीं. आतां आकाशवाणीनें या गोष्टीचा उलगडा झाला असल्या कारणानें मी शकुंतलेचा पुत्रासह स्वीकार करतों.' असें म्हणून त्यानें शकुंतलेचा व पुत्राचा स्वीकार केला व लवकरच पुत्राचें नांव भरत असें ठेवून त्यास यौवराज्याभिषेक केला.

---

# शुद्धिपत्रक.

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| ४ | १४ | काढुनि | काढुमी |
| ५ | ११ | वाटेंत | टप्प्यांत असलेल्या |
| ७ | १ | | ७ |
| ,, | २२ | श्राणि | श्रेणि |
| १० | ७ | जेवि | जेविं |
| ,, | ११ | शवलेंही | शैवलेंही |
| ,, | २५ | परिवेष्टिल | परिवेष्टिलें |
| ११ | ४ | व. ति. | द्रु. वि.' |
| १३ | ७ | अतिथ्य | आतिथ्य |
| ,, | २९ | धर्मखात्यावर | न्याय देण्याच्या कामावर |
| १४ | २६ | ते | तो |
| १५ | ४ | एकून | एकूण |
| ,, | २५ | – | वंशस्थ |
| १८ | १० | आश्रमावरी | आश्रमतरुवरि |
| ,, | २४ | येऊनि | येउनि |
| ,, | ,, | आश्रमीं | विद्रुमीं |
| १९ | ६ | ... | जावें तर |
| २० | ७ | ठोकीत | चालल्या असतां |
| ,, | १३ | वेढण्याच्या | पिटाळण्याच्या |
| २३ | ५ | धनुज्या | धनुर्ज्या |
| ,, | ९ | वेढिलें | पिटाळलें |
| ,, | १० | ती...मुक्काम | निघावयाला विलंब कां ? |
| २४ | ५ | वेढायला | उठवायला |
| २५ | ६ | माणूस | तेवढें सगळें |
| ,, | २६ | विधान | विधिनें |
| २७ | २७ | दौवारिक | द्वारपाल |
| २८ | १२ | दुष्यन्त | दुष्यन्त दुष्यन्त |
| २९ | ६ | दिवसपर्यंत | रात्र |
| ३५ | ५ | गोरीमोरीं तोंडें करून | चिंताक्रान्त मुद्रेनें |

| | | | |
|---|---|---|---|
| ,, | १२ | मदनतापहतुका | मदनतापा इतुका |
| ३७ | २७ | टेकुनि [illegible]कमल | 'टेकुनिया स्वशिर |
| ३८ | ५ | गुंडाळून | लावून |
| ,, | २१ | चंद्रिकेला | चंद्रिकेला |
| ४१ | ११ | असली...घ्यावयाची. | '( असें म्हणून जाऊं पाहत ) '. |
| ,, | २६ | चुरूं | चुरुं |
| ४२ | ३ | पूर्वकाळीं | पूर्वे पुष्कळ |
| ४४ | २ | करांतुनि | करांतूनि |
| ४६ | ११ | वश झाला | वळला |
| ४७ | २१ | अबला जनाला | अबला—जनाला |
| ४८ | १९-२० | इतक्यांत...म्हटलें | पहातें तों लाजेनें खालीं मान घातलेल्या शकुंतलेला पोटाशीं धरून ते तिचें अभिनंदन करीत आहेत व |
| ,, | २४ | बरें ! | बरें ! ' |
| | २५ | कोणी | कोणीं |
| ४९ | ६-७ | आनंदाचा...होतो | आनंदाबरोबर थोडें दुःखही वाटतें |
| ५० | २५ | कलो | केला |
| ५२ | १० | ऋक्छंदाच्या चालीवर | — |
| ,, | १३ | साक्षात् | ... |
| | २२ | दाखवाल कीं नाहीं ! | दाखवा. |
| ५४ | २-३ | आंब्यावर चढली | आम्राशीं संगत |
| ,, | ११ | अशी | असें |
| ५५ | १२ | श्रुति आहे | ऐकण्यांत आहे |
| ५६ | १२ | ज्ञानसंपन्न | धीमान् |
| ,, | २७ | अर्थाबद्दल | अर्थाबद्दल |
| ५७ | २० | दोन...ताई | सूर्य दुसऱ्या प्रहरावर आला। बरें का ! |
| ५८ | १९ | उदासपणें | सुने सुने |
| ६२ | १९ | वेत्रपति | वेत्रवति |

| | | | |
|---|---|---|---|
| ६६ | १६ | न्यायाविषयीं | कर्त्याविषयीं |
| ,, | २७ | त्याची विचारणा | [illegible] |
| ,, | २९ | बोलत...आतां | |
| ६७ | ८ | नकोच करूं ! | |
| ,, | ९ | त्यां हरिली | |
| ७० | १६ | | |
| ,, | २६ | | |
| ७२ | ३ | आपल्या | |
| ,, | ८ | गुरुजींची आहे | गुरु |
| ७३ | २ | माझा...आहे | [illegible] |
| | | | [illegible] |
| ८१ | २७ | ढेकळा | गो |
| ८२ | १२ | टाकितां या प्रसंगीं; | टाकि |
| ८३ | ९ | मिळविलेल्या | मिळ |
| ८५ | १९ | सात्त्विक- | प्रेम- |
| ८९ | ७ | तर | महारा |
| ९४ | १२ | उद्विग्न | अस्वस्थ |
| ९५ | ६-७ | इतक्या...कांहींच झालें | माझा [illegible] |
| | | | योग झा |
| ,, | ८-९ | कामांत...आहे | कामासंबंध |
| | | | आहां असें |
| ९६ | २२ | वेगोघा | किरणांना |
| १०४ | २२ | राहिली नव्हती | नाहींशी झा |
| १०६ | ६ | शीर्षक्षित शुगारि | झाली शीर्षकि |
| ११० | ५ | म्हणूनी | म्हणुनी |
| ११२ | २३ | वितरिं, | वितरि |